सृजनात्मक शिक्षण

# तोत्तोचान

## (खिडकी पासची चिमुरडी)




तेत्सुको कुरोयानागी

अनुवाद

चेतना सरदेशमुख गोसावी

चित्रे

चिहिरो इवासाकी






नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

# अनुक्रम

*मनोगत*
स्टेशन 1
खिडकीपासची चिमुरडी 2
नवी शाळा 7
''मला शाळा खूप आवडली'' 7
मुख्याध्यापक 9
दुपारचे जेवण 11
शाळेचा पहिला दिवस 11
झुक्गाडीतला वर्ग 13
तोमोईतील अभ्यास 14
समुद्रातलं काहीतरी, डोंगरावरचं कहीतरी 16
''बत्तीस वेळा चावून खावा'' 19
''फिरायला जाऊया'' 20
शाळेचं गाणं 22
''सगळं पुन्हा आत टाक'' 24
तोत्तोचानचं नाव 26
रेडिओ फार्स 27
नवा डबा आला 28
पोहोण्याचा तलाव 31
प्रगति-पुस्तक 33
उन्हाळी सुट्ट्या 34
अपूर्व साहस 35
धीटपणाची परीक्षा 39
सरावाचे सभागृह 41
गरम पाण्याच्या झऱ्याची सहल 44
संगीत कवायत 47
''मला हेच हवंय'' 51
सगळ्यात खराब कपडे 52

ताकाहाशी 54
"उडी मारण्यांपूर्वी पहा" 56
"आणि मग उदंड" 57
"पण आम्ही नुसतंच खेळत होतो" 61
क्रीडादिन 63
कवी इस्सा 67
गूढ 68
हातांची भाषा 70
सत्तेचाळीस रॉनिन 71
"मासाओचान" 74
वेण्या 75
"धन्यवाद" 77
ग्रंथालयाचा डबा 79
शेपूट 81
तोमोई मधील दुसरे वर्ष 83
'स्वान लेक' 84
शेतीचे शिक्षण 85
रानातील स्वयंपाक 87
"तू खरोखर चांगली मुलगी आहेस" 91
नवरी 92
जुनाट शाळा 94
रिबिन 96
जखमी जवानांशी भेट 97
आरोग्य साल 100
इंग्रजी बोलणारा मुलगा 104
पहिलं नाटक 106
चाक 109
यासुकीचान देवाघरी गेला 110
गुप्तहेर 112
बाबांचं व्हायोलिन 115
वचन 116
रॉकी नाहीसा होतो 119
चहापान 121
"सायोनारा-सायोनारा" 124
*उपसंहार* 125

# मनोगत

तोमोई आणि तिची स्थापना करणारे 'सोसाकु कोबायाशी' यांचेबद्दल लिहिण्याची फार वर्षापासूनची माझी इच्छा होती. यातला कुठलाही प्रसंग मी कल्पनेनं निर्माण केलेला नाही. हे सारं खरंखरं घडलंय आणि सुदैवानं मला ते अजून जसंच्या तसं लक्षातंय. ते लिहिण्याची तीव्र इच्छा मला होतीच. मात्र त्याबरोबर हे पुस्तक तयार होण्यासाठी दुसरं एक कारण आहे. माझी मोडलेली 'प्रतिज्ञा' किंवा 'वचन' यामुळं हे पुस्तक आज साकारतंय. मी मोठी झाल्यावर तोमोईमध्ये शिक्षिका होण्याचं वचन कोबायाशींना दिलं होतं. दुर्दैवानं ते वचन पूर्ण करण्याची संधी मला मिळालीच नाही, म्हणून लोकांना किमान तोमोई आणि कोबायाशींविषयी अधिकाअधिक सांगावं, त्यांचं मुलांबद्दलचं प्रेम जगाला माहिती करून द्यावं, तसंच मुलांना शिकविण्यासाठी त्यांनी कोणकोणते मार्ग अवलंबिले याची माहिती द्यावी, हा या लेखनामागचा माझा प्रामाणिक हेतू.

श्री. कोबायाशींनी 1963 साली या जगाचा निरोप घेतला. आज जर ते असते तर अजूनही कित्येक गोष्टी ते तोमोईबद्दल सांगू शकले असते. आजही मी जेव्हा माझ्या सुखी आणि आनंदी बालपणाकडे पाहाते तेव्हा जाणवतं, की ज्याला मी केवळ बालपणाची मौज समजत होते ते सारे उपक्रम कोबायाशींनी फार फार विचार करून, विशिष्ट उद्दिष्ट डोळ्यांसमोर ठेवून आखलेले होते. 'अरेच्चा, म्हणजे तेव्हा त्यांच्या मनात असं असणार' हे आज वाटतंय. तेव्हा अर्थातच त्या कशाचीच मला जाणीव नव्हती. या प्रत्येक नव्या शोधाबरोबर माझी त्यांच्याबद्दलची कृतज्ञता वाढत जाते.

माझ्या स्वतःच्या बाबतीत सांगायचं तर, त्यांच्या, ''तू फार चांगली मुलगी आहेस!'' या एका वाक्यानं माझ्या सबंध आयुष्याला केवढा अर्थ प्राप्त करून दिलाय, हे शब्दात नाही सांगता येणार. मी तोमोईमध्ये गेले नसते किंवा मला कोबायाशी भेटले नसते तर कदाचित् 'शाळेतून काढून टाकलेली वाईट मुलगी' असा कायमचा शिक्का माझ्यावर बसला असता आणि मनात कसले तरी न्यूनगंड घेऊन मी जगले असते.

1945 साली 'तोमोई' आगीत जळून गेली. कोबायाशींनी ही शाळा स्वतःच्या पैशांनी बांधली होती. साहजिकच तिची नव्यानं उभारणी करण्यास काही अवधी लागला. युद्धानंतर त्यांनी जुन्या जागेतच नवी बालवाडी सुरू केली. शिवाय आज 'कुनिताची संगीत महाविद्यालयाचा बालशिक्षण विभाग' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या संस्थेच्या उभारणीत सुद्धा त्यांनी मदत केली. तिथे त्यांनी ताल व्यायाम (युरिथमिक्स) देखील शिकवलं. त्यांनी कुनिताची प्राथमिक शाळेच्या निर्मितीमध्ये हातभार लावला. पण आपल्या मनासारख्या आदर्श शाळेची पुनंनिर्मिती होण्याआधीच वयाच्या एकोणसत्तराव्या वर्षी त्यांचं देहावसान झालं.

तोमोई गाकुएन तोक्योच्या दक्षिण, पश्चिम रेल्वे लाइनवर जियुगाओका स्टेशनपासून पायी तीन मिनिटांच्या अंतरावर होतं. तोमोईच्या जागेवर आता मोठ्ठं पीकॉक सुपर मार्केट आणि एक विशाल वाहनतळ आहे. एक दिवस तिथं माझ्या जुन्या शाळेचे कुठलेही अवशेष बाकी नाहीयेत हे माहीत असताना, तोमाईच्या आठवणींच्या ओढीने मी तिकडे गेले. वाहनतळानजिक मी गाडीचा वेग कमी केला. मला आठवलं, ही तर तीच जागा आहे जिथं आगगाडीच्या डब्यातले वर्ग भरत होते आणि जिथे खेळाचं मैदान होतं.

पण तेवढ्यात वाहनतळाच्या अधिकाऱ्याने माझी गाडी बघितली आणि मोठ्यानं म्हणाला, ''आत येऊ नका, आत येऊ नका, इथे जागा नाय्येय्.''

मी पटकन् गाडी घेऊन परत फिरले. माझ्या मनात त्याला सांगावसं वाटत होतं, ''मी फक्त गतस्मृतींना उजाळा देतेय. बाकी मला काही नकोय!'' एका खोल विषादाने माझं मन भरुन आलं आणि वेग वाढवून तिथून निघून जातांना मी अश्रूंचा बांध मोकळा करुन दिला.

जगात इतरही अनेक उत्तम शिक्षणतज्ज्ञ असतील. त्यांचेही असेच आदर्श असतील आणि मुलांविषयी त्यांनाही खूप प्रेम असेल. अशा आदर्श शाळा निर्माण करण्याची त्यांचीही स्वप्न असतील. अशी स्वप्नं सत्यात आणणं खरोखर किती कठीण असतं याची मला पूर्ण कल्पना आहे. 1937 साली तोमोई सुरू करण्याआधी कित्येक वर्ष कोबायाशींना तयारी करावी लागली होती. आणि 1945 साली 'तोमोई' जळून गेली! इतकं छोटं आयुष्य लाभलं तिला; अवघं साताठ वर्षांचं.

मला नक्की ठाऊकाय की मी जेव्हा तोमोईमध्ये होते तेव्हा कोबायाशींचा उत्साह भरभरुन होता आणि त्यांच्या नवनिर्मितीच्या योजना पुऱ्या अर्थाने बहरल्या होत्या. आणि मग अचानक माझं मन दुःखाने भरुन येतं. मग मला वाटून जातं की जर युद्ध झालं नसतं तर न जाणे अजून किती मुलांना त्यांच्या मायेच्या उबेत वाढायची संधी मिळाली असती.

या पुस्तकात मी कोबायाशींची शिक्षणपद्धती मांडण्याचा प्रयत्न केलाय. सगळी मुलं स्वभावतः चांगली असतात यावर त्यांचा पूर्ण विश्वास होता. पण हा

चांगुलपणा वयस्करांच्या तसंच आजूबाजूच्या वातावरणाच्या दुष्प्रभावानं बिघडू शकतो हेही त्यांना ठाऊक होतं. म्हणूनच त्यांचं मुख्य उद्दिष्ट होतं ते, ह्या 'चांगुलपणा' ची रुजुवात करण्याचं आणि तो वाढीला लावण्याचं, म्हणजे मुले मोठी होताना त्यांची वैयक्तिकता टिकून रहावी.

मुलांची वाढ जास्तीत जास्त स्वाभाविक व्हावी आणि निसर्गाशी त्यांची एकतानता व्हावी म्हणून ते प्रयत्न करीत असत. त्याचं निसर्गावर फार प्रेम होतं. त्यांची धाकटी मुलगी मियोचान सांगत होती की, तिचे वडील तिला लहानपणापासूनच 'चला आपण निसर्गाचा लय ताल शोधू' असे म्हणून दूरवर फिरायला घेऊन जात.

एखाद्या मोठ्या झाडाजवळ जाऊन ते त्या त्याच्या फांद्या आणि पाने हवेबरोबर सळसळतांना दाखवत. त्याची पाने, फांद्या, खोडाचे एकमेकांशी असलेले नाते समजावून सांगत. हे पण सांगत की हवेच्या कमीजास्त होणाऱ्या झोतांबरोबर पानांचं हलणं कशा तऱ्हेने बदलतं. हे सर्व नीट पाहण्यासाठी ते अगदी शांत उभे राहत आणि जर वारा थांबलेला असेल तर एखाद्या लहानशा झुळकीसाठी ते धीराने मान वर करुन बराच वेळ उभे रहात. फक्त वारंच नाही तर ते नद्यांकडे पण पहात. जवळूनच वाहणाऱ्या तामा नदीच्या किनारी जाऊन ते तिचा प्रवाह निरखत. मियोचान म्हणाली की हे सगळं करीत असतांना ते कधीच थकत नसत.

युद्धकाळातसुद्धा अशा तऱ्हेच्या स्वतंत्रतावादी शाळेला जपान सरकारनं आक्षेप कसा घेतला नाही याचं कदाचित् वाचकांना नवल वाटेल. पण सगळ्यात पहिली गोष्ट अशी, की कोबायाशींना जाहिरातबाजी मुळीच आवडत नसे. त्यामुळे पन्नासपेक्षाही कमी मुलं असलेली ही शाळा कोणाच्या फारशी लक्षात न येता आपलं अस्तित्व टिकवू शकली आणि त्यामुळेच सरकारच्या डोळ्यावरही कधी आली नाही. शिवाय कोबायाशींना शिक्षणतज्ज्ञ म्हणून जपानच्या शिक्षणखात्यात मोठा मान होता.

प्रत्येक 3 नोव्हेंबर हा आमच्या गोड आठवणीत वसलेला क्रीडा दिन आहे. त्या दिवशी तोमोईचे माजी विद्यार्थी कुहोनन्बुत्सु मंदिरातील एका सभागृहात पुन्हा एकत्र येतात. तेथे, कोण कधी शाळेत होते याला काही महत्त्व नसते.

जरी आमची चाळिशी उलटलेली आहे आणि आमच्यापैकी काही जण पन्नाशीला आलेले आहेत, आम्हां सर्वांची मोठी मोठी मुलं आहेत, तरीसुद्धा आम्ही सर्वजण एकमेकांना लहानपणीच्या उपनावांनीच बोलवितो. अगदी तसंच, जसं आधी करत असू. कोबायाशींनी दिलेल्या अनेक प्रेमभऱ्या भेटींपैकी हे पुनर्मिलन ही त्यांनी दिलेली अजून एक ठेव.

मला माझ्या आधीच्या शाळेतून काढून टाकलं होतं हे खरंय्. मला आठवत नाही पण आई सांगते. मी इतकी खोडसाळ होते यावर विश्वास ठेवणं कठीण

जातं; पण पाच वर्षांपूर्वी मी दूरदर्शनच्या एका कार्यक्रमात भाग घेतला होता. तेव्हा त्याच कार्यक्रमात दुसऱ्या एका बाईशी ओळख झाली आणि मला धक्काच बसला. त्या माझ्या जुन्या शाळेतल्या शेजारच्या वर्गाच्या वर्गशिक्षिका होत्या. आणि त्यांनी जे सांगितलं, ते तर त्याहूनही धक्कादायक होतं.

त्या म्हणाल्या, '' मी माझ्या वर्गाकडे जायची तेव्हा तू रोज वर्गाबाहेर उभी असायचीस. कशा ना कशासाठी तुला शिक्षा झालेली असायचीच. मी तुझ्याजवळून चालले होते तेव्हां तुला माझ्याकडून कळून घ्यायचं होतं की तुला बाहेर कां काढलं गेलंय? एकदा तू मला विचारलं होतंस, 'तुम्हांला बँडवाले नाही आवडत का?' मला हे कधीच समजत नसे की तुझ्याशी कसं वागावं. म्हणून शिक्षकांच्या खोलीत जाण्याअगोदर मी बाहेर वाकून पाहे – आणि तू जर बाहेर दिसलीस तर मी जाण्याचेच टाळे. शिक्षकखोलीत आम्ही बसलो की तुझी वर्गशिक्षिका खूपदा तुझ्याविषयी माझ्याशी बोले. 'ती म्हणे, का बरं ही पोरगी अशी आहे?' आणि म्हणून अनेक वर्षानंतर तू जेव्हा दूरदर्शनवर येऊ लागलीस तेव्हा मला तुझे नाव चटकन आठवले. या घटना फार जुन्या आहेत पण तू पहिल्या वर्गातील विद्यार्थीनी होतीस तेव्हाची तू मला चांगलीच आठवतेस.''

खरंच का मला वर्गातून बाहेर काढून दिले जात होते? खरं सांगायचं तर मला याची काही आठवण नाही आणि ही गोष्ट कळल्यावर मी चकित झाले. पण सकाळच्या कार्यक्रमासाठी येणाऱ्या तरुण दिसणाऱ्या शुभ्र केसांच्या त्या प्रेमळ शिक्षिकेने मला सांगितले की खरेच मला माझ्या पहिल्या शाळेतून काढून टाकले होते.

मला हे आठवत नव्हतं. पण आईनं मला हे माझ्या विसाव्या वाढदिवसापर्यंत न सांगितल्याबद्दल आईची मात्र मी कृतज्ञ राहीन. ''काय होणार या पोरीचं?'' अशी काळजी वाटत असूनसुद्धा तिनं ते कधीच दाखवलं नाही. ती जर असं काही म्हणाली असती, तर कदाचित्, ''तू फार चांगली मुलगी आहेस!'' हे वाक्य फारसं परिणामकारक झालं नसतं. आईने असे काही म्हटले असते तर मी तोमोई गाकुएन मध्ये आपले पहिले पाऊल टाकताना केवढी उदास आणि किती बुजलेली राहिले असते. मुळं खोलवर गेलेल्या झाडाचं ते फाटक, आगगाडीच्या डब्यात भरणारे ते वर्ग मला कदाचित तेवढे आनंददायी वाटले नसते. खरोखरच मी भाग्यवान म्हणून मला अशी आई मिळाली.

त्या दिवसांमध्ये युद्ध सुरु होते त्यामुळे तोमोईत अगदी कमी छायाचित्रे घेणे शक्य झाले होते. त्यात, शाळेतील आपले शेवटचे वर्ष पूर्ण करणाऱ्या मुलांचे चित्र सर्वात उमदे आहे. अशा वेळी पूर्ण वर्ग सभागृहाच्या समोरील पायऱ्यांवर एकसाथ उभा होई. एकत्र होण्याआधी ''चला, चला, लवकर चला फोटोसाठी चला'' अशी हाक येई आणि मग दुसऱ्या वर्गातली मुलेही येऊन त्या गर्दीत घुसत. शेवटी हे

ओळखणं कठीण होऊन बसे की कुठली मुलं कुठल्या वर्गातली आहेत. आमच्या माजी विद्यार्थ्यांच्या पुर्नभेटीत यावर खूप चर्चा होई. कोबायाशी अशा वेळी काहीच म्हणत नसत. त्यांना कदाचित असे वाटत असावे की एकाच वर्गाच्या औपचारिक आणि गंभीर चित्रांऐवजी शाळेतील सर्व मुलांचे अगदी जिवंत छायाचित्र कधीही चांगले. ती छायाचित्रे पहातांना आजही वाटते की खरोखर तोमोईचा अंश त्यात उतरलाय.

तोमोईबद्दल मला खरं तर खूप काही लिहिता येईल, पण तोत्तोचानसारखी लहान मुलगीसुद्धा व्यवस्थित समजून घेतलं तर किती बदलू शकते हे जरी मी लोकांपर्यंत पोचवू शकले तरी मला खूप बरं वाटेल.

वयस्कांकडून योग्य दिशा मिळाल्यामुळे तोत्तोचानसारखी मुलगी मोठी झाल्यावर इतरांसमवेत आपले जीवन जगायला शिकली. आज जर तोमोईसारख्या अनेक शाळा असत्या तर आपल्या आजूबाजूला पसरलेली हिंसा नक्कीच घटली असती आणि इतकी मुले शाळा सोडून पळाली नसती, हा माझा खोल विश्वास आहे. तोमोईची शाळा सुटल्याची घंटा झाल्यावर कुणा मुलांना घरी जाण्याची घाई नसायची आणि दररोज सकाळी मात्र शाळेत जायचे वेध लागायचे. अशी होती आमची ती शाळा.

सोसाकु कोबायाशींचा जन्म 18 जून 1893 मध्ये तोक्योमध्ये झाला. लहानपणापासूनच त्यांना निसर्ग आणि संगीताबद्दल ओढ होती. लहानपणी ते त्यांच्या घराजवळच्या नदीकाठी उभे रहात. समोर दूरवर दिसणारा हारूना पर्वत आणि नदीचा खळखळाट त्यांना जणू एक नैसर्गिक वाद्यवृंदच वाटायचा.

एका गरीब शेतकरी परिवारात जन्मलेले सोसाकु कोबायाशी हे सहावं आणि सर्वात छोटं अपत्य. शालेय शिक्षण पूर्ण झाल्यावर त्यांना सहाय्यक शिक्षक बनण्यासाठी खूप कष्ट घ्यावे लागले. पण इतक्या लहान वयात सहाय्यक शिक्षकाचं प्रमाणपत्र मिळणं हे त्यांच्या लोकविलक्षण बुद्धिमत्तेचं द्योतक होतं. थोड्याच काळात त्यांची नियुक्ती तोक्योमधील एका प्राथमिक शाळेत झाली. तिथेही त्यांनी स्वतःची संगीत साधना चालू ठेवली. जपानमधील सर्वोकृष्ट अशा संगीत विद्यालयात त्यांना प्रवेश मिळाला. हे विद्यालय आज 'तोक्यो युनिव्हर्सिटी ऑफ फाइन आर्टस् ॲन्ड म्युझिक' या नावानं ओळखलं जातं. या विद्यालयातून संगीताची पदवी घेतल्यावर हारुजी नाकामुरांनी स्थापन केलेल्या साई-काई संगीत विद्यालयात कोबायशींनी संगीत शिक्षकाची नोकरी पत्करली. हारुजींच्या मते शिक्षणाचा सर्वात महत्त्वाचा टप्पा हा प्राथमिक शिक्षणाचा असतो. ते शाळेचा अभ्यासक्रम पाठ्यपुस्तक मुक्त ठेवीत. या शाळेत मुलं सकाळी लेखन-वाचन करीत. दुपारी झाडं-फुलं गोळा करीत, चित्र काढीत, गाणी म्हणत आणि मुख्याध्यापकांशी गप्पा मारीत. या शिक्षण पद्धतीचा कोबायाशींवर खूप प्रभाव

पडला होता आणि नंतर तोमोईसाठीही त्यांनी हीच शिक्षण पद्धती अवलंबिली.

संगीत शिकवत असतानाच कोबायाशींनी एक संगीतीका लिहिली. प्रसिद्ध मिस्तुविशी उद्योगाचे जनक इवासाकी परिवारातील बैरॉन इवासाकी या संगीतीकेने खूपच प्रभावित झाले होते. कलाप्रेमी बैरॉन इवासाकींनी कोबायाशींना शिक्षण पद्धतीच्या अभ्यासासाठी युरोपाला पाठवण्याचा प्रस्ताव मांडला.

1922 ते 1924 अशी दोन वर्षे कोबायाशींनी युरोपमध्ये घालविली. तिथल्या अनेक शाळांना त्यांनी भेटी दिल्या. पॅरिसमध्ये त्यांनी एमिले जाक्स डेलक्रोझ यांच्याकडे संगीत कवायतीचं शिक्षण घेतलं. जपानला परतल्यावर त्यांनी 'साइजो' नावाच्या बालवाडीची स्थापना केली. त्या बालवाडीतील शिक्षकांना ते म्हणत, ''मुलांना त्यांच्या स्वभावानुसार वाढू दे. त्यांची स्वप्नं तुमच्या स्वप्नांहूनही विशाल आहेत. ती पायदळी तुडवू नका.''

डेलक्रोझ यांच्याबरोबरचं शिक्षण चालू ठेवण्यासाठी कोबायाशी 1930 मध्ये पुन्हा युरोपला गेले. या दौऱ्यावरून परतताना स्वतःची शाळा निर्माण करण्याचा त्यांचा निश्चय झाला.

1937 मध्ये तोमोई बरोबरच त्यांनी संगीत कवायत समितीची स्थापना केली. बहुतेक लोक त्यांना संगीत कवायतींचे जपानमधील जनक आणि कुनिताचि महाविद्यालयातील संगीत शिक्षक म्हणून ओळखतात. त्यांच्या शिक्षण पद्धतीचा प्रत्यक्ष अनुभव घेतलेले माझ्यासारखे भाग्यवान खूप मोजकेच आहेत.

तोमोईसारख्या इतर शाळा सुरु करण्याआधी त्यांचा मृत्यू झाला हे मोठंच दुर्भाग्य. ज्यावेळी तोमोई जळत होते तेव्हा ते त्याहून अधिक चांगल्या शाळेची कल्पना करीत होते. आसपासच्या कल्लोळाने विचलीत न होता, त्यांनी त्या क्षणी देखील उत्साहाने विचारले होते, ''आता आपली नवी शाळा कशी असेल?''

मी हे पुस्तक लिहीत असतानाच मला एक आश्चर्यकारक शोध लागला. माझ्या 'तेत्सुकोज रूम' या दूरदर्शनवरील दैनिक कार्यक्रमाचा निर्माता एका दशकापासून कोबायाशींवर संशोधन करीत होता. त्यानं कोबायाशींना पाहिलंही नव्हतं. पण मुलांच्या संगीत कवायतीच्या वर्गात पियानो वाजवणाऱ्या एका बाईंनी सांगितलेल्या अनुभवानं त्याच्या मनात कोबायाशी बद्दलचं कुतूहल जागं झालं होतं. त्या वर्गात पियानो वाजवत असताना एकदा कोबायाशी त्यांना म्हणाले होते. ''तुम्हाला माहितीय? मुलं या ठेक्याप्रमाणे कधीच चालत नाहीत.'' मुलांबद्दलची त्यांची संवेदनक्षमता इतकी तीव्र होती की त्यांचं चालणंच काय पण त्यांच्या श्वासोच्छवासाची लय देखील कोबायाशींना माहीत होती.

वीस वर्षांपूर्वी कोदांशाच्या एका तरूण संपादकाने एका स्त्रीमासिकामध्ये मी तोमोईवर लिहिलेला लेख वाचला आणि या लेखाचा विस्तार करून त्याचं एक पुस्तक करण्याचा प्रस्ताव घेऊन तो माझ्याकडे आला. कास्तुहिसा – कातो हे

या संपादकाचं नाव. जेव्हा त्याच्या विचाराला मूर्त रुप मिळालं तेव्हा तो एक संचालक झालेला होता. पुस्तक लिहिण्याचा विचार मी कधी केलाच नव्हता. तोवर मी फार काही लिहिलं नव्हते आणि त्यामुळे एक पूर्ण पुस्तक लिहिण्याचा विचार भीतीदायक वाटत होता. पण कातोंनी माझा आत्मविश्वास खूपच वाढवला, सरतेशेवटी दरमहा एक प्रकरण लिहिण्यास मला करारबद्ध केले गेले. आणि अखेर 1979 ते 1980 च्या दरम्यान कोदांशाच्या 'यंग वुमन' या मासिकातून तोत्तोचानची प्रकरणं क्रमशः छापली गेली.

त्याच काळात मी तोक्योमधील 'चिहिरो इवासाकी म्युझियम ऑफ पिक्चर बुक्स' मध्ये दर महिन्याला एक चित्र निवडण्यासाठी जात असे. लहान मुलांची चित्र काढण्यासाठी चिहिरो इवासाकी प्रसिद्ध आहे. मुलांची इतकी जिवंत चित्रं क्वचितच कोणी रेखाटली असावीत. मुलांच्या भावविश्वातील असंख्य छटा त्यांनी जिवंत केल्या आहेत. आश्चर्य म्हणजे माझ्या पुस्तकातील वर्णनांशी ही चित्र इतकी बेमालूम जुळतात की जणू ती वर्णन समोर ठेवून काढली असावीत. वास्तविक हे पुस्तक लिहिण्याआधी 1974 मध्येच चिहिरो इवासाकींनी जगाचा निरोप घेतला होता.

चिहिरो इवासाकींच्या सात हजार चित्रांमधून चित्रं निवडायला मदत करण्याबद्दल त्यांचा मुलगा, सून आणि चित्राच्या वापराची अनुमती दिल्याबद्दल त्यांचे पती यांची मी आभारी आहे. या चित्र संग्रहालयाचे संरक्षक तादासु इजावा यांचीही मी आभारी आहे. पुस्तक लिहीत असताना श्री तादासुंनी माझा आत्मविश्वास वाढविण्यास खूप मदत केली. या संग्रहालयाची आज मीही एक विश्वस्त आहे. मियोचान आणि तोमोईतील इतर सहकार्यांनी मला खूपच मदत केली. पुस्तकाच्या जपानी आवृत्तीचे संपादक केइको इवामोतो नेहमी म्हणत ''आपल्याला याचं खरोखरच एक सुंदर पुस्तक करायचं आहे.'' मी त्यांची आभारी आहे.

काही वर्षापूर्वी एक वाक्प्रचार प्रचलित होता. एखादा जर त्याच्या मूळापासून तुटला असेल म्हणजेच अधांतरी आयुष्य जगत असेल तर त्याला 'तो खिडकीशी उभा आहे' असं म्हणत. लहानपणी मी बँडवाल्यांची वाट बघत खिडकीशी उभी असे हे खरंच पण त्या वर्गात मीही अशीच होते. 'अधांतरी', इतरांपासून वेगळी, रुजायला स्वतःची मुळंच नसल्यासारखी. या पुस्तकाचं नाव मला या वाक्प्रचारावरून सुचलं. पण याला आणखी एक अर्थ आहे. आनंद आणि उत्साहाची अशी एक खिडकी जी माझ्यासाठी तोमोईने उघडली.

तोक्यो, 1982



तोत्तोचान प्रकाशित होऊन केवळ तीनच वर्ष झालीयेत. पण या तीन वर्षात जे काही घडलंय त्यानं मी आनंदीत तर आहेच पण त्याहून अधिक चकित झालेय. जेव्हा तोमोई आणि कोबायाशीबद्दल लिहीत होते तेव्हा हे जपानमधील 'बेस्ट - सेलर' पुस्तक होईल असा विचारही मनाला शिवला नव्हता. प्रकाशनाच्या पहिल्या वर्षात या पुस्तकाच्या पस्तीस लाख प्रती खपल्या. आतापर्यंत याची संख्या साठ लाखाच्या वर गेली आहे. या संख्येला माझ्या दृष्टीनं फारसा अर्थ नाही. पण जपानच्या काना-कोपऱ्यातून पत्राचे अक्षरशः ढीग रोज येऊ लागले. तेव्हा वाटलं लोक खरोखर वाचताहेत. ही पत्रं लिहिणाऱ्यांमध्ये 5 वर्षांच्या मुलांपासून 103 वर्षापर्यंतचे लोक होते. प्राथमिक शाळेतील मुलांची पत्रे पाहून तर याहून आश्चर्य वाटत असे. आजकाल अक्षरांचा संपर्क तुटत चाललेल्या युगात तर मुलांनी प्रसंगी शब्दकोशाच्या मदतीनं तोत्तोचान वाचणं ही गोष्ट जितकी विस्मयकारक तितकीच हर्षदायक होती. दुसरीतल्या एका चिमुरडीनं लिहिलं होतं की तिला तेव्हा एखादा अपंग मुलगा दिसतो तेव्हा तिला वाटतं की हा नक्कीच यासुआकीचान असणार किंवा वाटतं की अरे हा तर तोमोईचा विद्यार्थी दिसतोय आणि मग ती पळत पळत त्याला 'हॅलो' म्हणायला जाते. तोमोई संपून चाळीस वर्ष झाली पण मुलांचं कलानाविन्य अद्‌भुत असतं हेच खरं.

कित्येक मुलांनी लिहिलं होतं की तोमोई जळाल्याचं वाचून त्यांना जाणवलं की युद्ध फार वाईट्ट असतं. मुलांच्या या प्रतिक्रिया वाचून या पुस्तक लेखनाचं सार्थक झालं असं वाटतं. पण हे लिहिताना मात्र वाटत असे की हे वाचून जर विद्यार्थ्यांच्या शिक्षकांना आणि पालकांना कोबायाशी नावाचा मुलांवर अथांग प्रेम करणारा आणि त्यांच्यासाठी झटणारा एक माणूस होऊन गेला एवढं समजलं तरी खूप होईल. अर्थात त्याच वेळी एक भीती वाटत होती की आजच्या स्पर्धेच्या जगात कोबायाशींचे विचार अती आदर्शवादी म्हणून शिक्षक नाकारणार तर नाहीत ?

पण झालं मात्र उलटंच. पुस्तक वाचल्यावर कित्येक शिक्षक शाळेत मोकळ्या तासांना मुलांना पुस्तकाचं एक-एक प्रकरण वाचून दाखवीत आणि त्यावर चित्रही काढायला सांगत. आजच्या शिक्षणपद्धतीनं त्यांचं मन चिंतीत होत असे आणि कोबायाशींच्या पद्धतीचं थोडं तरी अनुकरण करण्याचा ते निश्चय करीत असत. अशी पत्रं वाचून डोळ्यात पाणी उभं राही. वाटे कोबायाशींसारखा विचार करणारे कितीतरी लोक आहेत.

जपानी शिक्षक माझ्या पुस्तकाचा अनेक प्रकारांनी उपयोग करीत होते. गेल्यावर्षी 'शेतीवाडीचे शिक्षक' हे प्रकरण तिसरीच्या पाठ्यपुस्तकात घातलं गेलं. 'जुनाट शाळा' हे प्रकरण चौथीच्या नीतीशास्त्र आणि शिष्टाचाराच्या पुस्तकात घातलं गेलं. अशीही काही पत्रं होती की ज्यानं मन उद्विग्न व्हावं. बाल

गुन्हेगार सुधारगृहात रहाणाऱ्या एका मुलीनं लिहिलं होतं, ''माझी आई जर तोत्तोचानच्या आईसारखी असती अन् मलाही कोबायाशी भेटले असते तर कदाचित मी आज इथं आले नसते.''

तोत्तोचानच्या विक्रमी यशाच्या कारणाची चर्चा अनेक संचार माध्यमांनी केली. 'आसाही (म्हणजे चक्क आपला 'सकाळ'. जपानी भाषेत 'आसा' म्हणजे पहाट आणि 'ही' म्हणजे दिवस, थोडक्यात 'दिवसाची सुरवात'.) या दैनिकाने तोत्तोचान सिंड्रोम नावाची एक मालिकाच छापली. एका प्रकाशकाने तर 'तोत्तोचान : एका बेस्ट सेलरची कहाणी' नावाचं एक आख्खं पुस्तकच छापलं. मला वाटतं या पुस्तकाच्या यशाचं सर्वात मोठं कारण असं होतं की जपानमध्ये जेव्हा शिक्षणाची समस्या अतिशय बिकट झाली होती नेमक्या त्याच वेळी हे पुस्तक छापलं गेलं. या विषयावर काहीतरी केलंच पाहिजे असे सर्वांनाच वाटत होतं. साहजिकच अनेक वाचकांनी हे पुस्तक म्हणजे शिक्षणशास्त्रावरचा एखादा प्रबंध असल्यासारखं वाचलं. आणि सर्व वयोगटाच्या लोकांना उपयोगी पडेल असं असल्यानंही याचा वाचकवर्ग अधिक विस्तृत झाला.

जपानमध्ये एखाद्या स्त्रीलेखिकेचं पुस्तक बेस्टसेलर होण्याची ही पहिलीच घटना होती. सुरुवातीला पुरुष वाचकांची प्रतिक्रिया थोडी नकारात्मक होती. 'आम्हाला मुखपृष्ठ जरा पोरकट वाटलं' अशी सुरुवात करून 'कुटुंबियांच्या आग्रहाखातर पुस्तक वाचलं' असं म्हणत शेवटी या प्रतिक्रिया सकारात्मक झाल्या होत्या. तोत्तोचानची बाजू घेणाऱ्या कुटुंबियांचे मन:पूर्वक आभार.

पुस्तक प्रकाशित होण्यापूर्वीच याच्या उत्पन्नातून मूकबधिर कलाकारांसाठी एक व्यावसायिक नाट्यसंघ स्थापण्याचा निर्णय मी घेतला होता. मी या नाट्यसंघाला समाजकल्याण संघटनेचा दर्जा देण्याची विनंती केली. कारण मग माझ्या मृत्यूनंतर माझ्या वृद्धापकालीसुद्धा या संघाच्या अस्तित्वाला धक्का पोहचणार नाही. यापूर्वी असं कधीच झालं नव्हतं. साहजिकच हे करून घेण्यात खूपच अडचणी आल्या. पण अखेर सरकारने हा प्रस्ताव मान्य केला. आणि तोत्तोचान प्रतिष्ठानचा जन्म झाला. या नाट्यसंघाला अपेक्षेहून अधिक यश मिळालं आणि जपानच्या मूकबधिर रंगभूमीचा जन्म झाला. सध्या तोत्तोचान प्रतिष्ठानच्या प्रशिक्षण केंद्रामध्ये वीसहून अधिक मूकबधिर कलाकार प्रशिक्षण घेत आहेत. त्यांच्यासाठी सांकेतिक भाषेचेही वर्ग घेतले जातात. गेल्यावर्षे जुलैमध्ये इटली येथे पालेरमो मध्ये आयोजित आंतरराष्ट्रीय मूक-बधिर मेळाव्यातील नाट्य महोत्सवात आमच्या 'क्योगेन' या नाटकाच्या सादरीकरणाने आमचं स्वप्न साकार केलं.

दोन वर्षापूर्वी तोत्तोचानच्या अभूतपूर्व यशामुळे मला जपानी सम्राटांच्या उद्यानात वासंतिक चहापानासाठी निमंत्रित केलं गेलं. तिथं आलेल्या नोबेल

पारितोषिक विजेत्या केनिची फुकुईनी स्वतः म्हटलं, ''तोत्तोचान सर्वाधिक खपाचं पुस्तक झालं हे फारच छान झालं.''

सन 1981 या आंतरराष्ट्रीय अपंग वर्षी 9 डिसेंबरला (जपानमध्ये हा अपंग दिन म्हणून घोषित झाला आहे.) मला पंतप्रधान सुझुकी यांच्या हस्ते पारितोषिक देण्यात आलं. या व्यतिरिक्तही अनेक पुरस्कार मला मिळाले. यात बालसाहित्यिकांच्या स्मृतीला समर्पित 'वेसाइड स्टोन' याचाही समावेश आहे.

अनेक लोकांनी तोत्तोचानवर चित्रपट, दूरदर्शन मालिका किंवा ॲनिमेशन फिल्म बनविण्याची परवानगी मागितली. परंतु चिहिरो इवासाकीची चित्रं आणि वाचकांच्या मनातील 'छबी' यांना चित्रित करणं अशक्य आहे असं वाटून मी या सर्व परवानग्या देण्याचं नाकारलं. फक्त एकच प्रस्ताव मी स्वीकारला. तो म्हणजे शिनसेई निहौन् सिंफनी या वाद्यवृंदाचा तोत्तोचानवर एक संगीतीका करण्याचा. मला वाटतं संगीत कल्पनेच्या मुक्त भरारीला उपयोगी पडतं. आकिहिरो कोमोरींची ही संगीतीका माझ्या शब्दांहूनही अधिक परिणामकारक झाली आहे. आता या संगीतीकेची एक रेकॉर्डही उपलब्ध आहे.

1982 मध्ये तोत्तोचानच्या प्रकाशनानंतर एका वर्षातच डोरोथी ब्रिटन यांचा इंग्रजी अनुवाद तयार झाला. डोरोथी स्वतः एक संगीतकार आणि कवयित्री आहेत. त्यांचा अप्रतिम अनुवाद मूळ पुस्तकाची लय-ताल सांभाळीत थेट हृदयाला भिडतो. या इंग्रजी अनुवादानेही जपानमधील इंग्रजी सर्वाधिक खपाच्या पुस्तकाचा मान मिळवला. याच्या चार लाख प्रती खपल्या.

हा इंग्रजी अनुवाद अमेरिकेतही त्याच वेळी प्रसिद्ध झाल्या. तोत्तोचानचे अनुवाद चीन आणि कोरियामध्येही प्रसिद्ध झाले आहेत. या दोन्ही देशात प्रकाशनाधिकारावर बंधनं नाहीत. चिनी अनुवादाबद्दल मला माहितही नव्हतं. एका ओळखीच्या जपानी गृहस्थांच्या हाती एका सद्गृहस्थानं चिनीभाषेतील अनुवादाची प्रत मला पाठवली. तेव्हा मला तोत्तोचानचे दोन-तीन अनुवाद प्रसिद्ध झाल्याचं समजलं. पोलंड आणि फिनलंड मधील प्रकाशकांनी सर्व औपचारिकता पूर्ण करून आता त्यांचेही अनुवाद प्रकाशनाच्या मार्गावर आहेत. चेकोस्लोव्हाकिया मधील प्रकाशकांशी चर्चा चालू आहे. आणि युरोपमधील अनेक देशांनी संपर्क साधला आहे. तोत्तोचानच्या माध्यमातून सगळ्या जगाला जपानबद्दल माहिती होतेय याचा खूप आनंद मला होतोय. अमेरिकेतील एका शाळकरी पोरानं मला पत्रातून विचारलं, ''तोत्तोचान तू एक सुंदर मुलगी आहेस का गं? असशील तर माझ्या घरी जेवायला ये.'' त्यांच्या शाळेच्या बाईंनी त्यांना तोत्तोचान वाचून दाखवलं होतं. त्या पत्राबरोबर बाईंनी एक पत्र जोडलं होतं. ते पत्र लिहिणारा मुलगा एका गरीब कृष्णवर्णीय कुटुंबातील होता.

माध्यमिक आणि उच्च माध्यमिक शाळेतील अनेक मुलींनी मला लिहिलं

होतं की ''या पुस्तकातून इतकी सह्दयता मिळेल असं वाटलं नव्हतं.'' या पुस्तकाकडे त्या नेमक्या कशामुळे आकर्षित झाल्या हे त्यांनी लिहिलं नव्हतं. कदाचित प्रत्येकीचं कारण वेगवेगळं असेल. एक मात्र खरं की किशोर वयात सह्दयता आणि सौम्यता सहज मनाला भिडते.

नुकतंच मला युनिसेफनं (नोबेल शांती पुरस्काराने सन्मानित आंतरराष्ट्रीय संस्था) आपलं सद्भावनादूत म्हणून नियुक्त केलंय. हेही अर्थात तोत्तोचान मुळेच. झालं असं की युनिसेफच्या न्यूयॉर्क सचिवालयाच्या कार्यकारी संचालकांना त्यांच्या कोणा मित्राने तोत्तोचानची एक प्रत पाठविली. त्यांचे आणि माझे विचार खूपच मिळते-जुळते होते. ते आशियासाठी सद्भावना दूताच्या शोधात होते. यापूर्वी अभिनेते डॅनी के, पीटर उस्तिनोव, नॉर्वेच्या अभिनेत्री लिव उल्मन अशा प्रसिद्ध व्यक्तींनी सद्भावना दूत म्हणून काम केलं होतं. आता मी चौथी दूत बनेन. जगात रोज चाळीस हजार आणि वर्षात दीड करोड मुलं उपासमारी संबंधित रोगांना बळी पडतात. या गरीब बालकांची स्थिती समजावून घेऊन त्याचा अहवाल देणं हे माझं काम असेल. या उन्हाळ्यात मी आफ्रिकेत आणि कदाचित आशियाई देशातही जाईन. आज जर कोबायाशी हयात असते तर त्यांना खूप आनंद झाला असता. ''तुम्हाला माहितीय तुम्ही सर्व एक आहात. तुम्ही जगाच्या पाठीवर कुठेही रहा. कुठलंही काम करा पण सर्व एक आहात.'' कोबायाशी नेहमी सांगत.

वसंत 1984 **तेत्सुको कुरोयानागी**



## स्टेशन

जियुगाओका स्टेशन आलं आणि त्या दोघी ओइमाची रेल्वेमधून उतरल्या. आईचा हात धरुन तोत्तोचान फाटकाकडे निघाली. कधीतरी रेल्वेचा प्रवास करायला मिळणाऱ्या तोत्तोचानला आपलं ते मूल्यवान तिकीट देऊन टाकणं खरं तर जिवावर आलं होतं.

''मी हे ठेवून घेऊ?'' तिने तिकीट कलेक्टरला विचारलं.

''नाही,'' तिच्या हातातून तिकीट काढून घेत कलेक्टर उत्तरला.

त्याच्या तिकीटाच्या खोक्याकडे बोट दाखवित तोत्तोचान म्हणाली, ''ही सगळी तुमची आहेत का हो?''

''नाही, ती रेल्वेस्टेशनच्या मालकीची आहेत.'' इतरांची तिकिटं घेताघेताच त्याने सांगितलं.

''अय्या!'' त्या खोक्याकडे उत्सुकतेनं पाहतापाहताच ती पुढे म्हणाली, ''मीही मोठेपणी तिकिटं विकणार.''

तिकीट कलेक्टरनं आता पहिल्यांदाच तिच्याकडं पाहिलं.

''माझ्याही धाकट्या मुलाला स्टेशनवर काम करायचंय. मग तुम्ही दोघंही एकत्रच काम करा हंऽ!''

तोत्तोचाननं एकदा नीट न्याहाळून त्याच्याकडं बघितलं. तो जरा जाड आणि चष्मेवाला होता. पण चेहऱ्यावरुन खूप दयाळू वाटला.

''हंऽऽ'' कमरेवर हात ठेवून ती म्हणाली.

''तशी माझी काही हरकत नाही. मी विचार करेन. पण मला आता वेळ नाहीये. मी किनई माझ्या नव्या शाळेत चाललेय.''

ती आईकडे पळतापळताच ओरडली, ''आईऽऽऽ, मी मोठेपणी तिकिटं विकणार.''

आईला हे नवीन नव्हतं. ती म्हणाली, ''असं? पण मला वाटलं तुला गुप्तहेर व्हायचं होतं.''

तोत्तोचान आईचा हात धरून चालू लागली. तिला आठवलं की आदल्या दिवशीपर्यंत तिला ती गुप्तहेर होणार याची खात्री होती... पण खोकंभर तिकिटं मिळण्यात कित्ती मजा असेल नं?

तिला एक झकास कल्पना सुचली. तिनं आईकडं पाहिलं आणि म्हणाली, ''ए पण आई, मला अशी तिकिटं विकणारी नाही का होता येणार, जी खरोखरी गुप्तहेर असेल?''

आई काहीच बोलली नाही. तिचा चेहरा गंभीर झाला होता. तिला खरं म्हणजे कसलीतरी काळजी लागली होती. तोत्तोचानला जर नंव्या शाळेत घेतलं नाही तर? तिनं रस्त्याच्या कडेनं उड्या मारत आणि मनाशीच बडबडत चालणाऱ्या तोत्तोचानकडं बघितलं. आईच्या चिंतेची काही कल्पना नसलेल्या तोत्तोचाननं आईकडं पाहात आनंदानं सांगितलं, ''आई, मी माझा विचार बदललाय गं, मी नं ते रस्त्यावरुन जाणारे जाहिरातवाले-बँडवाले असतात नं, त्यांच्यात जाणार.''

आई किंचित उदासपणे म्हणाली, ''चल गं लवकर. उशीर होईल. आपण असं मुख्याध्यापकांना ताटकळत ठेवणं बरं नाही. आता बडबड बंद. समजलं? नाकासमोर बघ आणि नीट चल.''

त्यांच्यासमोर काही अंतरावर, एका छोट्याशा शाळेचं फाटक हळुहळू दिसू लागलं होतं.

## खिडकी पासची चिमुरडी

आईच्या काळजीला तसंच कारण होतं. तोत्तोचान खरं तर नुकतीच शाळेत जायला लागली होती आणि तिला शाळेतून काढूनही टाकलं होतं. फक्त पहिलीत असूनही!

मागच्याच आठवड्यातील गोष्ट. आईला तोत्तोचानच्या बाईनी बोलावलं होतं. आई येताच त्यांनी सरळ मुद्यालाच हात घातला.

''तुमची मुलगी आख्ख्या वर्गाचं लक्ष विचलित करते हो. तुम्ही कृपा करुन तिला दुसऱ्या शाळेत घाला.'' त्या सुंदर आणि तरूण शिक्षिकेने एक निःश्वास सोडला.

''माझी सहनशक्ती खरंच संपलीय आता.''

आईला धक्काच बसला. तोत्तोचाननं असं सगळ्या वर्गाला त्रास होण्यासारखं केलं तरी काय?

गोंधळून जाऊन बाईंच्या पापण्यांची उघडझाप होऊ लागली. आपले छोटे कापलेले केस कपाळावरुन मागे सारत बाईंनी पुढे सांगायला सुरुवात केली, ''पहिली गोष्ट म्हणजे ती तिचं डेस्क शंभर वेळा तरी उघडते आणि बंद करते. मी सांगितलं होतं, की कोणीही काही काढायचं असल्याशिवाय डेस्क उघडायचं नाही. तेव्हापासून तुमची तोत्तोचान सतत काहीतरी डेस्कमधून काढत किंवा ठेवत असते - एकदा वही तर एकदा पेन्सिल. एकदा पुस्तक नाही तर आणखी काही. आता समजा, आम्ही वर्गात मुळाक्षरं लिहीत असलो, तर ही डेस्क उघडते, वही काढते आणि धाडकन् ते बंद करते. मग ती पुन्हा ते उघडते. डोकं खुपसून पेन्सिल काढते. फटकन् डेस्क बंद करते आणि एक अक्षर लिहिते. पुन्हा ते चुकलं म्हणून किंवा खराब आलं म्हणून डेस्क उघडते. खोडरबर काढते, अक्षर खोडते आणि पुन्हा खोडरबर ठेवून ते बंद करते - आणि हे सगळं भयानक वेगानं. एक अक्षर लिहून झालं, की या सगळ्या वस्तू ती एकएक करुन आत ठेवते. दुसरं अक्षर लिहिण्याच्या वेळी सगळं पुन्हा तसंच- पहिल्यांदा वही, मग पेन्सिल, मग खोडरबर. प्रत्येक वेळी ती ते डेस्क उघडणार आणि बंद करणार. माझं डोकं अक्षरशः चक्रावून जातं आणि परत तिला काही बोलता येत नाही, कारण ती प्रत्येक वेळी ते कारणासाठीच उघडते आणि बंद करते.''

आता बाईंच्या पापण्यांची अधिकच वेगाने उघडझाप करू लागल्या. जणू त्यांच्या डोळ्यांसमोर जणू सगळंच्यासगळं चित्र तरळत होतं. तोत्तोचानच्या डेस्क उघडण्या आणि बंद करण्यामागचं कारण आत्ता आईच्या लक्षात आलं. तिला आठवलं; तोत्तोचान पहिल्या दिवशी शाळेतून घरी आली तेव्हा फारच खुषीत होती.

ती म्हणालीही होती, ''आई, शाळा खूपच मस्तंय्! माझ्या घरच्या डेस्कला बाहेरून उघडण्याचे खण आहेत; पण शाळेतल्यांना किनई वरुन उघडण्याचे कप्पे आहेत. ते डेस्क खोक्यासारखे आहेत माहितेय? आणि सगळ्या वस्तू त्याच्या पोटात ठेवता येतात.''

आईच्या डोळ्यांसमोर गजेनं डेस्क उघडणाऱ्या आणि बंद करणाऱ्या तोत्तोचानचं चित्र उभं राहिलं. तिनं ते गुद्दाम खोडसाळपणे केलं असं काही आईला वाटेना. त्यातलं नावीन्य ओसरलं, की ती हे आपोआपच बंद करेल अशी आईची खात्री होती.

ती फक्त एवढंच म्हणाली, ''मी तिला सांगेन!''

बाईचा आवाज आता चढला होता.

''अहो फक्त एवढंच असतं तर ठीक होतं, त्यांनी पुढे म्हटलं.

बाई पुढे वाकल्या, आई शरमून मागे सरकली.

बाई म्हणाल्या, ''पण जेव्हा ती तिच्या डेस्काशी खेळत नसते तेव्हा ती वर्गात उभी असते!''

''उभी असते? कुठेऽऽऽ?'' आईनं आश्चर्यानं विचारलं.

''खिडकीपाशी.'' बाईनी तुटकपणे सांगितलं.

''पण ती खिडकीपाशी का उभी राहाते?'' आई आता मात्र पुरती गोंधळून गेली होती.

''रस्त्यावरच्या बँडवाल्यांना बोलावण्यासाठी!'' बाई जवळजवळ ओरडल्याच.

बाईच्या एकूण सांगण्याचा सारांश असा होता : जवळजवळ तासभर डेस्कशी खेळून झाल्यावर तोत्तोचान सरळ खिडकीशी जाऊन बाहेर बघत राही. ती जोवर शांत आहे तोवर तिनं तसं करायलाही हरकत नाही असा विचार बाई करत असतानाच ती अचानकपणे रस्त्यावरच्या झकपक पोषाख केलेल्या बँडवाल्यांना, जोराने हाक मारत असे. बाईच्या दुर्दैवाने त्यांचा वर्ग तळमजल्यावर, रस्त्याला लागून होता. रस्ता आणि वर्ग यांच्यामध्ये फारच थोडं अंतर असल्यानं वर्गातून कोणीही रस्त्यावरून जाणाऱ्यांशी सहज बोलू शकत असे. तोत्तोचानची हाक ऐकून बँडवाले अगदी खिडकीशी येऊन उभे व्हायचे. तोत्तोचान ही बातमी सगळ्या वर्गाला ओरडून सांगायची. मग अख्खा वर्गच खिडकीशी गोळा व्हायचा. आणि गोंगाट सुरू व्हायचा.

''काहीतरी वाजवा नं!'' तोत्तोचान म्हणायची आणि मग एरवी शांतपणे जाणारे ते बँडवाले, विद्यार्थ्यांसाठी त्यांच्या पिपाण्या, ढोल, आणि झांजा मोठमोठ्याने वाजवायचे. बिचाऱ्या बाई मात्र हे सगळं थांबण्याची वाट पाहाण्याशिवाय काही करु शकत नसत.

शेवटी एकदा ते संगीत संपलं, की मगच मुलं आपापल्या जागेवर जायची. फक्त तोत्तोचान सोडून.

''तू अजून खिडकीत काय करते आहेस?'' असं बाईनी विचारल्यावर ती म्हणायची,

''अहो, दुसरा बँड येईल नं. दुसरा बँड आला आणि आपण खिडकीत नसलो तर तो तसाच निघून जाईल, मग आपण कसं ऐकणार त्याचं वाजवणं?''

''हे सगळं किती तापदायक होत असेल तुम्हीच विचार करा,'' बाई कळवळून म्हणाल्या.

आईलाही आता त्यांच्याविषयी सहानुभूती वाटायला लागली होती. एवढ्यात बाईनी अजून चढ्या आवाजात पुढे सांगायला सुरुवात केली, ''याहीपेक्षा जास्त म्हणजे...''

''ती अजून काय काय करते?'' आईचा धीर सुटत चालला होता.

''अजून काय काय? अहो ती अजून काय काय करते हे मला जरी मोजता

आलं असतं तरी मी तिला शाळेतून काढा म्हटलं नसतं.''

एक क्षणभर बाईंनी स्वतःला सावरलं.

आईकडे पाहात त्या म्हणाल्या, ''कालचीच गोष्ट, तोत्तोचान नेहमीप्रमाणेच खिडकीशी उभी होती आणि मी वर्गात धडा शिकवत होते. मला वाटलं ती रोजच्यासारखीच बँडवाल्यांची वाट पहात असणार.

तेवढ्यात तिनं कुणालातरी हाक मारली, 'ए, तुम्ही काय करता आहात?'

माझ्या जागेवरुन ती कोणाशी बोलतेय हेच मला दिसेना आणि काय चाललंय ते समजेना.

तेवढ्यात तिनं पुन्हा हाक मारली, 'ए, तुम्ही काय करता आहात?'

ती रस्त्यात कुणाला हाक मारत नव्हती तर वर पाहून कुणाशी तरी बोलत होती. मला राहावेना. मी उत्तर ऐकण्याचा प्रयत्न केला. पण काहीच ऐकू आलं नाही आणि तोत्तोचान तर इतक्या वेळा तोच तोच प्रश्न विचारत होती, की मला शिकवण्यात अडथळा यायला लागला. शेवटी मी खिडकीशी जाऊन कोण आहे ते पाहाण्याचा प्रयत्न केला. जेव्हा मी खिडकीबाहेर डोकं काढून वर पाहिलं तेव्हा दिसलं, की तिथे एक चिमण्यांची जोडी होती आणि त्या दोन चिमण्या वर्गाच्या वळचणीला घरटं बांधत होत्या. ती चिमण्यांशी बोलत होती. आता चिमण्यांशी बोलू नका असं मी म्हणत नाही, कारण मुलांच्या आवडी मला समजतात. पण तरीही तास चालू असताना मध्येच ''तुम्ही काय करता आहात'' असं चिमण्यांना विचारायचं म्हणजे...''

आईनं माफी मागण्यासाठी काही बोलण्याआधीच बाई म्हणाल्या, ''नंतर आमचा चित्रकलेचा तास होता. मी मुलांना जपानचा झेंडा काढायला सांगितला, इतर सगळ्यांनी तो बरोबर काढला; पण तुमच्या मुलीनं मात्र नौसेनेचा झेंडा काढायला सुरुवात केली. तुम्हाला माहितेय त्याच्यावर 'किरणं' रंगवलेली असतात? मी म्हणते तेही एकवेळ ठीक आहे. पण अचानक तिनं त्याच्याभोवती किनार रंगवायला सुरुवात केली. युवकदलांच्या फलकांवर असते नं? तशी. तिनं कुठंतरी पाहिली असणार. ती नेमकं काय करतेय हे मला समजण्यापूर्वीच तिनं पिवळ्या तेली खडूनं किनार काढली होती आणि ती सरळ कागदावरुन डेस्कावर गेली होती. तिच्या त्या झेंड्यानंच सगळा कागद व्यापला होता. त्यामुळं किनार काढायला जागाच नव्हती. तिनं पिवळा खडू घेतला आणि तिच्या झेंड्याच्या सगळ्या बाजूंनी सतराशेसाठ रेघा मारल्या -त्याही कागदाबाहेर जाणाऱ्या. डेस्कवर भयंकर रेघांचं जाळं झालं होतं. पुष्कळ प्रयत्न करुनही आम्हाला ते नीट खोडता आलं नाही. तरी बरं, त्या रेघा फक्त तीनच बाजूला होत्या.''

आईला जरा सुटल्यासारखं झालं. ''नशीब फक्त तीनच बाजूला.''

बाई जरा शांतपणे पण ठासून म्हणाल्या, ''अहो, पण जवळजवळ सगळा ध्वजस्तंभ कागदाबाहेर गेलाय आणि तो अजूनही डेस्कवर तसाच आहे.''

बाई उठल्या, ''मी एकटीच वैतागलेय असं नाही. शेजारच्या वर्गातल्या

बाईनाही फार त्रास झालाय.''

आईला आता काहीतरी करणं भागच होतं. कारण इतर विद्यार्थ्यांच्या दृष्टीनंही ते महत्त्वाचं होतं. तिला दुसरी शाळा शोधायला हवी होती. अशी शाळा, की जिथे तिच्या चिमण्या पोरीला समजून घेतील. आणि इतर लोकांत मिळून-मिसळून राहायला शिकवतील.

आत्ता ज्या शाळेत त्या चालल्या होत्या ती आईनं खूप शोधून आणि विचार करुन ठरवली होती.

शाळेतून काढल्याचं आईनं तोत्तोचानला सांगितलं नव्हतं, कारण तिला तिची चूक काय झाली हेच समजलं नसतं. आणि उगीच तिच्या मनातला गोंधळ वाढला असता. म्हणून तिनं तोत्तोचान मोठी होईपर्यंत काही सांगायचं नाही असं ठरवून टाकलं होतं.

आई फक्त एवढंच म्हणाली, ''तुला नवीन शाळेत जायला आवडेल? मी एका खूप छान शाळेबद्दल ऐकलंय.''

''चालेल....पण.....'' तोत्तोचान क्षणभर घोटाळली.



''पण काय?'' आईला शंका आली. हिला शाळेतून काढल्याबद्दल काही समजलं की काय?

पण तोत्तोचान निरागसपणे विचारत होती, ''ए पण आई, नव्या शाळेत बँडवाले येतील का गं?''

## नवी शाळा

नव्या शाळेच्या फाटकापाशीच तोत्तोचान थांबली. ती पूर्वी ज्या शाळेत जायची त्या शाळेच्या दाराला सिमेंट-काँक्रीटचे मोठे खांब होते. आणि त्यावर शाळेच्या नावाची मोठ्ठी पाटी होती. पण ह्या नव्या शाळेच्या दाराला मात्र दोन छोटेसे खांब होते. आणि त्यावर फांद्या आणि पानं उगवली होती.

''हे दार अजून वाढतंय वाटतं. हे बहुतेक टेलिफोनच्या खांबापेक्षाही उंच होईल का ग आई?''

ते दोन खांब म्हणजे चक्क दोन झाडंच होती. ती त्यांच्याजवळ गेली, तेव्हा तिला वाऱ्यामुळे एका बाजूला कललेली छोटीशी पाटी दिसली, ''तोमोई विद्यालय.''

''तोमोई म्हणजे काय?'' असं ती विचारणार एवढ्यात तिला जे दिसलं ते पाहून आपण स्वप्नात तर नाही ना असंच तिला वाटलं. तिनं झुडपांचं कुंपण जरा बाजूला करुन नीट पाहिलं, पण तिचा तिच्या डोळयांवर विश्वासच बसेना.

''आई, त्या मैदानात, तिकडे आगगाडी आहे का गं खरोखरीची?''

त्या शाळेमध्ये वर्ग म्हणून आगगाडीच्या सहा जुन्या डब्यांचा उपयोग केला होता. तोत्तोचानला तर आगगाडीतली शाळा म्हणजे स्वप्नात आल्यासारखं वाटत होतं.

'वर्गाच्या' खिडक्या सकाळच्या कोवळया उन्हात चकाकत होत्या आणि त्याहून जास्त झुडपांमधून त्यांच्याकडे पाहणाऱ्या गुलाबी गालांच्या एका चिमणीचे डोळे एका वेगळयाच आनंदानं लकाकत होते.

## ''मला शाळा खूप आवडली''

एका क्षणात तोत्तोचानने त्या कुक्‌गाडीतल्या शाळेकडे पळायला सुरुवात केली.

पळता पळता मागे वळून तिने आईला म्हटले, ''आई लौकर ये, ही बघ नं गाडी थांबलीय, आपण त्यात बसू या.''

बिचारी आई तिला पकडण्यासाठी धावत सुटली. सुदैवानं आई शाळेत असताना बास्केटबॉलच्या संघात होती. त्यामुळे ती तोत्तोचानहून अधिक जोराने धावली आणि तिनं लवकरच तोत्तोचानला गाठलं.

''हे बघ, आत्ताच तुला या गाडीत बसता येणार नाही,'' आईनं समजावून सांगितलं.

''हे डबे म्हणजे वर्ग आहेत इथले, आणि अजून तर तुझं नाव शाळेत घातलंही नाहीए आपण. तुला जर खरंच या डब्यात बसायचं असेल तर तू मुख्याध्यापकांशी नम्रतेनं आणि नीट बोलायला हवं. आपण आता त्यांच्याकडेच जाऊ या आणि तू चांगलं वागली तरच तुला या शाळेत घेतील, समजलं?''

'कुक्गाडीत' बसू दिलं नाही म्हणून खरं तर तोत्तोचानला खूप वाईट वाटलं होतं. पण तिनं आई म्हणेल तसं ऐकायचं ठरवलं होतं.

''समजलं,'' ती म्हणाली. ''मला ही शाळा खूप आवडलीय्.''

आईच्या मनात आलं, हिला सांगावं, की तिच्या आवडण्याचा आणि न आवडण्याचा प्रश्नच नाही आहे. मुख्याध्यापकांना ती आवडते की नाही हे महत्त्वाचं आहे. पण ती काहीच बोलली नाही. तिनं तोत्तोचानचा हात धरला आणि सरळ मुख्याध्यापकांच्या खोलीकडे चालायला सुरुवात केली.

सगळे गाडीचे डबे आता सकाळचे वर्ग सुरु झाल्याने शांत होते. भिंतीच्या ऐवजी शाळेच्या सर्व बाजूंनी झाडं होती. आणि मैदानावर जिकडे तिकडे लाल-पिवळ्या फुलांचे ताटवे फुललेले होते.

मुख्याध्यापकांची कचेरी मात्र आगगाडीच्या डब्यात नव्हती. ती उजव्या हाताला एका अर्धवर्तुळाकार ओट्यावर असलेल्या एकमजली इमारतीमध्ये होती. आईचा हात सोडून तोत्तोचान पळतच सात-आठ पायऱ्या चढली आणि अचानक थांबून तिनं वळून आईकडं पाहिलं.

''काय गं झालं?'' हिनं विचार तर बदलला नाही नं, या भीतीनं आईनं विचारलं.

एक पायरी चढून तोत्तोचाननं हळूच आईच्या कानात विचारलं, ''आई, आपण आता ज्यांना भेटणार आहोत ते स्टेशनमास्तर आहेत का गं?''

आईलाही जरा गंमत करण्याची लहर आली.

तिनंही गंभीरपणे हलक्या आवाजात विचारलं, ''का गं?''

तोत्तोचाननं दबक्या आवाजात सांगितलं, ''तू म्हणालीस की ते मुख्याध्यापक आहेत, पण या सगळ्या कुक्गाड्या त्यांच्या असतील तर ते नक्कीच स्टेशनमास्तर असणार.''

रेल्वेच्या डब्यात शाळा हे जरा विचित्रच. हे आईलाही मान्य होतं. पण आता समजावत बसायला वेळ नव्हता.

ती म्हणाली, ''तू त्यांनाच का नाही विचारत? आणि हे बघ, तुझे बाबा नाही का व्हायोलिन वाजवत, म्हणून त्यांच्याकडे किती प्रकारची व्हायोलिनं आहेत की नाही? म्हणून आपलं घर काय लगेच व्हायोलिनचं दुकान होतं का?''

''नै,'' तोत्तोचानला पटलं. आईचा हात धरून ती निघाली.

## मुख्याध्यापक

आई आणि तोत्तोचान खोलीत शिरल्याबरोबर खुर्चीत बसलेले गृहस्थ त्यांच्या स्वागतासाठी उठले.

त्यांच्या डोक्याला जवळजवळ टक्कल होतं आणि काही दातही पडलेले होते. पण चेहरा मात्र प्रसन्न आणि तरतरीत दिसत होता. ते फार उंच नव्हते, पण रुंद खांद्यामुळे धिप्पाड वाटत होते. त्यांनी अंगात काळया रंगाचा जुनाट सूट घातला होता.

त्यांना घाईघाईनं झुकून नमस्कार करत तोत्तोचाननं उत्साहानं विचारलं, ''तुम्ही मुख्याध्यापक आहात की स्टेशनमास्तर?''

आईला ओशाळल्यासारखं झालं, पण ती काही बोलण्याच्या अगोदरच ते हसून म्हणाले, ''मी या शाळेचा मुख्याध्यापक आहे.''

तोत्तोचान खूष झाली.

''किती छान!'' ती म्हणाली.

''मी तुम्हाला एक सांगू? या शाळेत यायला खूप आवडेल मला.''

मुख्याध्यापकांनी तिला बसायला खुर्ची दिली आणि आईकडे वळून ते म्हणाले, ''तुम्ही गेलात तरी हरकत नाही, मला तोत्तोचानशी गप्पा मारायच्या आहेत.''

तोत्तोचान एक क्षणभर गोंधळली. पण दुसऱ्याक्षणी तिनं स्वतःला सावरलं. आपण यांच्याशी गप्पा मारू शकू याचा तिला विश्वास वाटला.

''ठीक आहे मग. हिला तुमच्याजवळ सोडून मी निघते आता.'' आईने जाता जाता खोलीचं दार ओढून घेतलं.

मुख्याध्यापकांनी त्यांची खुर्ची पुढे ओढून घेतली आणि तिच्या समोर बसत ते म्हणाले, ''हं आता मला तुझ्याबद्दल सांग. तुला काय हवं ते सांग.''

''मला हवं ते?'' तोत्तोचानला वाटलं होतं तिला बऱ्याच प्रश्नांना उत्तरं द्यावी लागतील. पण ती काहीही बोलली तरी चालेल हे ऐकून तिला इतका आनंद झाला, की काय बोलू न् काय नको असं होऊन गेलं. तिनं ती ज्या गाडीनं आली ती किती जोरात आली, ते सांगितलं, तिकिटतपासनीसानं तिचं तिकीट कसं काढून घेतलं, तिच्या पहिल्या शाळेच्या वर्गशिक्षिका किती छान होत्या. चिमण्यांचं घरटं कसं होतं, मग तिनं तिच्या रॉकीबद्दल सांगायला सुरुवात केली. रॉकी म्हणजे तिचा चॉकलेटी रंगाचा कुत्रा. त्याला सगळ्या प्रकारचे खेळ यायचे. बाबा कसं छान पोहतात आणि सूरही कसा छान मारतात. ती असं बरंच काही काही सांगत राहिली. मधेच मुख्याध्यापक विचारायचे, ''मग पुढे?''

आणि मग खुशीत येऊन तोत्तोचान आणखी सांगत राहिली. पण शेवटी तिला काहीच सुचेना. आता सगळं सांगून झाल्यासारखं वाटत होतं.

''बस् एवढंच? अजून काही सांगायचं नाही?'' मुख्याध्यापकांनी विचारलं.

तोत्तोचानच्या मनात आले, अरेरे, कधीतरीच अशी वेळ येते! तिला अजून सांगण्यासारखं काही तरी हवं होतं. तिनं खूप विचार केला तेवढ्यात तिला सुचलं. तिनं तिच्या आज घातलेल्या कपड्याविषयी काहीच सांगितलं नव्हतं. तिचे बहुतेक सगळे कपडे आईच शिवायची, पण आजचा ड्रेस मात्र आयताच आणला होता. ती दुपारी घरी यायची तेव्हा तिचे कपडे नेहमीच फाटलेले असायचे. ते तसे का व्हायचे हे आईला कधीच समजलं नाही. तिनं मुख्याध्यापकांना सांगितलं, की ती जेव्हा सरपटत-सरपटत इतरांच्या बागेच्या तारेच्या कुंपणाखालून जायची तेव्हा ते कपडे फाटायचे. आज सकाळी सुद्धा ती शाळेत जायला निघाली तेव्हा आईनं शिवलेले सगळे चांगले कपडे फाटले होते. म्हणून मग तिला विकत आणलेला ड्रेस घालावा लागला. त्याच्यावर लाल आणि राखाडी चौकड्या होत्या आणि तो छान होता. पण आई म्हणाली, की कॉलरवरची ती भरलेली फुलं काही एवढी छान नव्हती दिसत.

मुख्याध्यापकांना ती कॉलर दाखवत ती म्हणाली, ''आईला नं आवडत नाही ही कॉलर.''

त्यापुढे काय बोलावं हे तिला सुचेना पण तेवढ्यात मुख्याध्यापकच उठले आणि प्रेमळ हाताने तिचा खांदा थोपटत म्हणाले. ''आजपासून तू या शाळेची विद्यार्थिनी झालीस हं.''

बस्स, एवढेच शब्द ते बोलले आणि तोत्तोचानला जाणवलं, आजपर्यंत त्यांच्याइतकं कुणीच तिला आवडलं नव्हतं. कारण आतापर्यंत इतका वेळ तिचं बोलणं कुणीच ऐकून घेतलं नव्हतं. आणि तेही इतक्या मनापासून, एकदाही जांभई न देता किंवा न कंटाळता.

तोत्तोचानला अजून घड्याळ समजत नव्हतं; पण ते जर तिला समजलं असतं तर तिला धक्काच बसला असता आणि त्याहीपेक्षा जास्त तिला त्याच्याविषयी कृतज्ञता वाटली असती. कारण ती जेव्हा शाळेत आली तेव्हा सकाळचे आठ वाजले होते आणि जेव्हा मुख्याध्यापकांनी तिला ''तू या शाळेची विद्यार्थिनी झालीस'' असं सांगितलं तेव्हा खिशातून घड्याळ काढून ते म्हणाले, ''चला आता जेवणाची वेळ झाली.'' म्हणजे मुख्याध्यापकांनी तब्बल चार तास तिचं ऐकून घेतलं असणार.

त्यापूर्वी किंवा त्यानंतरही तोत्तोचानचं इतका वेळ कुणीही ऐकून घेतलं नव्हतं आणि आईला आणि वर्गशिक्षकांना तर सात वर्षांची मुलगी एवढं बोलली तरी काय, याचंच आश्चर्य वाटलं असतं.

तोत्तोचानला अर्थातच तिला शाळेतून काढून टाकलंय याची कल्पनाच नव्हती आणि ती पूर्वीइतकीच निष्पाप निरागसपणे वावरत होती. खोल मनात कुठेतरी सगळे लोक आपल्याला वेगळं वागवतात एवढंच तिला जाणवलं होतं. पण मुख्याध्यापकांमुळे मात्र तिला खूप सुरक्षित, मोकळं आणि आनंदी वाटत होतं, त्यांच्याबरोबर नेहमी रहावं असं आता तिला वाटायला लागलं होतं आणि सुदैवानं

मुख्याध्यापक सोसाकु कोबायाशी यांनाही तिच्याबद्दल तसंच वाटत होतं.

## दुपारचे जेवण

कोबायाशींनी तोत्तोचानला सगळी मुलं जिथं डबा खात तिकडे नेलं.

''जेवण गाडीत नाही सभागृहात असतं.'' त्यांनी सांगितलं. उंच दगडी पायऱ्यांवर सभागृह होतं. ते दोघं तिथं पोचले तेव्हा मुलं नाचत बागडत टेबलखुर्च्या गोलाकार मांडत होती.

कोपऱ्यात उभ्या असलेल्या तोत्तोचाननं मुख्याध्यापकांना विचारलं, ''बाकीची मुलं कुठैत?''

''एवढीच मुलं आहेत इथं,'' ते म्हणाले.

''एवढीच?'' तोत्तोचानचा विश्वासच बसेना. तिच्या पहिल्या शाळेत फक्त पहिलीत एवढी मुलं होती.

''म्हणजे आख्ख्या शाळेत फक्त पन्नासच मुलं आहेत?''

''बरोबर,'' ते म्हणाले.

''या शाळेचं सगळंच निराळं आहे.'' तिच्या मनात आलं.

सगळे नीट बसल्यावर मुख्याध्यापकांनी विचारलं,'' सगळ्यांनी काहीतरी समुद्रातलं आणि काहीतरी डोंगरावरचं आणलंय की नाही?'

''होऽऽऽऽ.'' आपापले डबे उघडता उघडता सगळ्यांनी एका सुरात उत्तर दिलं.

''पाहूया बरं काय काय आणलंय?'' गोलाकार हिंडत आणि एकेकाचा डबा बघत मुख्याध्यापक विचारत होते आणि मुलं उत्साहानं आणि आनंदानं दाखवत होती. किती मज्जा! तोत्तोचानला वाटलं. पण समुद्रातलं काही तरी आणि डोंगरावरचं काहीतरी म्हणजे काय असेल? ही शाळा खूपच वेगळी आहे-खूप गंमतीशीर. शाळेत डबा खाणं इतकं मजेशीर असेल असं तिला पूर्वी कधी वाटलंच नव्हतं. उद्या या बाकावर तीही असेल आणि मुख्याध्यापकांना ती तिच्या डब्यात ''समुद्रातलं काहीतरी आणि काहीतरी डोंगरावरचं'' दाखवत असेल या नुसत्या कल्पनेनंसुद्धा तिला उड्या माराव्याशा वाटत होत्या. मुलांचे डबे बघत हिंडणाऱ्या मुख्याध्यापकांच्या रुंद खांद्यावर दुपारची कोवळी उन्हं विसावली होती. '

## शाळेचा पहिला दिवस

''तू आता या शाळेची विद्यार्थिनी झालीस'' हे मुख्याध्यापकांचं ऐकल्यापासून दुसरा

दिवस कधी उजाडतोय असं तिला झालं होतं. दुसऱ्या दिवसाची इतक्या उत्साहानं वाट तिनं कधीच पाहिली नव्हती. एरवी सकाळी उठण्यासाठी आईला त्रास देणारी तोत्तोचान त्या दिवशी मात्र कुणीही न उठवता उठून व्यवस्थित आवरुन शाळेचं दप्तर घेऊन तयार झाली होती.

घरात सगळ्यात वक्तशीर म्हणजे ''रॉकी.'' जर्मन शेफर्ड जातीचा कुत्रा, त्याला मात्र तोत्तोचानचं आजचं वेगळं वागणं समजेचना. बराच वेळ तिचं निरीक्षण केल्यानंतर तो तिच्या जवळ येऊन उभा राहिला. ती काहीतरी बोलेल या आशेनं.

आईला बरीच कामं होती. तिनं ''काहीतरी समुद्रातलं आणि काहीतरी डोंगरावरचं'' घालून घाईघाईनं डबा भरला. तोत्तोचाननं भराभर न्याहारी उरकली. आईनं तिचा आगगाडीचा पास एका प्लॅस्टिकच्या पिशवीत घालून हरवू नये म्हणून तिच्या गळ्यात घातला.

''शहाणी मुलगी हो!'' तोत्तोचानच्या केसातून हात फिरवीत बाबा म्हणाले.

''हो तर!'' बूट घालता घालता तोत्तोचान म्हणाली. मग दार उघडून मागे वळून बघत म्हणाली, ''अच्छाऽऽऽ.''

आईच्या डोळ्यात टच्कन पाणी आलं. या इतक्या उत्साही आणि आज्ञाधारक पोरीला नुकतंच शाळेतून काढून टाकलं होतं यावर विश्वास ठेवणं अवघड होतं. ''परेमश्वरा, यावेळी तरी सर्व काही नीट होऊ दे!'' आई मनातल्या मनात प्रार्थना करत होती.

क्षणातच तोत्तोचनाला गळ्यातला पास काढून रॉकीच्या गळ्यात घालताना पाहून तिला धक्काच बसला. ''अगं राणी तू...'' पण तिनं शांतपणे काय होईल ते बघायचं ठरवलं.

रॉकीच्या गळ्यात पास घालून, तोत्तोचाननं खाली वाकून त्याला सांगितलं, ''ए, पण हा पास तुला छान नाही दिसत.''

पासाची दोरी फारच लांब होती आणि पास जमिनीवर लोळत होता.

''हा माझा पास आहे. तुझा नाही. कळलं? तुला नै कै गाडी बसता येणार. पण मी मुख्याध्यापकांना आणि स्टेशनवरच्या माणसाला विचारेन, तुला गाडीत बसू देतील का? आणि तुला शाळेत येता येईल का म्हणून, हं?''

रॉकी कान टवकारुन तिचं बोलणं ऐकत होता. पण पास देऊन टाकल्यावर त्यानं जांभई दिली. तोत्तोचान पुढे सांगत राहिली– ''आमच्या वर्गाची गाडी हालत नाही त्यामुळे त्यात बसायला बहुधा तुला तिकीट पडणार नाही, पण आजच्या दिवस मात्र घरीच थांब हंऽऽ.''

रॉकी नेहमी तिला शाळेपर्यंत सोडायला जात असे. त्याला वाटलं आजही तसंच करायचं. तोत्तोचाननं पास व्यवस्थित गळ्यात घातला. आणि परत एकदा ओरडून आई–बाबांना 'अच्छा' केला आणि वळूनसुध्दा न पाहाता ती स्टेशनकडे पळत सुटली आणि तिच्या मागोमाग रॉकीही.

स्टेशनचा आणि तिच्या पूर्वीच्या शाळेचा रस्ता एकच होता. त्यामुळे तोत्तोचानला रस्त्यात तिच्या ओळखीची 'मनीमाऊ' भेटली आणि तिच्या जुन्या शाळेतील मुलं-मुली सुध्दा.

तोत्तोचान आज डावीकडे न वळता उजवीकडे स्टेशनच्या बाजूला का वळली हे बिचाऱ्या रॉकीला उमगेचना. तो इकडे तिकडे बघत असेपर्यंत तोत्तोचान स्टेशनच्या फाटकापर्यंत पोचली होती. इतक्यात तिच्या लक्षात आलं.

ती गोंधळलेल्या रॉकीकडे वळून म्हणाली, ''मी आज नेहमीच्या शाळेत नाही चाललेय्. आजपासून किनई मी नव्या शाळेत जाणारे.''

तिनं रॉकीच्या गालावर गाल घासले. त्याच्या कानांचा वास तोत्तोचानला फार आवडायचा.

''अच्छाऽऽऽ.'' तिनं रॉकीला सांगितलं आणि दारावरच्या माणसाला पास दाखवून तिनं स्टेशनच्या पायऱ्या चढायला सुरुवात केली. ती नजरेआड होईपर्यंत रॉकी शेपूट हालवत पाहात राहिला.

## झुक्गाडीतला वर्ग

तोत्तोचान जेव्हा आगगाडीच्या डब्यांपाशी पोचली तेव्हा अजून कोणीसुध्दा आलं नव्हतं. तिला जिथे बसायचं होतं तो डबा तिला मुख्याध्यापकांनी सांगून ठेवला होता. तो एक जुन्या पध्दतीचा आगगाडीचा डबा होता. त्याच्या दाराला बाहेरच्या बाजूनं असलेली मूठ धरुन दार सरकवता यायचं. तोत्तोचानचा आनंद गगनात मावत नव्हता.

''अय्याऽऽऽ!'' ह्याच्यात बसून शिकायचं म्हणजे मस्त गावाला निघाल्यासारखं वाटणार. खिडक्यांच्यावर अजूनही सामान ठेवायचे कप्पे होते. फरक एवढाच होता, की डब्याच्या एका बाजूला फळा होता आणि आगगाडीत असलेल्या लांब-लांब बाकांऐवजी एका बाजूला तोंड केलेली शाळेची बाकं होती. हातांनी पकडायचे चामडी पट्टे तेवढे काढून टाकले होते. बाकी सगळा डबा जसाच्या तसा होता. ती आत शिरली आणि एका खुर्चीवर जाऊन बसली. इथल्या लाकडी खुर्च्यासुद्धा मागच्या शाळेतल्यासारख्याच होत्या. तरीही या खुर्चीवर दिवसभर बसावंसं तिला वाटत होतं. तोत्तोचानला ही शाळा इतकी आवडली, की कधीसुद्धा दांडी न मारण्याचा तिनं निश्चयच करुन टाकला.

तिनं खिडकीबाहेर बघितलं. खरं तर गाडी एका जागेवर उभी आहे हे तिला माहीत होतं. पण बाहेरच्या बागेत डोलणाऱ्या झाडांफुलांमुळे असेल कदाचित् तिला गाडी हलल्यासारखी वाटत होती.

किती मज्जा!'' अखेर ती मोठ्यानं म्हणाली. खिडकीच्या काचेला नाक लावून तिनं गाणं गुणगुणायला सुरुवात केली. ती खुषीत असली, की असंच गुणगुणत असे.

''किती मजा वाटतेय मला
मला खूप मजा वाटतेय.
का मजा वाटतेय मला
कारण.........''

आणि तेवढ्यात कुणीतरी आत आलं. त्या मुलीनं तिची वही पेन्सिल काढली आणि आपल्या बाकावर ठेवली. मग चवड्यावर उभं राहून तिनं तिचं दप्तर कप्प्यात ठेवून दिलं. तोत्तोचाननंही ते पाहून तसंच केलं. नंतर एक मुलगा आत आला. दरवाजातच उभं राहून त्यानं बास्केटबॉलचा बॉल टाकावा तसं दप्तर कप्प्याकडे फेकलं. पण ते उडून खाली पडलं. ''हँऽऽ नेम चुकला!'' असं म्हणत त्यानं परत नेम धरुन दप्तर टाकलं. आता मात्र ते नीट बसलं. ''हांऽऽ आता कसं!'' पण परत 'चुकलं चुकलं' म्हणत त्यानं बाकावर उडी मारुन वही–पेन्सिल काढण्यासाठी दप्तर उघडलं.

त्यांच्या डब्यात सगळी मिळून फक्त नऊ मुलं होती. हा तोमोई विद्यालयाचा पहिलीचा वर्ग.

ते सगळे आता एकाच डब्यातून प्रवासाला निघणार होते.

## तोमोईतील अभ्यास

आगगाडीच्या डब्यात वर्ग घेण्यापेक्षाही तिथली बसण्याची पद्धत जगावेगळी होती. पूर्वीच्या शाळेत प्रत्येकाची बसण्याची जागा ठरवून दिलेली होती. पण इथे मात्र ज्याला जिथे बसायचं असेल तिथे बसण्याची मोकळीक होती.

खूप विचार करुन तोत्तोचाननं त्या तिच्यानंतर आलेल्या मुलीजवळ बसायचं ठरवलं. कारण तिनं लांब कानाच्या सशाचं चित्रं असलेल्या गुलाबी रंगाचा फ्रॉक घातला होता.

या शाळेतली सगळ्यात वेगळी गोष्ट काय असेल तर तिथले तास. सर्वसाधारणपणे प्रत्येक शाळेमध्ये प्रत्येक तासाचे विषय ठरलेले असतात. म्हणजे समजा, पहिला तास भाषेचा असेल तर पूर्ण तास भाषेचा अभ्यास. मग समजा दुसरा तास गणित तर फक्त गणिताचा. पण इथे मात्र सगळंच निराळं. सुरुवातीलाच बाई त्या संपूर्ण दिवसात काय–काय करायचं याची यादी करून द्यायच्या आणि त्या त्या विषयांचे प्रश्न सांगायच्या.

मग मुलांना त्या म्हणायच्या, ''हंऽ आता तुम्हाला हव्या त्या विषयाला सुरूवात करा.''

त्यामुळे तुम्ही भाषा, गणित, विज्ञान आणखी काहीही केलं तरी बिघडायचं नाही. मग कुणी निबंध लिहीत असेल तर तुमच्या मागं काचपात्रामध्ये काहीतरी अल्कोहोलच्या दिव्यावर तापवत कुणी प्रयोग करीत असेल. कुणी गणित सोडवत

असेल तर एखादा इतिहासप्रेमी इतिहासात मग्न असेल.

शिकवण्याच्या या पद्धतीमुळे शिक्षकांना मुलांचं अधिक निरीक्षण करता यायचं. त्यांची प्रगती, त्यांच्या आवडीनिवडी आणि त्यांची विचार करण्याची पद्धत अधिक जवळून समजून घेणं शक्य व्हायचं. विद्यार्थ्यांना समजून घेण्याची ती आदर्श पद्धत होती.

मुलांच्या बाबतीत सांगायचं तर त्यांना आवडत्या विषयानं सुरुवात करायला आवडायचं आणि नावडते विषय शिकायला आख्खा दिवस असायचा. त्यामुळे ते कसेबसे का होईना पण पूर्ण व्हायचे. सगळा अभ्यास जवळजवळ स्वतंत्रपणे करावा लागायचा. फक्त अडचण येईल तिथेच शिक्षकांची मदत घ्यायची. मग शिक्षक जवळ येऊन नीट समजेपर्यंत समजावून सांगत आणि अडचण सोडवत. तो खऱ्या अर्थानं अभ्यास होता आणि त्यामुळे विद्यार्थी नुसतेच बसून ऐकताहेत असं कधीच झालं नाही.

पहिलीतल्या मुलांना अजून तितकासा स्वतंत्रपणे अभ्यास करता येत नव्हता. तरीही त्यांना हवा तो अभ्यास करण्याची परवानगी होती.

काहीजण अक्षरं गिरवत होते. तर काही चित्रं काढत होते. कुणी पुस्तक वाचत होते, तर कुणी चक्क संगीताच्या तालावर कवायत करत होते. तोत्तोचानच्या शेजारची मुलगी वहीत अक्षरं लिहीत होती. पण तोत्तोचानला मात्र हा प्रकारच इतका नवा होता, की काय करावं हे न सुचल्यामुळे ती नुसतीच बसली होती. तेवढ्यात तिच्या मागचा एक मुलगा उठून बाईकडे निघाला. त्याला काहीतरी शंका आली असेल. बाई दुसऱ्या कुणालातरी समजावून सांगत होत्या. तोत्तोचानची नजर त्या बाईकडे जाणाऱ्या मुलावर स्थिरावली होती. तो काहीतरी वेगळाच चालत होता. चालताना एक पाय किंचित् फरफटल्यासारखा वाटत होता. पहिल्यांदा तिला वाटलं तो मुद्दामच तसं चालतोय. पण नंतर तिला जाणवलं तो मुद्दाम तसं करत नव्हता.

तो परत बाकाकडे आला तरी तोत्तोचान एकटक त्याच्याकडे पाहात होती. तो तिच्याकडे बघून किंचित् हसला आणि त्याच्या बाकाकडे गेला. इतर मुलांपेक्षा त्याला बसायला जरा जास्त वेळ लागला.

ती घाईघाईने त्याच्याकडे वळून म्हणाली. ''तू असा का चालतोस रे?''

त्याने शांतपणे आणि खूप मऊ आवाजात सांगितलं, ''मला पोलिओ झाला होता.''

''पोलिओ?'' तोत्तोचाननं हा शब्दसुद्धा ऐकला नव्हता.

''हो, माझ्या पायालाच नाही, हातालासुध्दा झाला होता.'' त्यानं आपला डावा हात पुढे केला. त्याची लांबसडक बोटं वाकडी दिसत होती आणि एकमेकांना चिकटल्यासारखी वाटत होती.

''याला काही औषध नाहीए का रे?'' तिनं विचारलं.

पण तो काहीच बोलला नाही. उगीच विचारलं असं वाटून तोत्तोचानला ओशाळल्यासारखं झालं.

तेवढ्यात तोच उत्साहानं म्हणाला, 'माझं नाव यासुआकी यामामोतो. तुझं?''

त्याला उत्साहानं बोलताना ऐकून तिला खूप बरं वाटलं.

ती पटकन् म्हणाली, ''माझं नाव तोत्तोचान.''

आणि तेव्हापासून तोत्तोचान आणि यासुआकी यामामोतोची पक्की दोस्ती झाली.

उन्हानं वर्गात उकडायला लागलं होतं. कुणी तरी खिडकी उघडली आणि मुलांच्या केसांना भुरभुरवत वाऱ्याची एक हलकी झुळूक वर्गात शिरली...

तोत्तोचानचा तोमोई-विद्यालयातला पहिला दिवस असाच उत्साहानं सुरु झाला होता.

## समुद्रातलं काहीतरी, डोंगरावरचं काहीतरी

आता तोत्तोचान ज्याची अतिशय उत्सुकतेने वाट पाहात होती, त्या जेवणाच्या सुट्टीची वेळ झाली होती.

''काहीतरी समुद्रातलं आणि काहीतरी डोंगरावरचं.'' मुख्याध्यापकांनी हा वाक्प्रचार, मुद्दाम चौरस आहार आणि भाताशिवाय इतरही पदार्थ असे सुचविण्यासाठी तयार केलेला होता. ''तुमच्या मुलांना सगळं खायला शिकवा आणि त्यांच्या डब्यात पोषक आहारच असेल असं पाहा,'' असं ते पालकांना सांगत. आणि म्हणूनच डब्यामध्ये रोज समुद्रातलं काही तरी आणि डोंगरावरचं काही तरी असलंच पाहिजे असा त्यांचा कटाक्ष होता.

समुद्रातलं काहीतरी म्हणजे मासे, खारवलेली सुकी मासळी, समुद्री गवत इत्यादी, तर टेकडीवरचं काहीतरी म्हणजे भाज्या, डुकराचं, गायीचं किंवा कोंबडीचं मांस, अंडी वगैरे.

आई तर या प्रकाराने फारच प्रभावित झाली होती. फारच थोडे मुख्याध्यापक इतकी महत्त्वाची गोष्ट इतक्या सोप्या शब्दात मांडू शकतात आणि शिवाय दोनच प्रकारांमधून पदार्थांची निवड करायची असल्याने डबा बनविणे फारच सोपे झाले होते. मुख्याध्यापकांच्या मते या दोन प्रकारचे पदार्थ डब्यात देण्यासाठी जास्त विचारही करण्याची गरज नव्हती. डोंगरावरच्या जेवणात फक्त बटाट्याचा किंवा रताळ्याचा परतलेला कीस किंवा आम्लेट आणि समुद्रातल्या पदार्थांमध्ये फक्त समुद्री गवत इतकंच असलं तरी पुरे. डबा तयार करणंही सोपं आणि शिवाय आवश्यक ते सर्व अन्नघटक हसतखेळत पोटात जाणार.

आदल्या दिवशीप्रमाणेच मुख्याध्यापकांनी सगळ्यांचे डबे बघितले.

''सगळ्यांच्या डब्यात समुद्रातलं काहीतरी आणि डोंगरावरचं काहीतरी आहे ना?'' त्यांनी विचारलं. प्रत्येकानं समुद्रातलं काय आणि डोंगरावरचं काय आणलंय हे जाणून घेताना सर्वांना फार गंमत यायची.

कधी कधी एखाद्याच्या आईला खूप काम असायचं. मग त्या दिवशी त्या मुलाच्या डब्यात फक्त समुद्रातलं काहीतरी किंवा फक्त डोंगरावरचं असायचं. पण बिघडत नाही. मुख्याध्यापक सगळ्यांचे डबे पाहात फिरायचे तेव्हा त्यांच्या पत्नी त्यांच्याबरोबर दोन्ही हातात दोन ताटं घेऊन हिंडत असत. मुख्याध्यापक जर एखाद्या विद्यार्थ्यांसमोर थांबले आणि म्हणाले, की 'समुद्र' तर लगबगीनं समुद्राच्या ताटामधून एकदोन उकडलेल्या माशांच्या सुरळ्या त्या मुलाच्या डब्यात वाढायच्या, आणि जर ते म्हणाले, की 'डोंगर' तर त्या डोंगराच्या ताटामधून बटाट्याचे उकडलेले काप द्यायच्या.



मला माशाच्या सुरळ्या किंवा बटाट्याचे काप आवडत नाहीत असं म्हणणं कुणाच्या स्वप्नातसुध्दा यायचं नाही. किंवा अमक्या-तमक्याच्या डब्यात किती छान जेवण असतं किंवा अमका-तमका बिचारा रोजच शिळं-पाकं आणतो. नाही! असलाही विचार त्या मुलांच्या मनाला कधी शिवला नाही. आपल्या डब्यात दोन्ही गोष्टी आहेत की नाही एवढंच त्यांच्या डोक्यात असायचं. तेवढं असलं, की ते खूप.

काहीतरी समुद्रातलं आणि काहीतरी डोंगरावरचं म्हणजे नक्की काय हे हळुहळू समजायला लागल्यावर तोत्तोचानला मात्र काळजी वाटत होती. आईनं घाईघाईनं भरलेला डबा नीट नाही असं मुख्याध्यापक म्हणाले तर? पण तिनं डबा उघडला मात्र, ती जवळ जवळ ओरडलीच:

''अय्या! किती मस्त!''

तिच्या डब्यात छानशी पांढरी-पिवळी अंड्याची भाजी, हिरवे वाटाणे, चॉकलेटी देन्बू म्हणजे माशाचा कीस आणि गुलाबी रंगाचा कोंडमाशापासून केलेला खाऊ. फुलबागेसारखा रंगीबेरंगी डबा होता तो.

'अरे व्वा!' मुख्याध्यापक म्हणाले. तोत्तोचान एकदम खूष झाली.

''आई फार छान स्वयंपाक करते,'' तिने मुख्याध्यापकांना सांगितलं.

''असं? बरं आता एक सांग,'' देन्बूकडे बोट दाखवीत ते म्हणाले:

''हे काय आहे? समुद्रातलं की डोंगरावरचं सांग पाहू?''

''अं?'' तोत्तोचाननं देन्बूकडे पाहिले. रंग तर मातीसारखा आहे...... म्हणजे बहुधा डोंगरचंच. पण....तिची खात्री होईना.

''मला नाही माहीत.'' तिनं कबूल करुन टाकलं.

मग मुख्याध्यापकांनी संपूर्ण वर्गाला विचारलं, ''देन्बू कुठून येतात? समुद्रातून की डोंगरावरुन?''

क्षणभर सगळेच विचारात पडले. मग काही म्हणाले, ''समुद्रातून'' आणि काही म्हणाले, ''डोंगरावरुन!'' पण कोणालाच नक्की खात्री नव्हती.

''ठीक. मी सांगतो.'' मुख्याध्यापक म्हणाले. ''देन्बू समुद्रातून येतं.''

''कशावरुन?'' एका गुबगुबीत मुलानं शंका काढली.

बाकांच्या मध्यभागी उभं राहून मुख्याध्यापकांनी समजावून सांगितलं, ''असं पहा, शिजवलेल्या माशाचं मांस काढून किंवा भाजून छोटे, छोटे तुकडे करुन ते वाळवून देन्बू करतात.''

त्या नवीन माहितीनं मुलं भारावली होती.

''आम्ही तोत्तोचानच्या डब्यातले देन्बू पाहू?''

''पाहा की,'' मुख्याध्यापक म्हणाले आणि आख्खा वर्ग तिच्याभोवती गोळा झाला. खरं म्हणजे ''देन्बू'' कसं असतं हे बघितलेली मुलंसुद्धा त्यांच्यात

होती. पण त्यांच्या घरच्या देन्बूमध्ये आणि तिच्या डब्यातल्या देन्बूमध्ये काही फरक आहे का हे बघण्याची त्यांना उत्सुकता होती. त्यामुळे बरेचजण तिच्या देन्बूचा वास घेऊन बघत होते. ''आता सगळा वास बहुधा उडून जाणार.'' अशी धाकधूक तिला वाटत होती. ती किंचित उदास झाली, पण तरीही त्या पहिल्या दिवशी खूप मजा आली होती.

समुद्रातलं थोडं आणि डोंगरावरचं काहीतरी म्हणजे काय हे समजून घेणं खूपच गमतीशीर होतं. आईनंही डबा काहीही न विसरता भरला होता. शिवाय देन्बू माशापासून तयार करतात ही नवी माहिती तिला मिळाली होती.

डबा खायला लागल्यावर तिच्या लक्षात आलं, त्या दिवशीचे सगळे पदार्थ फारच 'मस्त' झाले होते.

## ''बत्तीस वेळा चावून खावा''

जपानमध्ये सर्वसाधारणपणे जेवायला सुरुवात करताना ''इतादाकिमासु'' (मी कृतज्ञतेने स्वीकार करते) असं म्हणायची पद्धत होती. पण तोमोईचं सगळंच निराळं होतं. जेवण तरी त्याला अपवाद कसं असणार? तोमोईमध्ये जेवण्याआधी गाणं म्हणण्याची पध्दत होती. मुख्याध्यापकांनी स्वतः रचलेलं ते छोटसं गाणं होतं आणि एका प्रसिद्ध गाण्याची चाल त्याला लावली होती. खरं तर किती साधं होतं ते गाणं–

बत्तीस वेळा चावून खावा
प्रत्येक घास जेवताना
हसत मुखाने नेहमी खावा
प्रत्येक खाऊ खाताना
भात असो वा मासे
किंवा अंड्याची पोळी खाताना
बत्तीस वेळा चावून खावा
प्रत्येक घास जेवताना.

पण मुलांच्या मनात हे गाणं इतकं पक्कं बसलं होतं, की शाळा सोडल्यानंतरही कित्येक वर्ष त्यांना हे गाणं जेवणाआधी म्हणायचं गाणंच आहे असं वाटायचं.

मुख्याध्यापकांचे काही दात पडलेले असल्यामुळे कदाचित् त्यांनी हे गाणं तयार केलं असेल, पण ते मुलांना नेहमीच सावकाश जेवायला आणि जेवण हसतखेळत, गप्पा मारत करायला सांगायचे, त्याची आठवण करून देण्यासाठीही हे गाणं त्यांनी केलं असेल.

हे गाणं म्हणून झालं की मगच मुलं ''इतादाकिमासु'' म्हणायची आणि

काहीतरी समुद्रातलं आणि थोडसं डोंगरावरचं असलेले डबे खायला सुरुवात करायची.

आणि मग काही क्षण सगळं सभागृह शांत शांत व्हायचं.

## ''फिरायला जाऊ या''

जेवणानंतर तोत्तोचान इतर मुलांबरोबर खूप खेळली. सगळे परत वर्गात गेले तेव्हा बाई वाटच पाहात होत्या.

''तुम्ही सकाळपासून खूप अभ्यास केलाय.'' त्या म्हणाल्या, ''आता आपण काय करु या?''

तोत्तोचानने काही सुचवायच्या आधीच सगळी मुलं म्हणाली, ''फिरायला जाऊ या.''

''चला!'' बाई म्हणाल्या आणि सगळे वर्गाच्या दाराकडे निघालेसुध्दा.

तोत्तोचान आई-बाबांबरोबर फिरायला जायची; पण वर्गाबरोबर फिरायला जायचं ही कल्पनाच तिला धक्कादायक होती. तिला फिरायला जायला आवडायचं. त्यामुळे ती जास्त चौकशा न करता त्यांच्यात सामील झाली.

नंतर तिला समजलं, जर त्यांनी नीट अभ्यास केला असेल, आणि बाईनी फळ्यावर लिहून दिलेली सगळी कामं केली असतील, तर बाई नेहमीच दुपारी फिरायला घेऊन जात असत. इतरही सगळ्या वर्गात अशीच पद्धत होती.

पहिलीच्या वर्गातले सगळे विद्यार्थी बाईबरोबर बाहेर पडले आणि एका छोट्या तलावाच्या कडेकडेने चालायला लागले. तलावाच्या दुतर्फा नुकताच बहर येऊन गेलेली चेरीची झाडं होती. मोहरीच्या पिवळ्या फुलाचं शेत समोर क्षितिजापर्यंत पसरलं होतं. आता तो तलाव नाहीसा होऊन फक्त इमारतीचं जंगल झालंय, पण त्या काळी मात्र 'जियुगाओका' मध्ये जवळजवळ सगळी शेतीच होती.

''आपण कुहोनबुत्सुच्या मंदिरापर्यंत जाऊ या.'' ती झग्यावर ससाचं चित्र असणारी मुलगी म्हणाली. तिचं नाव होतं 'साक्कोचान.'

''आम्ही मागच्या वेळी त्या तलावापाशी किनई एक साप बघितला होता!'' साक्कोचान म्हणाली, ''आणि त्या देवळात एक जुनी विहीर आहे. तिकडे म्हणे पूर्वी एक तारा तुटून पडला होता.''

मुलं मनमोकळेपणानं गप्पा मारत होती. आकाश स्वच्छ निळंनिळं दिसत होतं आणि स्वच्छ हवेमध्ये फुलपाखरं स्वच्छंद विहार करीत होती.

दहाएक मिनिटं चालल्यानंतर बाई थांबल्या. समोर पसरलेल्या फुलांकडे पाहात त्यांनी विचारले. ''सांगा पाहू ही फुलं का फुलतात?''

मग त्यांनी फुलांचे केसर आणि पराग यांविषयी समजावून सांगितलं. मुलंही

इकडेतिकडे हिंडत मनापासून फुलांचं निरीक्षण करत होती.

बाईनी सांगितलं की, 'फुलपाखरं फुलांना फुलायला मदत करतात.' खरोखरच ती फुलपाखरं फार घाईघाईत दिसत होती.

बाई पुन्हा चालायला लागल्या. मुलंही फुलांचं निरीक्षण थांबवून त्यांच्या मागोमाग उड्या मारत निघाली. फुलांचे केसर आणि पराग खूप महत्त्वाचे असतात, ही नवी माहिती त्यांना मिळाली होती.

पुन्हा थोडं अंतर चालल्यावर समोरच दाट झाडी दिसत होती. आणि त्या झाडीच्या मध्यभागी कुहोनबुत्सुचं मंदिर. देवळाच्या अंगणात शिरल्याशिरल्या मुलं इकडेतिकडे मोकळेपणानं भटकायला लागली.

''तुटक्या ताऱ्याची विहीर बघायचीच का?'' साक्कोचाननं विचारलं. उत्तर देण्याची गरजच नव्हती. तोत्तोचान तिच्या पाठोपाठ धावतच सुटली होती.

विहीर दगडांची बांधल्यासारखी दिसत होती. त्याच्यावरचं झाकण उघडून त्या दोघींनी आत डोकावून पाहिलं. आता मिट्ट अंधार होता. आत काहीतरी दगडासारखं किंवा सिमेंटच्या मोठ्या गोळ्यासारखं दिसत होतं; पण ताऱ्यासारखं मात्र काहीच नव्हतं.

बराच वेळ आत बघितल्यावर तोत्तोचाननं विचारलं, ''तू यातला तारा बघितलाहेस कधी?''

साक्कोचाननं मान हलविली. ''कध्धीच नाही!''

तो तारा चमकत का नाही हे कोडं, तोत्तोचानला काही केल्या उलगडेना. बराच वेळ विचार केल्यावर ती शेवटी म्हणाली, ''कदाचित तो झोपला असेल.''

आपले मोटमोठे डोळे अजूनच मोठे करत साक्कोचाननं विचारलं, ''तारेसुद्धा झोपतात का गं?''

''मला वाटतं ते दिवसा झोपत असतील आणि रात्री उठून चमकत असतील!'' तोत्तोचाननं घाईघाईनं सांगितलं. कारण तिलाही खात्री नव्हती.

मग सगळे एकत्र येऊन देवळाभोवती खूप हिंडले. मोठ्या गाभाऱ्यामधल्या बुद्धाचा पुतळा तिथल्या अंधुकअंधुक प्रकाशात बघितला. दगडात उमटलेल्या एका मोठ्या पाऊलखुणेत स्वतःचा पाय ठेवून बघितला. ते पाऊल म्हणे 'टेगू' नावाच्या लांब नाकाच्या वेताळाचं होतं. तलावाच्या आजूबाजूला भटकत नौकाविहार करणाऱ्या माणसांना हात हालवून टाऽऽटा करत मुलं खूप हुंदडली आणि मनसोक्त खेळली. तोत्तोचानला हे सगळंच नवखं होतं. प्रत्येक नव्या गोष्टीचं ती उत्साहानं स्वागत करत होती.

''चला, परत जायची वेळ झाली,'' बाई म्हणाल्या. सूर्य मावळतीला गेला होता आणि मुलं परत पिवळ्या फुलांच्या शेताच्या रस्त्यानं शाळेकडे निघाली होती.

त्या हसण्या-खेळण्याच्या मोकळ्या वेळात मुलांनी वास्तविक जीवशास्त्र

आणि इतिहासाचा कितीतरी अभ्यास केला होता आणि याची त्यांना पुसटशीसुद्धा कल्पना नव्हती.

तोत्तोचानची एव्हाना सगळ्यांशीच ओळख झाली होती आणि त्या सगळ्यांशी खूप जुनी मैत्री असल्यासारखं तिला वाटत होतं.

''आपण उद्या परत फिरायला जाऊ या,'' ती सगळ्यांना ओरडून म्हणाली.

''जाऊ या-जाऊ या...'' त्यांनीही उड्या मारत प्रतिसाद दिला.

फुलपाखरं अजूनही त्यांच्या कामात दंग होती. पक्ष्यांच्या गाण्यांनी वातावरण भरुन गेलं होतं आणि तोत्तोचानचा आनंद गगनात मावेनासा झाला होता.

## शाळेचं गाणं

तोमोईमधला प्रत्येक दिवस तोत्तोचानसाठी नव्या गमती घेऊन यायचा. ती शाळेत जायला इतकी आतुर असायची, की सकाळ फारच उशिरा होते असं तिला वाटायला लागायचं आणि संध्याकाळी घरी आलं, की शाळेतल्या गमती-जमती आई-बाबा आणि रॉकीला किती सांगू आणि किती नको असं होऊन जायचं.

''अगं आत्ताच आलीयेस. आधी काहीतरी खाऊन घे. मग बडबड कर.''

शाळेत जायला लागून बरेच दिवस झाले तरीसुद्धा रोज रोज सांगण्यासारख्या कित्येक गोष्टी तोत्तोचानकडे असायच्या. आईलादेखील त्याचा खूप आनंद व्हायचा.

एक दिवस शाळेत जाताना गाडीत बसल्याबसल्या तोत्तोचानला अचानक वाटलं, की तोमोई शाळेला स्वतःचं असं गाणं आहे की नाही? ती एकदम अस्वस्थ झाली. शाळेत पोहोचल्या-पोहोचल्या याचं उत्तर शोधायचं असं ठरवून ती गाडीच्या दारातच जाऊन उभी राहिली. अजून तर 'जियुगाओका' यायला दोन स्टेशनं बाकी होती; पण तोत्तोचानला मुळीच धीर निघत नव्हता.

गाडी स्टेशनात शिरली. 'जियुगाओका-जियुगाओका' असं कंडक्टर ओरडून सांगेपर्यंत तोत्तोचान फाटकाबाहेरसुद्धा पडली होती.

वर्गात शिरल्याशिरल्या तिनं समोर दिसलेल्या ताईजी यामानोउचीला विचारलं, ''ताईचान आपल्या शाळेला गाणंय् का रे?''

ताईचान किंचित विचार करुन म्हणाला, ''मला नाही वाटत असेल असं.''

तोत्तोचान जरा उदासपणे म्हणाली, ''असायला पाहिजे होतं रे, माझ्या पहिल्या शाळेत खूप छान गाणं होतं.''

आणि तिनं मोठ्यानं ते म्हणायला सुरुवात केली:

''उथळ जळाने खळखळणाऱ्या
सेन्झोकूच्या तळया।

नभापलिकडे निळया।
ज्ञान अमुचे खोल ...''

खरं तर ती फारच थोडे दिवस त्या शाळेत गेली होती आणि ते शब्दही जरा अवघड होते. पण गाणं पाठ करणं तिला फारसं जड गेलं नव्हतं.

'ताईचान' ते गाणं ऐकून भारावून गेला होता. तोवर इतरही मुलं वर्गात जमली होती. तीही त्या अवजड शब्दांच्या गाण्यानं प्रभावित झाली होती.

''आपण मुख्याध्यापकांना आपल्यासाठी एक गाणं करायला सांगू या.'' तोत्तोचाननं सुचवलं.

''चालेल-चालेल.'' मुलांनाही ही कल्पना पसंत पडली. ते सगळे मिळून मुख्याध्यापकांकडे गेले.

तोत्तोचानच्या जुन्या शाळेतलं गाणं आणि मुलांची गाण्याबद्दलची इच्छा ऐकून मुख्याध्यापक म्हणाले, ''ठीक आहे. मी उद्या सकाळपर्यंत तुमच्यासाठी गाणं तयार करतो.''

''नक्की?'' मुलांना उत्साह आला. ती सगळी वर्गात परतली.

दुसऱ्या दिवशी सकाळी शाळेतल्या सगळ्या मुलांना शाळेच्या मैदानात जमायला सांगितलं होतं. एक फळा मैदानाच्या मध्यभागी ठेवून मुख्याध्यापक म्हणाले, ''आता इकडं लक्ष द्या सगळ्यांनी, आपल्या तोमोई विद्यालयाचं गाणं शिकू या.''

आणि त्यांनी फळ्यावर पाच रेघा ओढल्या आणि त्यावर खालील स्वरलिपी लिहिली-



तो-मो-ई तो-मो-ई तो-मो-ई

आणि मग हात उंचावून ते म्हणाले, चला आता सगळ्यांनी मिळून गाऊ या. मुख्याध्यापक हातांनी ताल देत होते आणि पन्नास मुलं गात होती तो-मो-ई, तो-मो-ई!

''एवढंच ?'' तोत्तोचाननं विचारलं.

''एवढंच!'' मुख्याध्यापक अभिमानानं म्हणाले.

''काहीतरी छान छान शब्द असलेलं असायला हवं होतं,'' तोत्तोचानचा मोठाच अपेक्षाभंग झाला होता.

''तुम्हाला आवडलं नाही?'' मुख्याध्यापकांनी विचारलं, ''मला वाटलं, एवढं गाणं पुरेसं होईल.''

खरं म्हणजे कुणालाच ते गाणं आवडलं नव्हतं. ते फारच सोप्पं होतं. त्यापेक्षा गाणं नसलेलंच बरं.

मुख्याध्यापकांना जरा वाईट वाटलं पण ते चिडले नाहीत. त्यांनी फळा पुसून टाकला. तोत्तोचानला वाटलं आपण एकदम असं बोलायला नको होतं. पण ते गाणं खरंच छान नव्हतं. तिच्या कल्पनेतलं अवघड अवघड शब्दांचं नव्हतं.

खरी गोष्ट अशी होती, की कोबायाशीचं मुलांविषयीचं आणि शाळेविषयीचं प्रेम कुठल्याच शब्दात व्यक्त करण्यासारखं नव्हतं. पण ते समजण्याएवढी मुलं अजून मोठी नव्हती.

मुख्याध्यापकांना शाळेचं गाणं असण्याची कधीच गरज वाटली नव्हती. मुलंही लौकरच ते विसरून गेली आणि फळ्यावरच्या शब्दाबरोबरच ते प्रकरण संपून गेलं.

'तोमोई विद्यालया'ला स्वतःचं गाणं नंतरही कधीच नव्हतं.

## ''सगळं पुन्हा आत टाक''

ज्या दिवशी तिचा लाडका बटवा संडासात पडला, त्या दिवसा इतकं काम तोत्तोचाननं जन्मात कधी केलं नसेल. तो बटवा तोत्तोचानचा खूप आवडता होता आणि तो होताही तसाच आवडण्यासारखा. त्याच्यावर लाल-हिरव्या चौकटी होत्या आणि चौकोनी आकाराच्या त्या चपट्या बटव्यावरचा तुरा तर फारच मस्त होता.

या आपल्या तोत्तोचानला एक गंमतीशीर सवय होती-संडासला जाऊन आलं, की परत त्यात वाकून पाहायची, तिच्या या सवयीमुळे तिनं अगोदरच कितीतरी छान-छान टोप्या घालवल्या होत्या. त्यावेळचे संडास आजच्याइतके सुधारलेले नव्हते. संडासात नुसताच डबक्यासारखा खड्डा असायचा. आईनं तोत्तोचानला वाकून न पाहाण्याबद्दल अनेकदा बजावलं होतं. पण तोत्तोचानच्या कुठलं लक्षात रहायला?

त्याही दिवशी शाळा सुरू होण्याआधी ती संडासात गेली. आईनं सांगितलेलं विसरली, आणि तिच्या लक्षात येण्याआधीच तिचा बटवा हातातून सुटून खालच्या डबक्यात पडला. खाली गडद अंधार होता. बटवा दिसेनासा झाला होता.

तोत्तोचानला तर रडूच यायला लागलं.

पण तिनं रडायचं नाही असं ठरवलं. तिला तो बटवा शोधायचा होता. पहारेकऱ्यांच्या टपरीतून तिनं एक फावडं आणलं. त्या फावड्याचा दांडा खरं तर तिच्या उंचीच्या दुप्पट होता, पण तिला त्याचं काही विशेष वाटलं नाही. ती ते फावडं घेऊन शाळेच्या मागच्या बाजूला गेली आणि संडासाच्या नाल्याचं झाकण शोधायला तिनं सुरुवात केली. तिला वाटलं होतं, की ते संडासाच्या भिंतीमागेच कुठेतरी असेल. पण खूप शोधाशोध केल्यानंतर भिंतीपासून एक यार्डभर दूर अंतरावर ते सिमेंटचं झाकण तिला सापडलं. मोठ्या कष्टानं तिनं ते बाजूला केलं. तिनं त्या खड्ड्यात वाकून बघितलं.

''बाप रे! हे तर कुहोनबुत्सुच्या तळ्याएवढंय्,'' ती म्हणाली.

तिनं ते डबकं फावड्यानं रिकामं करायला सुरुवात केली. पहिल्यांदा तिनं जवळपासचं खणून पाहिलं पण तो खड्डा खूपच खोल आणि मोठा होता. कारण वेगवेगळ्या संडासातून नाले त्यात सोडलेले होते. त्यात ती स्वतःदेखील पडण्याची भीती होतीच. म्हणून तिनं बाजूबाजूनी खणायचं ठरवलं.

प्रत्येक फावड्यातला चिखल ती लक्षपूर्वक बघत होती, पण त्यात बटवा दिसत नव्हता. तिला फार वेळ लागलेसं वाटलं नव्हतं. कुठे बरं गेला बटवा? तेवढ्यात तास सुरु झाल्याची घंटा झाली.

काय करावं तिला समजेना, पण एवीतेवी एवढं केलंच होतं म्हणून तिनं काम पूर्ण करायचं ठरवलं. तिनं पुन्हा एकदा जोमानं कामाला सुरुवात केली.

आता जमिनीवर चिखलाचा चांगलाच ढीग जमला होता. तेवढ्यात मुख्याध्यापक तिकडून आले.

''काय करतेस गं?'' त्यांनी विचारलं.

''माझा बटवा पडलाय,'' तिनं खणताखणताच उत्तर दिलं.

''असं होय!'' ते म्हणाले आणि पाठीमागे हात बांधून शांतपणे निघून गेले.

थोडा वेळ गेला. बटवा बाहेर यायला तयार नव्हता आणि कुबट वासाचा तो ढीग वाढतच चालला होता. मुख्याध्यापक परत आले.

''सापडला?'' त्यांनी विचारलं,

''नै.'' त्या ढिगाऱ्याच्या मध्येच, घामानं निथळत उभ्या असणाऱ्या तोत्तोचानने उत्तर दिलं.

मुख्याध्यापक तिच्याजवळ आले आणि मऊ आवाजात म्हणाले, ''तुझं काम झालं, की तू सगळं पुन्हा आत टाकशील नं?''

''हो हो!'' तोतोचाननं घाईघाईनंच उत्तर दिलं आणि पुन्हा खणायला सुरुवात केली आणि अचानक तिच्या डोक्यात आलं, काम झालं, की हा सगळा चिखल आत टाकता येईल, पण वाहून गेलेल्या पाण्याचं काय?

पाणी हळूहळू जमिनीत झिरपायला लागलं होतं. तोत्तोचान थांबली, झिरपलेलं पाणी आत कसं टाकणार? तिनं खूप विचार केला. तिनं मुख्याध्यापकांना कबूल केलं होतं, त्यामुळे तिला 'सगळं' आत टाकायलाच हवं होतं. शेवटी तिनं थोडीशी ओली मातीच खड्ड्यात घालायची ठरवली.

एव्हाना तो ढीग म्हणजे खरोखर डोंगर झाला होता. पण बटवा सापडण्याची काही लक्षणं नव्हती, तो बहुधा मधेच कुठेतरी अडकून बसला होता, पण आता तोत्तोचानला बटव्याचं काहीच वाटत नव्हतं. तिनं तिच्याकडून सर्व प्रयत्न केले होते आणि त्याबद्दल ती पूर्ण समाधानी होती.

तिच्या त्या समाधानाचं श्रेय निःसंशयपणे तिला न रागावता तिच्यावर पूर्ण विश्वास दाखवणाऱ्या मुख्याध्यापकांना होतं.

पण हे समजायला तोत्तोचान फारच लहान होती.

बहुतेक मोठ्या माणसांनी तोत्तोचानला असं काहीतरी करताना बघून म्हटलं असतं, ''काय चालवलंयस तू हे?'' किंवा ''बंद कर पाहू ते, पडशील बिडशील उगीच.'' किंवा निदान तिला मदत द्यायची तयारी दाखविली असती, पण मुख्याध्यापकांनी यातलं काहीच केलं नव्हतं, म्हणूनच तोत्तोचानचाही आत्मविश्वास वाढला होता.

एवढा सगळा प्रकार बघूनही ''तुझं काम झालं, की तू हे सगळं पुन्हा आत टाकशील नं?'' असं शांतपणे म्हणायचं म्हणजे.... हे सगळं ऐकून आईला वाटलं, खरंच किती वेगळे मुख्याध्यापक असतील ते.

त्या दिवसानंतर तोत्तोचाननं कधीच संडासात वाकून पाहिलं नाही आणि तिला वाटलं ती मुख्याध्यापकांवर खूप विश्वास टेवू शकेल, आणि तिला ते पूर्वीपेक्षाही जास्त आवडायला लागले.

तिनं आपलं वचन पाळलं आणि उपसलेला सगळा ढीग तिनं पुन्हा आत टाकला. खणून काढण्याइतकं ते काम अवघड नव्हतं. तिनं वरुन थोडी ओली माती घातली. नंतर जमीन एकसारखी केली. झाकण होतं तसंच घातलं आणि फावडंही जागेवर नेऊन ठेवलं.

त्या दिवशी रात्री तोत्तोचान त्या सुंदर बटव्याविषयी विचार करत होती. तिला बटवा हरवण्याचं वाईट वाटत होतं, पण दिवसभराच्या श्रमानं ती इतकी दमली होती, की कधी झोप लागली, तिला समजलंच नाही.

इकडे तिनं काम केलेल्या जागी ओली जमीन चंद्रप्रकाशात चमचमत होती.

## तोत्तोचानचं नाव

तोत्तोचानचं खरं नाव होतं 'तेत्सुको.' तिचा जन्म होण्यापूर्वी आई-बाबांच्या सर्व

मित्र–मैत्रिणींना खात्री होती की आई–बाबांना मुलगाच होणार. आई–बाबांचाही त्यावर विश्वास बसायचा. त्यांनी आपल्या त्या होणाऱ्या मुलाचं नाव ठरवलं होतं 'तोरु.' पण मुलगी झाली. आई–बाबांची थोडीशी निराशा झाली. पण चिनी भाषेतील 'तो' हे अक्षर त्यांना खूप आवडायचं. 'तो' म्हणजे ध्वनीसारखं स्पष्ट, कंपनशील, दूरपर्यंत जाणारं आणि खोलवर भिडणारं. 'तो' या अक्षराचा चिनी भाषेतला दुसरा उच्चार 'तेत्सु' असा होतो आणि जपानी भाषेत मुलीच्या नावाला शेवटी 'को' हे अक्षर जोडतात. म्हणून त्यांच्या मुलीचं नाव झालं 'तेत्सुको.' जपानी भाषेत छोट्या मुलांच्या नावापुढे चान,' किशोर वयातील किंवा समवयस्क व्यक्तीच्या नावापुढे 'सान्' आणि मोठ्या माणसांच्या नावापुढे 'सेन्से' हे शब्द लावायची पद्धत आहे. आपण आदरानी एखाद्याच्या नावापुढे पंत, दादा, राव वगैरे लावतो की नै? तसाच थोडासा प्रकार. अशा तऱ्हेनं तिचं नाव झालं 'तेत्सुकोचान.' पण या आपल्या छोट्या तोत्तोचानला तेत्सुकोचान काही कळायचं नाही आणि म्हणताही यायचं नाही. तिला कुणी नाव विचारलं की ती म्हणायची 'तोत्तोचान' आणि तिलातर वाटायचं की 'चान' हा पण तिच्या नावाचाच भाग आहे.

बाबा कधी–कधी तिला ती मुलगाच असल्यासारखे 'तोस्की' म्हणायचे. ते म्हणायचे ''तोस्की इकडे ये आणि या गुलाबाला लागलेली कीड काढायला मला मदत कर.'' पण बाबा आणि रॉकी सोडून सगळे तिला 'तोत्तोचान' म्हणायचे. ती शाळेच्या वह्यांवर आपलं नाव जरी 'तेत्सुको' असं लिहायची तरी तिच्या मते तिचं नाव होतं 'तोत्तोचान.'

## रेडिओ फार्स

काल तोत्तोचान फारच उदास झाली होती. ''ह्यापुढे रेडिओवरचे फार्स तू मुळीच ऐकायचे नाहीस.'' आईनं तिला बजावलं होतं.

तोत्तोचानच्या लहानपणी रेडिओ खूप मोठे मोठे आणि लाकडी असायचे. तोत्तोचानच्या घरचा रेडिओ आयताकृती आणि गुळगुळीत पृष्ठभाग असलेला होता. गुलाबी रेशमानं झाकलेला ध्वनीक्षेपक आणि दोन बटणं असलेला तो रेडिओ तोत्तोचानला खूप आवडायचा.

शाळेत जायला लागण्या आधीपासूनच तोत्तोचानला रेडिओवरचे राकुगो फार्स आवडायचे. गुलाबी रेशमाला कान लावून ती ते ऐकत रहायची. तिला वाटायचं त्यांचे विनोद भयंकरच गंमतशीर आहेत. आईनंही कालपर्यंत कधी तिच्या ऐकण्याला आक्षेप घेतला नव्हता.

काल बाबांच्या वाद्यवृंदातले काही मित्र सरावासाठी त्यांच्या घरी आले होते. 'तोत्तोचान त्सुनसादा ताचिबांनी तुझ्यासाठी केळी आणलीयेत बघ,'' आईनं सांगितलं.

तोत्तोचानला खूपच आनंद झाला. तिनं ताचिबानांना खाली वाकून अभिवादन केलं आणि ती अचानक आईला म्हणाली ''आयला, हे लई झ्याक हाये बग.''

त्यानंतर मात्र आई-बाबा घरात नसताना तिला चोरुन ते फार्स ऐकायला लागायचे. ती त्यातले विनोद ऐकून मोठ्या मोठ्यानं हसायची. एखाद्या मोठ्या माणसानं बघितलं असतं तर त्यांना वाटलं असतं एवढ्याश्या मुलीला हे विनोद समजत तरी असतील का? पण लहान मुलांची विनोदबुद्धी चांगली असते यात काही शंकाच नाही. केव्हा काय गंमत झाली हे त्यांना बरोबर समजतं.

## नवा डबा आला

''ए, आपल्या शाळेत आगगाडीचा अजून एक डबा येणारे.'' जेवणाच्या सुट्टीत मियो-चाननं सांगितलं. 'मियो-चान' ही मुख्याध्यापकांची तिसरी मुलगी. ती तोत्तोचानच्या वर्गात शिकत होती.

शाळेत अगोदरच सहा डबे वर्ग म्हणून होते. मियो-चान म्हणाली, की त्या डब्यात ग्रंथालय करणारेत. त्यांची उत्सुकता वाढली होती.

''कसा आणतील रे पण तो डबा?''

कुणीतरी विचारलं. प्रश्न गहन होता. सगळेच क्षणभर विचारात पडले.

''कदाचित ओईमाचीच्या रुळावरून आणतील आणि मग इकडच्या बाजूला फुटणाऱ्या फाट्यावरुन शाळेत आणतील.'' एकानं सुचविलं.

''पण मग तो रुळावरुन उतरवून रस्त्यावरुन आणावा लागेल नं.'' दुसऱ्याची शंका.

''नै तर दुसऱ्या एखाद्या गाडीवरून आणतील.'' अजून एकाची कल्पना.

''ह्याऽऽ! एवढी मोठी गाडी कुठून आणणार?'' कुणीतरी मधेच अडवलं.

अशीच चर्चा होत राहिली. आगगाडीचा डबा कुठल्याच गाडीवरुन, अगदी ट्रकवरुनसुद्धा आणणं शक्य नाही हे मुलांना समजून चुकलं होतं. पण मग काय? बराच वेळ विचार करून तोत्तोचान एकदम म्हणाली, ''रूळ! एखादवेळेस ते शाळेपर्यंत रुळ टाकतील.''

''कुठपासून?'' कुणीतरी विचारलं.

''कुठपासून म्हंजे? आत्ता तो डबा जिथे असेल तिथपासून.'' ती म्हणाली. खरं पण आपली सूचना तितकीशी चांगली नाही असं तिलाही वाटायला लागलं होतं. कारण आता तो डबा कुठे असेल हे तिला माहीत नव्हतं आणि शाळेपर्यंत रूळ घालणं सोपं नव्हतं. रूळ घालायचे म्हणजे मधली घरं वगैरे काय पाडून टाकणार काय?

खूप वेळ चर्चा करुन काहीच निष्पन्न होईना. तेव्हा मुलांनी ठरवलं आज दुपारी शाळा सुटल्यावर शाळेतच थांबायचं आणि नवीन 'ग्रंथालय' कसं आणतात ते पाहूनच घरी जायचं.

मुख्याध्यापकांना परवानगी विचारण्यासाठी मियोचानची निवड झाली. थोड्याच वेळात ती परत आली.

''तो डबा रात्री खूप उशिरा येणारे,'' तिने सांगितलं.

''ज्यांना खरंच पाहायची इच्छा असेल त्यांना आधी आई-बाबांची परवानगी



विचारूनच यावं लागेल. रात्रीचं जेवण झालं, की त्यांनी आपापले घरचे कपडे आणि पांघरूण घेऊन यायचं.''

''घरचे कपडे आणायचे?'' मुलांचा उत्साह वाढला होता.

''आणि पांघरूणसुद्धा?'' त्यांचा विश्वासच बसत नव्हता.

त्या दिवशी कोणाचंच अभ्यासाकडे लक्ष लागत नव्हतं. शाळा सुटल्याबरोबर सगळे सरळ घरी गेले ते पुन्हा संध्याकाळी भेटू या आशेनंच.

घरी पोचल्या पोचल्या तोत्तोचाननं सांगितलं,

''नवा डबा येणारे. कसा ते माहीत नै. घरचे कपडे आणि पांघरूण, मी जाऊ?''

आता एवढ्यावरुन बिचाऱ्या आईनं काय समजावं? पण तोत्तोचानच्या गंभीर चेहऱ्यावरुन काहीतरी वेगळंय् एवढंच तिला समजलं. आईनं बरेच प्रश्न विचारले तेव्हा कुठे तिच्या लक्षात सगळा प्रकार आला. आईला वाटलं, तोत्तोचाननं रात्री जायलाच हवं. कारण अशी संधी नेहमी नेहमी मिळणार नाही, तिला तर तो डबा आणलेला बघायला स्वतःलासुद्धा खूप आवडलं असतं.

आई जेवण झाल्यावर तोत्तोचानला शाळेत घेऊन गेली. आठ-दहा मुलं तिथं आधीच जमली होती. त्यात काही मोठी मुलंही होती. त्यांनी तोत्तोचानच्या वर्गातल्या मुलांकडून ऐकलं होतं. एक-दोन इतरही मुलांच्या आयाबरोबर आल्या होत्या. त्यांना तिथंच थांबण्याची इच्छा होती. पण मुख्याध्यापकांनी मुलांची पूर्ण जबाबदारी घेतली होती. त्या निश्चिंत मनानं घरी परतल्या.

''आपलं ग्रंथालय आलं, की मी तुम्हाला उठवीन हं.'' सभागृहामध्ये झोपण्याची तयारी करणाऱ्या मुलांना मुख्याध्यापकांनी सांगितलं.

मुलांना वाटलं आज त्यांना झोपच लागणार नाही. पण खरं म्हणजे ती सगळीच दमली होती. 'नक्की उठवा हं.' असं म्हणत त्यांना कधी झोप लागली हे समजलंच नाही.

''आला आला..........'' अशा आवाजांनी तोत्तोचान जागी झाली. आणि धावतच मैदानातून ती फाटकापर्यंत पोचली.

नुकतीच पहाट होत होती आणि पहाटेच्या अंधुक उजेडात आगगाडीचा मोठ्ठा डबा रुळाशिवाय येत होता आणि तोही अजिबात आवाज न करता. तो डबा एका चाकाच्या गाडीवरुन आणला होता आणि ती गाडी ट्रॅक्टरला जोडली होती. ट्रॅक्टर नावाचंही काही असतं, जे आगगाडीचा डबासुद्धा ओढू शकतं असा नवाच शोध तोत्तोचानला लागला होता.

सावकाश-सावकाश तो डबा शाळेच्या फाटकापर्यंत येऊन पोचला. त्या काळी याऱ्या (क्रेन) नव्हत्या. त्यामुळे डबा शाळेच्या मैदानापर्यंत पोचवायचा म्हणजे खूपच अवघड काम होतं. ट्रॅक्टरच्या माणसांनी वरून हळूहळू तो ढकलायला सुरुवात केली.

''नीट लक्ष देऊन बघा.'' मुख्याध्यापकांनी सांगितलं, ''त्याला रोलर म्हणतात. त्याच्या मदतीनं कितीही अवजड वस्तू ढकलत नेता येते.''

''जोर लगाके है–य्याऽऽ'' कामगार एका सुरात गात होते आणि त्याच तालावर सूर्यही हळुहळू वर येत होता.

इतर सहा डब्यांप्रमाणेच याही डब्याची चाकं काढून टाकली होती. त्या डब्याची भटकंती आता संपली होती आणि लहान मुलांच्या निरागस हास्याचा वावर आता तिथं होणार होता.

घरच्याच कपड्यांमध्ये सकाळच्या उन्हात मुलं आनंदानं बागडत होती. मुख्याध्यापकांभोवती फेर धरुन नाचत होती आणि मुख्याध्यापक आनंदानं आणि कौतुकानं हसत होते. मुख्याध्यापकांचं हास्य पाहून मुलांचा उत्साह वाढत होता.

## पोहोण्याचा तलाव

त्या दिवशीचा त्यांचा आनंद त्यांच्यापैकी कुणीच कधीच विसरू शकले नाहीत.

तोत्तोचानच्या आयुष्यातला तो सुवर्णाक्षरांनी लिहून ठेवावा असा दिवस होता. त्या दिवशी ती पहिल्यांदाच तलावात पोहली होती. हो...... आणि ते ही पोहण्याच्या पोशाखाशिवाय.

त्या दिवशी सकाळीच मुख्याध्यापक म्हणाले, ''उन्हाळा फार वाढलाय, मला वाटतं तलाव भरून टाकावा.''

''हैऽऽ'' सगळेच आनंदानं उड्या मारु लागले. तोत्तोचान आणि इतर पहिलीतली मुलं तर आणखीच खुष झाली. तोमोईमधील तलाव इतर तलावांसारखा चौकोनी नव्हता. त्याचा आकार बराचसा होडीसारखा होता. पण तो भरपूर मोठा होता. वर्गाच्या आणि सभागृहाच्या मधल्या मैदानात तो तलाव होता.

वर्ग चालू असताना तोत्तोचानचं आणि सर्वांचंच लक्ष राहून राहून खिडकीबाहेर जात होतं. तलाव रिकामा असताना त्यात खूप पालापाचोळा पडला होता. त्यामुळे तो मैदानासारखाच दिसायचा; पण आता स्वच्छ करुन त्यात पाणी सोडल्यावर मात्र तो खराखुरा पोहण्याचा तलाव दिसू लागला होता.

शेवटी एकदाची सुट्टी झाली. आणि सगळी मुलं तलावाभोवती गोळा झाल्यावर मुख्याध्यापक त्यांना म्हणाले,

''थोडेसे व्यायाम प्रकार करा आणि मग पाण्यात उतरा.''

''पण पोहण्याचा पोषाख?'' तोत्तोचानच्या मनात आलं. ती आई–बाबांबरोबर कामाकुराला पोहायला जायची तेव्हा ती पोषाख, रबरी टायर आणि तऱ्हेतऱ्हेच्या गोष्टी बरोबर घेऊन जायची. मुख्याध्यापकांनी मात्र काहीच आणायला

सांगितल्याचं तिला आठवेना.

तेवढ्यात तिच्या मनातलं समजल्याप्रमाणं मुख्याध्यापक म्हणाले:

''पोषाखाची चिंता करु नका, सभागृहामध्ये जा आणि पहा.''

जेव्हा तोत्तोचान आणि इतर पहिलीतली मुलं सभागृहात गेली तेव्हा मोठी मुलं त्यांचे कपडे काढून ठेवत होती आणि मुलं आनंदानं नाचत होती. अंगावर एकही कपडा न घालता ती मुलं मैदानाकडे धावत होती. तोत्तोचान आणि इतरांनीही घाईघाईनं कपडे काढले आणि मैदानाकडे धाव घेतली. उन्हामध्ये कपड्याशिवाय खूप बरं वाटत होतं. ते मैदानापाशी पोहोचले तेव्हा इतरांचे व्यायामप्रकार करुन झाले होते. तोत्तोचान अनवाणी पायांनी धावतच तिथं गेली.

पोहायला शिकवणार होता, 'मियो-चान'चा मोठा भाऊ, मुख्याध्यापकांचा मुलगा आणि एक उत्तम क्रीडापटू. तो तोमोईमध्ये शिक्षक नव्हता; पण विद्यापीठाच्या पोहोण्याच्या संघात होता. त्याचं आणि शाळेचं नाव एकच होतं. तोमोई.

व्यायाम झाल्यावर मुलांनी नाचत चित्कारत अंगावर गार पाणी घेतलं आणि तलावात भराभर उड्या मारल्या. इतर सगळ्यांनी उड्या मारल्या तर त्यांचे पाय खाली टेकतात याची खात्री होईपर्यंत तोत्तोचान मात्र पाण्यात उतरली नव्हती. पाणी गरम नव्हतं पण थंडही नव्हतं. तिथे अगदी मस्त वाटत होतं आणि कोणत्याही बाजूला हात पसरला तरी नुसतं पाणीच पाणी.

बारीक मुलं, जाड मुलं, मुलं-मुली सगळीच हसत बागडत होती. अंगावर एकही कपडा नाही अशा अवस्थेत नाचत होती.

तोत्तोचानला मोठीच गंमत वाटत होती. तिला वाईट एकाच गोष्टीचं वाटत होतं - रॉकीला शाळेत येता येत नै याचं. तिला खात्री होती, की रॉकीला जर समजलं असतं, की पोहोण्याच्या पोषाखाशिवायसुद्धा आलं तरी चालतं, तर तोही खुषीनं पोहायला आला असता.

तुम्हाला आश्चर्य वाटेल, की मुख्याध्यापकांनी मुलांना कपड्याशिवाय का पोहू दिलं? तसा काही नियम नव्हता. कुणाला पोषाख घालून पोहायचं असेल तर हरकत नव्हती. पण आजच्यासारखं अचानक ठरलं, तर पोषाखाशिवाय पोहायलाही हरकत नव्हती. पण त्यांनी तशी परवानगी का दिली? कारण त्यांना वाटायचं, मुलामुलींना एकमेकांच्या शरीरातील फरकाबद्दल विकृत कुतूहल असणं बरोबर नाही. आणि त्यांच्या मते शरीर लपवण्यासाठी माणसानं इतके कष्ट घेणं अनैसर्गिक आहे.

त्यांना मुलांना शिकवायचं होतं, की सगळीच शरीरं सुंदर असतात. तोमोईमधील काही मुलांना पोलिओ झालेला होता. उदाहरणार्थ, 'यासुकीचान.' काही खूप लहान शरीराची होती, तर कुणाला इतर काही व्यंगं होती. ती सगळी जर लपवाछपवी न करता एकत्रित खेळली, तर त्यांना स्वतःच्या शरीराची

लाज वाटणार नाही आणि न्यूनगंडही निर्माण होणार नाही. आणि तसंच झालं होतं. अगोदर ती अपंग मुलं लाजत. पण हळुहळू ती रुळली आणि धडधाकट मुलांइतकीच मोकळेपणानं खेळू लागली.

काही पालकांना ही कल्पना फारशी पसंत नव्हती. ते मुलांबरोबर पोहोण्याचा पोषाख पाठवत असत आणि मुलांनी पोषाख घालूनच पोहलं पाहिजे असा त्यांचा आग्रह असे. पण तसं क्वचितच घडायचं, हे मात्र त्यांना माहीत नव्हतं. तोत्तोचाननं मात्र सुरुवातीपासूनच पोषाखाशिवाय पोहायचं असं ठरवून टाकलं होतं आणि जे पोषाख विसरून येत तेही पोषाखाशिवाय पोहोण्यातच जास्त गंमत आहे या निर्णयाप्रत पोचत. मात्र घरी जाण्यापूर्वी पोहोण्याचा पोषाख ओला करण्याची काळजी पोषाख घेऊन येणारी मुलं घेत.

त्यामुळे तोमोईचा तलाव बोरासारखा तांबूस दिसायचा आणि पोषाखाचा पांढरा ठिपका त्यात क्वचितच दिसायचा.

## प्रगति - पुस्तक

आजूबाजूला अजिबात न पाहाता तोत्तोचान स्टेशनवरुन थेट घराकडे धावत सुटली. तिला पाहणाऱ्यांना वाटलं असतं, काहीतरी भयंकर घडलंय की काय?

घरी पोचल्या पोचल्या तिनं पुढचं फाटक उघडलं आणि ती मोठ्यानं ओरडली.

''मी आलेऽऽ'' धावतच ती रॉकीकडे गेली. तो व्हरांड्यामध्ये जमिनीवर पसरला होता. काहीही न बोलता तोत्तोचान त्याच्यासमोर बसली, दप्तर खांद्यावरुन काढलं आणि दप्तरातून तिनं प्रगति-पुस्तक बाहेर काढलं. ते तिच्या आयुष्यातलं पहिलं प्रगति -पुस्तक! रॉकीसमोर तिनं ते उघडून धरलं, ''बघ.'' ती अभिमानानं म्हणाली. त्यात पुष्कळ 'अ' आणि 'ब' अशा श्रेण्या आणि आकडे होते. अर्थात 'अ' पेक्षा 'ब' चांगली की 'ब' पेक्षा 'अ' हे तिलासुद्धा अजून समजत नव्हतं, तर बिचाऱ्या रॉकीला ते कसं समजणार?

पण तोत्तोचानला तिचं सर्वात पहिलं प्रगति-पुस्तक सर्वात आधी रॉकीला दाखवायचं होतं आणि रॉकी खूष होईल याची तिला खात्री होती.

रॉकीनं जेव्हा तोंडासमोर कागद पाहिला तेव्हा त्यानं तो एकदा हुंगला आणि तोत्तोचानच्या चेहऱ्याकडे बघितलं.

''मस्तयं की नै?'' ती म्हणाली. ''पण त्यात खूप अवघड अवघड शब्द आहेत. तुला नाही वाचता येणार.''

रॉकीनं पुन्हा एकदा प्रगति-पुस्तक बघितल्यासारखं डोकं हलवलं आणि तोत्तोचानचे हात चाटायला सुरूवात केली.

''छान!'' ती समाधानानं म्हणाली.

उठत तिनं सांगितलं, ''आता मी आईला दाखवते.''

तोत्तोचान उठून गेल्यावर रॉकीही उठला. जराशी थंड जागा पाहून त्यानं पुन्हा अंग टाकलं आणि डोळे मिटले. त्याचे ते मिटलेले डोळे पाहून तोत्तोचानचं काय, पण कोणाचीही खात्री झाली असती, की तो तिच्या प्रगति–पुस्तकाचाच विचार करत असणार.

## उन्हाळी सुट्ट्या

''उद्या आपलं शिबीर आहे. संध्याकाळी घरचे कपडे आणि पांघरूण घेऊन शाळेत जमायचं,'' मुख्याध्यापकांची सूचना आली. तोत्तोचाननं ती आईला दाखवली. दुसऱ्या दिवसापासून उन्हाळ्याची सुट्टी सुरु होणार होती.

''आई शिबीर म्हणजे काय?'' तोत्तोचाननं विचारलं, आईलाही नीटसा अंदाज येत नव्हता.

पण ती म्हणाली, ''कदाचित् तंबू उभे करुन त्यात राहायचं. पण कुठे उभारणार तंबू? भाड्याचा वगैरे उल्लेख नाही, म्हणजे बहुधा शाळेजवळच कुठेतरी शिबीर असेल. तंबूत पडल्यापडल्या तुम्ही चंद्र–चांदण्या पाहू शकाल.''

त्या रात्री तोत्तोचानला कितीतरी वेळ झोप आली नाही. शिबिराची कल्पना तिला थरारक आणि धाडसी वाटत होती. तिच्या छातीची धडधड वाढली होती.

दुसऱ्या दिवशी तिनं भराभर सगळं आवरायला सुरुवात केली, पण संध्याकाळी कपडे आणि पांघरूण पिशवीत भरून निघताना मात्र ती किंचित् घाबरली होती.

जेव्हा सगळे सभागृहात जमले तेव्हा मुख्याध्यापक म्हणाले, ''आता लक्ष देऊन पाहा हं.''

हातामध्ये जाड ताडपत्रीसारखा दिसणारा हिरवा तंबू घेऊन ते सभागृहातल्या छोट्याशा व्यासपीठावर गेले आणि काही क्षणातच त्यांनी दोऱ्या सोडवून तंबू उघडला.

''मी आता हा तंबू कसा उभा करायचा ते दाखवणार आहे.'' ते म्हणाले. बघताबघता त्यांनी एकट्यांने तंबूच्या दोऱ्या खेचून खांब उभे केले, तंबूमध्ये हवा भरली आणि एक सुंदरसा तंबू उभा राहिला.

''चला, आता तुम्ही सगळे सभागृहामध्ये तंबू उभे करा आणि शिबिराला सुरुवात करा.'' मुख्याध्यापक म्हणाले.

आईची कल्पना होती, की तंबू मैदानात उभे करतील. पण मुख्याध्यापकांची कल्पना वेगळीच होती. त्यांच्या मते सभागृहामध्ये मुलांना अधिक सुरक्षित वाटलं असतं आणि बाहेर पाऊस पडला असता किंवा थंडी वाजली असती तरी प्रश्न आला नसता.

मुलं आनंदानं नाचत बागडत होती.

''घर बांधू या, घर बांधू या.'' असं ओरडत त्यांनी लहान लहान गट केले आणि अखेरीस शिक्षकांच्या मदतीने त्यांनी पुरेसे तंबू उभारले. एका तंबूत साधारण तीन मुलं झोपू शकत होती. तोत्तोचाननं पटकन कपडे बदलले आणि थोड्याच वेळात या तंबूतून त्या तंबूमध्ये मुलांच्या भेटीगाठी सुरु झाल्या.

सगळयांचे कपडे बदलून झाले तेव्हा मुख्याध्यापक सभागृहाच्या मध्यभागी बसले. तिथून सगळी मुलं त्यांना पाहू शकत होती आणि त्यांच्या परदेशी प्रवासाच्या आठवणी ऐकू शकत होती.

मुलं आपापल्या तंबूमध्ये लोळत होती. कुणी नुसतंच डोकं बाहेर काढून बसली होती तर काही नीट बसून ऐकत होती. कधीच न पाहिलेल्या सातासमुद्रापलीकडच्या गोष्टी ऐकण्यात रंगून गेली होती. मुख्याध्यापकांच्या गोष्टी ऐकून कधी कधी मुलांना वाटायचं, ते सातासमुद्रापलीकडच्या आपल्या मित्रांच्याच गोष्टी सांगताहेत.

आणि अशा तऱ्हेने सभागृहामधल्या तंबूमध्ये झोपण्याचा तो साधासाच प्रसंग – प्रत्येक मुलाच्या आयुष्यामधला आनंदाचा आणि अविस्मरणीय प्रसंग ठरला. तो अनुभव मुलांना फार मोलाचा वाटत होता आणि मुलांना खूष ठेवण्याची कला मुख्याध्यापकांना चांगली अवगत होती.

मुख्याध्यापकांचं बोलणं संपल्यावर सगळी मुलं आपापल्या तंबूमध्ये परतली आणि सभागृहातला दिवा बंद झाला. काही तंबूमधून हसण्याचे आवाज येत होते तर काहींमधून दबक्या आवाजातली कुजबूज. थोड्याच वेळात सारं शांत झालं.

चंद्र ताऱ्यांशिवायचं ते शिबीर होतं. पण मुलांनी त्याचा आनंद मनमुराद लुटला होता. त्यांना ते सभागृह म्हणजेच शिबिराचं मैदान झालं होतं आणि त्यांच्या आठवणीत ती रात्र कायमची चांदणी रात्र झाली होती.

## अपूर्व साहस

शिबिरानंतर दोनच दिवसांनी तोत्तोचानच्या आयुष्यातला तो सगळ्यात मोठ्या साहसाचा दिवस उजाडला. तो दिवस म्हणजे तिचं आणि यासुकीचानचं गुपित होतं. तोत्तोचानच्या किंवा यासुकीचानच्या आईबाबांना कुण्णा कुण्णालाच माहीत नव्हतं. त्यादिवशी तोत्तोचाननं यासुकीचानला तिच्या झाडावर बोलावलं होतं.

तोमोईमधल्या विद्यार्थ्यांचं प्रत्येकाचं एक झाड शाळेच्या मैदानात होतं. तोत्तोचानचं झाड कुंपणाच्या बाजूला एका टोकाला होतं आणि तिथून 'कुंहोनुबुत्सु' च्या मंदिराचा रस्ता दिसत असे. ते झाड बरंच मोठं होतं आणि चढताना घसरून पडण्याची भीती होती. पण जरा कौशल्यानं चढलं तर जमिनीपासून जवळजवळ

सहा फूट उंच फांदीपर्यंत चढता येत असे आणि ती फांदी बसायलाही फार सोपी होती. तोत्तोचान मधल्या सुटीत आणि शाळा सुटल्यावर तिथे जाऊन बसायची आणि तिथून कधी उंच आकाश तर कधी रस्त्यावरुन जाणारी माणसं बघायची.

मुलांना आपलं झाड म्हणजे मोठीच संपत्ती वाटायची. त्यामुळे तुम्हाला जर त्यांच्या झाडावर चढायचं असलं तर त्यांना अगोदर नीट अदबीनं विचारावं लागायचं.

''मी आत आलं तर चालेल?'' जणू ते झाड म्हणजे त्यांचं घरंच.

पण यासुकीचानला पोलिओ झाला होता. त्यामुळे तो कधीच झाडावर चढला नव्हता. म्हणून तर तोत्तोचाननं त्याला आपल्या झाडावर बोलवायचं ठरवलं होतं आणि इतर कुणाला हे समजलं असतं तर त्यांनी एक तर हसं केलं असतं, नाही तर सरळ असं न करण्याबद्दल सांगितलं असतं. म्हणून त्यांनी ही गोष्ट दोघांतच ठेवायची ठरवली.

घर सोडताना तोत्तोचाननं आईला सांगितलं, की ती 'देनेशाक' मध्ये यासुकीचानच्या घरी चालली होती. ती खोटं सांगत होती. म्हणून तिने आईकडे पाहाण्याचं टाळलं. पण रॉकी तिला स्टेशनपर्यंत सोडायला आला.

त्याला मात्र तिनं खरं खरं सांगितलं, ''अरे किनई, मी आज यासुकीचानला माझ्या झाडावर नेणारे.''

ती शाळेत पोहोचली तेव्हा तिनं पाहिलं तर यासुकीचान फुलांच्या ताटव्याजवळ तिची वाट पाहात होता. उन्हाळयाची सुटी सुरू झाली होती. त्यामुळे आता शाळेत इतर कुणीच नव्हतं. यासुकीचान खरं म्हणजे तिच्यापेक्षा एकाच वर्षानं मोठा होता. पण तो बोलायला लागला म्हणजे खूप मोठा वाटायचा आणि खूप समजूतदार.

यासुकीचाननं तिला पाहिल्यावर भराभर तिच्याकडे चालायला सुरुवात केली. एका पायावर जोर देऊन आणि तोल सांभाळत जमेल तेवढं भरभर तो तिच्यापर्यंत पोहोचला. गुपचूप एवढं मोठं साहस करण्याच्या कल्पनेनं तिच्या अंगावर रोमांच उभे राहात होते. यासुकीचानलाही आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या.

रात्रीचा विचार करून ठरवल्याप्रमाणे तोत्तोचाननं पहारेकऱ्यांच्या टपरीमधून शिडी ओढतओढत झाडापर्यंत आणली आणि झाडाला टेकवून ठेवली.

शिडीवर भरभर चढून, शिडी वरुन घट्ट धरून ती म्हणाली, ''हं चल, हळुहळू चढायचा प्रयत्न कर.''

यासुकीचानचे हातपाय इतके अशक्त होते, की त्याला कुणाच्यातरी मदतीशिवाय एकसुद्धा पायरी चढणं शक्य नव्हतं. तोत्तोचान चटकन् खाली उतरली आणि तिनं त्याला मागून ढकलण्याचा प्रयत्न केला पण ती बिचारी इतकी छोटीशी होती की ती फक्त शिडी धरून ठेवल्याशिवाय काहीच करू शकत नव्हती. यासुकीचाननं पहिल्या पायरीवरून पाय काढून घेतला आणि शिडीजवळ

तो मान खाली घालून उभा राहिला. तोत्तोचानला वाटलं होतं तेवढं ते सोपं नव्हतं हे तिला पहिल्यांदाच जाणवलं. काय करावं?

त्याला झाडावर नेण्याची तिची इच्छा तर दांडगी होती आणि यासुकीचाननंही या दिवसाची फार वाट पाहिली होती. तिनं त्याच्याकडे पाहिलं. तो इतका उदासवाणा झाला होता, की त्याला हसवण्यासाठी गाल फुगवून दाखवले. वेडावाकडा चेहरा करुन त्याला चिडवण्याचा प्रयत्न केला.

''हं मस्त युक्ती.'' असं म्हणतच ती पुन्हा पहारेकऱ्याच्या टपरीपर्यंत पोहोचली आणि तिनं रुंद पायऱ्यांची शिडी शोधून काढली. ती शिडी बांबूच्या शिडीसारखी डगमगली नसती आणि तोत्तोचानला शिडी धरून उभं राहावं लागलं नसतं.

तिनं शिडी ओढून आणायला सुरुवात केली.



खरं तर ती भलतीच अवजड होती. पण तिच्यात आज एवढं बळ कुठून आलं होतं कुणास ठाऊक आणि शिडी वरच्या फांदीपर्यंत पोहोचतेय हे पाहून तर तिचा उत्साह आणखीनच वाढला.

''आता काळजी करू नकोस!'' तिनं मोठ्या बहिणीचा आव आणून सांगितलं: ''ही शिडी मुळीच डगमगणार नाही.''

यासुकीचाननं किंचित खिन्नपणे त्या शिडीकडे बघितलं आणि घामानं डबडबलेल्या तोत्तोचानकडेही बघितलं. त्यालाही घाम फुटला होता. त्यानं एकदा झाडाकडे पाहिलं आणि मन घट्ट करून पहिल्या पायरीवर पाय ठेवला.

शिडीच्या सर्वात वरच्या पायरीवर पोहोचायला किती वेळ लागला याचं भान दोघांनाही नव्हतं. उन्हाळ्यातली दुपार आणि सूर्य माथ्यावर आला होता. पण यासुकीचानला शिडीच्या माथ्यावर नेण्याशिवाय त्यांच्या डोक्यात दुसरा विचारच नव्हता. प्रत्येक पायरीवर तोत्तोचान यासुकीचानचा पाय प्रयत्नपूर्वक उचलून वरच्या पायरीवर ठेवत होती आणि यासुकीचान सर्व शक्ती पणाला लावून एकेक पायरी चढत होता. शेवटच्या पायरीवर ते पोहोचले आणि तोत्तोचान अत्यानंदानं ओरडलीच.

''हैऽऽ!!!''

पण पुढे? तोत्तोचाननं पटकन् फांदीवर उडी मारली तरी यासुकीचान शिडीवरून फांदीवर येणार कसा? शिडीवर हात ठेवून त्यानं विलक्षण निराश नजरेनं तोत्तोचानकडे बघितलं. तिला अचानक रडावसं वाटत होतं. इतके प्रयत्न केले आणि आता? तिला त्याला झाडावर बसून इतक्या गोष्टी सांगायच्या होत्या.....

पण ती रडली नाही. कारण मग कदाचित् यासुकीचानलाही रडू आलं असतं.

तिनं त्याचा दुबळा, अशक्त हात हातात घेतला. बराच वेळ तिनं हात तसाच धरला आणि एकदम म्हणाली;

''हं, तू त्या पायरीवर झोप. मी तुला वर ओढून घ्यायचा प्रयत्न करते.''

एखाद्या मोठ्या माणसानं जर तिला झाडाच्या फांदीवर बसून शिडीवर झोपलेल्या यासुकीचानला वर घेण्याचा प्रयत्न करताना पाहिलं असतं तर तो माणूस नक्कीच घाबरून ओरडला असता. ते दृश्यच तसं भयानक होतं.

पण यासुकीचानचा मात्र तिच्यावर पूर्ण विश्वास होता आणि तोत्तोचाननं तर त्याच्यासाठी स्वतःचा जीवही धोक्यात घातला होता. तिच्या छोट्या हातांनी सगळं बळ एकवटून ती त्याला वर खेचत होती. मधून मधून एखादा दयाळू ढग उन्हापासून त्यांना वाचवत होता.

खूप वेळानंतर ते दोघेही झाडावर समोरासमोर उभे होते. घामानं चिंब झालेले केस मागे सारत ती कमरेत झुकून म्हणाली;

''माझ्या झाडावर तुझं स्वागत असो.''

यासुकीचान झुकून किंचित् हसत कृतज्ञतेनं म्हणाला, ''मी आत येऊ?''

तिथून खूप दूरवरचं आकाश दिसत होतं.

''हंऽऽ असं असतं झाडावर चढणं.'' तो म्हणाला.

त्या दोघांनी झाडावर बसून खूप गप्पा मारल्या.

''ए, माझी अमेरिकेतली ताई सांगते, तिकडे म्हणे दूरदर्शन नावाचं काहीतरी असतं!'' तो खूप खुषीत सांगत होता.

ती म्हणते, ''ते जपानमध्ये पण आलं, की आपण घरात बसून सुमोंच्या कुस्त्यासुद्धा पाहू शकू. ते म्हणजे खोक्यासारखं दिसतं.''

सुमोचे पैलवान घरातल्या खोक्यात कसे मावतील, याच तोत्तोचानला राहून राहून आश्चर्य वाटत होतं. सुमो पैलवान केवढेऽऽ मोठ्ठे असतात! त्या काळात कुणाला कुणाला दूरदर्शनचे नावसुद्धा माहीत नव्हतं. तिला त्याविषयी सांगणारा यासुकीचान पहिलाच होता.

आजूबाजूला पक्षी किलबिलत होते आणि मुलांच्या गप्पा रंगात आल्या होत्या. यासुकीचानच्या आयुष्यातली झाडावर चढण्याची ती पहिली आणि शेवटची वेळ होती.

## धीटपणाची परीक्षा

''गोड गोड खातो, सगळ्यांना घाबरवतो, अंगाला माझ्या दुर्गंध येतो. मी कोण?'' हा उखाणा मुलांना इतका आवडायचा, की उत्तर माहीत असूनही तोत्तोचान आणि तिची दोस्तमंडळी एकमेकांना म्हणायची, 'ए मला ते गोडगोड खातो.......ते कोडं घाल ना.'

उत्तर होतं, ''संडासात बसून पाव आणि गुळांबा खाणारा बागुलबुवा.''

तोमोईमधली धीटपणाची परीक्षा झाल्यावरही एक छान कोडं तयार झालं असतं, 'सगळ्यांना घाबरवतो, चावे घेतो, तरीही तुम्हाला हसायला लावतो.'

शिबिराच्या दिवशीच मुख्याध्यापकांनी अशी घोषणा केली होती की, ''एक दिवस आपण कुहोनबुत्सुच्या मंदिरात धीटपणाची परीक्षा घेऊ या. ज्यांना भुतं व्हायचं असेल त्यांनी हात वर करा.''

सात-आठ मुलांनी हात वर केले. ठरलेल्या दिवशी संध्याकाळी मुलं जमल्यावर जी मुलं भुतं होणार होती त्यांनी बरोबर आणलेले भुताचे कपडे घातले आणि ती कुहोनबुत्सुच्या मंदिराकडे लपायला गेली.

''आम्ही तुम्हाला घाबरवून सोडू,'' ती जाता जाता म्हणाली.

उरलेल्या तीस-पस्तीस मुलांनी लहान लहान गट केले आणि थोड्या थोड्या वेळाच्या अंतरानं कुहोनबुत्सुकडे जायला सुरुवात केली. त्यांनी संपूर्ण मंदिराच्या

आसपासच्या मैदानात आणि मंदिरामागच्या स्मशानापर्यंत जाऊन यायचं होतं.

मुख्याध्यापकांनी आधीच सांगितलं होतं, की ती शौर्याची कसोटी असली, तरी जर कुणाला मध्येच परत यायचं असलं तर येता येईल. कोणी हसणार नाही आणि रागावणार नाही.

तोत्तोचाननं आईकडून एक विजेरी आणली होती.

''हरवू नकोस हंऽऽ,'' आईनं बजावलं होतं.

काही मुलं म्हणत होती, ''आम्ही भुतांना पकडूनच दाखवू.'' म्हणून त्यांनी फुलपाखरू पकडायच्या जाळ्या आणल्या होत्या. तर काहींनी भुतांना पकडायला दोऱ्या आणल्या होत्या.

कायकाय करायचं हे समजून घेऊन मुलं निघेपर्यंत बराच अंधार झाला होता. 'गायी-गोपी उतरला राजा' असं करून गट पाडले होते. जपानमध्ये या खेळाला 'ज्यॅन्-केन्-पो' असं म्हणतात. सर्वांनी प्रथम हात पाठीमागे घेऊन ज्यॅन्-केन्-पो, असं म्हटल्याबरोबर हात पुढे करायचे, ते करताना हाताची कात्री (दोन-बोटांनी कात्रीसारखी खूण) किंवा दगड-मूठ आवळायची, अथवा हात नेहमीसारखा ठेवून कागद करायचा, कागदापेक्षा कात्री मोठी, कात्रीपेक्षा दगड आणि दगडापेक्षा कागद मोठा! कारण तो दगडाला गुंडाळू शकतो असं मानलं जातं. तेव्हा ज्यानं केलेली खूण मोठी तो जिंकला म्हणजेच 'उतरला' असं समजलं जातं. पहिला गट उत्साहानं शाळेतून बाहेर पडला. अखेर तोत्तोचानच्या गटाची पाळी आली.

मुख्याध्यापक म्हणाले होते, की भुतं बहुतेक रस्त्यातच भेटतील. पण मुलांना खात्री नव्हती आणि नाही म्हटलं, तरी त्यांना थोडी भीती वाटतच होती.

मंदिराच्या अंगणात गडद अंधार होता. चंद्राच्या प्रकाशामुळे खरं तर रात्र खूप आल्हादक होती. पण आता कोणत्याही क्षणी भुतांशी सामना द्यावा लागेल या जाणिवेनं कोणाचंच चित्त थाऱ्यावर नव्हतं.

''ईऽ!'' कोणीतरी किंचाळलं.

अंधारात झाडांच्या सावल्या आणि पानांची सळसळ फक्त जाणवत होती. जमिनीवर कशालातरी कुणाचा तरी पाय लागायचा आणि ''भूतऽऽ'' म्हणून कोणीतरी ओरडायचं. अखेरीस मित्राचा धरलेला हातसुद्धा त्यांना भुताचा वाटायला लागला होता. स्मशानाकडे जायचं नाही असं तोत्तोचाननं ठरवून टाकलं होतं. कारण भुतं नक्की तिथेच असणार होती. आणि खरं म्हणजे आता धीटपणाची परीक्षा म्हणजे काय हे तिला समजलं होतं. तिला तेवढंच पुरे होतं. गंमत म्हणजे तिच्या गटातल्या इतरांनीही नेमका तोच विचार त्याचवेळी केला. तसं करणारे आपण एकटेच नाही याची खात्री करून घेत सगळ्यांनी परत शाळेकडे धाव घेतली.

ते शाळेत जाऊन बघतात तर काय, त्यांच्या आधी निघालेला गटही तिथं परत पोहोचलेला होता. स्मशानापर्यंत जायला सगळेच घाबरले होते.

त्याचवेळी डोक्याला पांढरं कापड गुंडाळलेला एक मुलगा रडत रडत त्याच्या शिक्षकांबरोबर आला. बिच्चारा! भूत होऊन कितीतरी वेळा स्मशानात लपून बसला होता; पण कोणीच आलं नाही आणि हळुहळू त्यालाच भीती वाटायला लागली म्हणून शेवटी तिथून पळून आला. रडत रडत रस्त्यानं येत असताना त्याला शिक्षक भेटले आणि त्यांनी त्याला परत आणलं.

त्याची समजूत घालून त्याला हसवण्याच्या प्रयत्नात सगळे असतानाच दुसरं भूतही रडतरडत तिसऱ्या एका रडणाऱ्या मुलाबरोबर आलं. त्या भुतानं कोणाच्यातरी पळण्याचा आवाज ऐकला आणि त्याला घाबरवण्यासाठी उडी मारली. आणि दोघांची टक्कर झाली. भयंकर घाबरलेली ती दोघं रडतच परत आली.

इतकी गम्मत झाली होती आणि शाळेच्या सुरक्षित वातावरणात मुलं एकाच वेळी हसत आणि रडत होती. तेवढ्यात तोत्तोचानच्या वर्गातला मिगिता नावाचा मुलगा परत आला. त्यानं वर्तमानपत्राचा केलेला भुताचा वेष घातला होता आणि कोणीच आलं नाही म्हणून तो जाम चिडला होता.

''मी इतकी वाट बघितलीऽऽ'' त्यानं डास चावलेले हातपाय खाजवत तक्रार केली.

''भुताला डास चावलेऽऽ.'' कुणीतरी म्हणालं आणि सगळेच हसायला लागले.

''मला वाटतं आता उरलेल्या भुतांनाही परत घेऊन यावं.'' पाचवीचे वर्गशिक्षक मारुयामा म्हणाले. रस्त्यावरच्या दिव्याखाली घाबरून उभ्या असणाऱ्या भुतांना त्यांनी एकत्र केलं आणि काही भुतं तर घाबरून घरीच पळाली होती. त्यांना सगळ्यांना जमवून मारुयामा शाळेत घेऊन आले.

पण त्या दिवसानंतर तोमोईच्या विद्यार्थ्यांना भुताची भीती कधीच वाटली नाही. कारण त्यांना समजलं होतं, की ''भुतांनाही भीती वाटतेच की, नाही का?''

## सरावाचे सभागृह

तोत्तोचान शांतपणे चालली होती आणि अधूनमधून तिच्या चेहऱ्याकडे पाहात रॉकीपण शांतपणे चालला होता. ते दोघेही बाबांच्या वाद्यवृंदाचा जिथे सराव होत असे त्या सभागृहाकडे चालले होते. एरवी तोत्तोचान कुठेही जायचं म्हणजे उडतउडतच चालत असे.

ते सभागृह त्यांच्या घरापासून पाच मिनिटांच्या अंतरावर होतं. बाबा त्या वाद्यवृंदाचे प्रमुख होते आणि प्रमुख असल्यानं ते व्हायोलिन वाजवीत असत. एकदा त्यांच्या कार्यक्रमाला गेली असताना तोत्तोचानला एक गंमत पाहायला मिळाली.

सगळा कार्यक्रम संपल्यावर संयोजक मंचावरून खाली आले. प्रचंड टाळया वाजवणाऱ्या प्रेक्षकांकडे बघून त्यांनी एकदा मान झुकवली आणि नंतर बाबांशी हस्तांदोलन केलं. आणि मग सगळा वाद्यवृंद उठला.

''आई, त्यांनी असं का केलं?'' तोत्तोचाननं विचारलं.

''अगं, चांगला कार्यक्रम केला म्हणून त्यांना वाद्यवृंदाचे आभार मानायचे होते आणि बाबा या वाद्यवृंदाचे प्रमुखेत की नै? म्हणून त्यांना धन्यवाद दिले, की सगळ्यांनाच दिल्यासारखे आहे.''

तोत्तोचानला त्या सभागृहात जायला आवडायचं. कारण तिथं सगळी मोठी माणसं असायची आणि ती तऱ्हेतऱ्हेची वाद्यं वाजवायची. याहूनही तिला जास्त आवडणारी गोष्ट म्हणजे संयोजक रोझेनस्टॉक यांचं गंमतीदार जपानी.

बाबांनी तिला सांगितलं होतं, की जोसेफ रोझेनस्टॉक हे युरोपखंडातील प्रसिद्ध वाद्यवृंदसंयोजक होते. पण तिकडे हिटलर नावाच्या माणसानं लोकांना फार त्रास द्यायला सुरुवात केली होती. म्हणून मग रोझेनस्टॉकना जपानला पळून यावं लागलं. बाबांना त्यांच्याबद्दल खूप आदर होता. तोत्तोचानला जागतिक परिस्थितीची कल्पना नव्हती, पण त्या सुमारास हिटलरनं युरोपमध्ये 'ज्यू' वर अमानुष अत्याचारास सुरवात केली होती. असं झालं नसतं तर रोझेनस्टॉक जपानला कधीच आले नसते. आणि मग कोरकाक यामादानं स्थापन केलेल्या ह्या वाद्यवृंदानं इतक्या झपाट्याने इतकी चांगली प्रगती केली नसती जितकी आंतरराष्ट्रीय ख्यातीच्या वाद्यवृंदसंयोजकाबरोबर राहून त्यांनी आज केलीय. रोझेनस्टॉक आपल्या वाद्यवृंदाकडून युरोपमधील प्रथम दर्जाच्या वाद्यवृंदाच्या दर्जाची अपेक्षा बाळगून होते आणि म्हणूनच प्रत्येक सरावाचे वेळी ते ओरडत असत.

''मी इतका प्रयत्न करतोय, पण तुम्ही प्रतिसादच देत नाही. अशानं आपला दर्जा कसा सुधारणार?''

अशा वेळी 'हाइदो' त्यांना समजावत असे. तो छान जर्मन बोलायचा.

''आम्हीही खूप प्रयत्न करतोय. पण आमचं तंत्र तितकंसं प्रगत नसल्यानं अजून चांगलं जमत नाहीये. पण आम्ही सुधारण्याचा मनापासून प्रयत्न करू.''

अशा प्रसंगांचं तोत्तोचानला फारसं गांभीर्य वाटत नसे. पण कधी कधी मात्र रोझेनस्टॉक रागानं इतके लाल व्हायचे, की तिला वाटायचं की त्यांच्या डोक्यातून आता वाफा निघणार! तेव्हा मात्र तोत्तोचान तिच्या आवडत्या खिडकीपासून (जिथून ती हातावर हनुवटी टेकून आतला सराव पाहायची तिथून) दूर व्हायची. आणि मग आसपासच्या मैदानात रॉकीबरोबर बसून ती पुन्हा सराव सुरु होण्याची वाट बघायची.

तसे एरवी रोझेनस्टॉक खूपच चांगले होते आणि त्यांचं जपानी बोलणं तर फारच मजेदार होतं.

"(छान!) कुरोयांगसान" कुणी काही चांगले वाजवले की, ते त्यांच्या गम्मतशीर पद्धतीनं म्हणायचे.

तोत्तोचान सभागृहात कधीच जात नसे. तिला बाहेर उभं राहून खिडकीतून आतलं संगीत ऐकायला आवडायचं. कधी कधी सराव थांबला असताना बाबा बाहेर आले तर तिला तिथे उभं असलेलं बघायचे.

"अरे तोत्स्को, तू बाहेर उभीएस होय?" (बाबा तिला 'तोत्स्को' म्हणायचे)

आणि रोझेनस्टॉकनी तिला बघितलं, तर त्यांच्या मजेशीर आवाजात ते म्हणायचे, "गुद मॉर्निंग" किंवा "गुद दे." आणि ती आता मोठी झाली होती तरी तिला कडेवर घेऊन पापा घ्यायचे. तोत्तोचानला थोडंसं संकोचल्यासारखं वाटायचं. पण तरीही तिला रोझेनस्टॉक आवडायचे.

ते तसे काही उंच नव्हते. किंचित् लांब नाक असलेले ते चंदेरी काडीचा चष्मा घालायचे. पण त्यांचा चेहरा मात्र रुबाबदार होता. अगदी एखाद्या मोठ्या कलाकारासारखा.

तोत्तोचानला किंचित पाश्चात्य वळणाचं पण काहीसं पुराणं झालेलं ते सभागृह पण आवडायचं.



सेंझोकुच्या तळ्यावरुन वाहाणारे वारे ते संगीत सभागृहापासून दूरवर वाहून नेत आणि संगीताचे सूर साऱ्या आसमंतात पसरत.

कधी कधी सोनमासळी (किंग्यो) विकणाऱ्या फेरीवाल्याची हाक पण संगीतामध्ये मिसळून जाई.



किं–ग्यो ई किं–ग्यो

## गरम पाण्याच्या झऱ्याची सहल

उन्हाळी सुट्टी संपली आणि अखेर गरम पाण्याच्या झऱ्यावर जाण्याचा दिवस उजाडला. तोमोईच्या विद्यार्थ्यांना ती सहल म्हणजे एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट वाटे.

आईला आता शाळेतल्या लोकविलक्षण गोष्टींची सवय झाली होती. पण, ''गरम पाण्याच्या झऱ्यावर सहलीला जाऊ का?'' असं तोत्तोचाननं विचारल्यावर मात्र तिला धक्काच बसला. कारण तिकडे म्हातारी माणसं जातात हे तिला माहीत होतं, पण पहिलीतली मुलं म्हणजे... पण मुख्याध्यापकांचं सहलीविषयीचं पत्रक वाचून मात्र तिला ती कल्पना खरंच सुंदर वाटली होती.

ती सहल म्हणजे 'समुद्राकाठची शाळा' होती. 'शिजुओका' मधल्या 'तोई' नावाच्या ठिकाणी समुद्रामध्येच गरम पाण्याचा प्रवाह होता. तिथे मुलांना गरम पाण्यानं आंघोळही करता येणार होती आणि पोहोताही येणार होतं. तीन दिवस आणि दोन रात्री एवढा काळ सहल जाणार होती. तोमोईमधल्या एका विद्यार्थ्यांच्या वडिलांचं तिथे एक घरही होतं. तिथे ते सुट्टीत फक्त हवापालट म्हणून जात असत. तिथेच त्या पन्नास मुलांची राहाण्याची व्यवस्था होणार होती. आईनं अर्थातच परवानगी दिली.

ठरलेल्या दिवशी सगळी मुलं शाळेत जमली. निघण्यापूर्वी मुख्याध्यापकांनी मुलांना सांगितलं, ''आपण आगगाडी आणि जहाजानं प्रवास करणार आहोत आणि तुम्ही कुणी हरवायचं नाहीये. समजलं? चला!!''

एवढंच!! आणि जेव्हा मुलं जियुगाओका स्टेशनवर आली, तेव्हा आश्चर्य वाटावं इतकी शहाण्यासारखी वागली. कुणीही धावपळ केली नाही, की आरडाओरड केली नाही. ''दंगा करू नका, रांगेत चला, खाऊन झाल्यावर कागदाचे बोळे गाडीत फेकू नका.'' अशा सूचना तोमोईच्या विद्यार्थ्यांना कधीच

द्याव्या लागल्या नाहीत. त्यांच्या शाळेतली न शिकवता लागलेली शिस्त त्यांच्या वागणुकीतून दिसत होती. कुणाला धक्काबुक्की करायची नाही. स्वतःला स्वतःची लाज वाटेल असं वागायचं नाही, कचरा दिसला तर उचलून टाकायचा. आणि इतरांना त्रास होईल असं वागायचं नाही हे शिकवायला तोमोईमध्ये कधीच स्वतंत्र धडे द्यावे लागले नाहीत. पण याहीपेक्षा आश्चर्याची गोष्ट म्हणजे थोड्याच दिवसांपूर्वी वर्गाच्या खिडकीत बसून चिमण्यांशी बोलणारी आणि रस्त्यावरच्या बँडवाल्यांना बोलावून अख्खा वर्ग डोक्यावर घेणारी 'तोत्तोचान' आता तिच्या बाकापाशी बसून शांतपणे तिचे धडे शिकत असे. तेही अगदी पहिल्या दिवसापासून. आता जर गाडीमध्ये शांतपणे इतरांबरोबर बसलेल्या तोत्तोचानला, पहिल्या शाळेतल्या कुणी बघितलं असतं तर!

''छे! ती ही असणं शक्यच नाही!'' असं म्हणून टाकलं असतं.

''नुमाजु'' ला सगळे जहाजावर चढले. मुलांना सगळं स्वप्नात असल्यासारखं वाटत होतं. तसं ते जहाज काही फार मोठं नव्हतं. पण सगळे इतके उत्साहात होते, की त्यांना ते जाणवतही नव्हतं. मुलं त्या जहाजाचा कोपरान् कोपरा निरखून पाहात होती. थोड्याच वेळात समुद्र आणखी खवळला. तोत्तोचान आणि इतर मुलांना 'कसंतरीच' व्हायला लागलं. पण तेवढ्यात एक मोठ्या वर्गातला मुलगा उठला आणि सगळ्यांच्या मध्यभागी उभा राहिला. जणू काही तो सगळ्या जहाजाचा तोल सावरणार होता. 'जहाज' एका बाजूला कललं, की तो 'ऊऽऽ' म्हणत दुसऱ्या बाजूला जायचा आणि पुन्हा दुसऱ्या बाजूला कललं, की 'ऊऽऽ' म्हणत आधीच्या बाजूला यायचा. तो प्रकार इतका गंमतशीर होता, की 'कसंतरीच' होत असूनही मुलांना हसू आवरत नव्हतं. आणि हसताहसताच जहाज 'तोई' च्या किनाऱ्याला लागलं. पण बिचारा सगळ्यांना हसवणारा मुलगा; ज्याच्या करामतींनी इतरांना बरं वाटलं; त्याला मात्र आता 'कसंतरीच' व्हायला लागलं होतं.

''तोई'' हे समुद्रकिनाऱ्यावर वसलेलं आणि टेकड्यांनी वेढलेलं एक शांत-सुंदर गाव होतं. थोडा वेळ विश्रांती घेऊन मुलं पोहायला निघाली. तो काही शाळेतला तलाव नव्हता, त्यामुळं मुलांनी त्यांचे पोहण्याचे पोषाख घातले.

गरम पाण्याचा झरा हा मात्र सगळ्यात निराळाच अनुभव होता, पाण्यातच तो प्रवाह असल्यानं तो नेमका कुठे सुरू होतो आणि कुठे संपतो हे रेष आखून ठरवता येणं शक्यच नव्हतं. पाण्याच्या प्रवाहापासून दहाबारा हात बाजूला सरकलं, की पाणी 'थंड' आणि परत गरम पाण्याच्या प्रवाहात आलं, की गळ्यापर्यंत 'गरम' पाणी. तो अनुभव खरोखरच मस्त होता, त्यामुळे तुम्हांला पाणी थंड लागायला लागलं, की समजायचं आपण समुद्रात आलोय, आणि इथं-तिथं पोहताना शरीर थंड झालं की पुन्हा गरम पाण्याकडे जायचं आणि असं करताना मुलांना घरात गरम पाण्यात आंघोळ केल्यासारखं वाटत होतं. मुलं अगदी निःशंक मनानं पाण्यात

डुंबत गप्पा मारत होती. त्यांना तसं पहाणाऱ्यांच्या मनात आलं असतं, की गरम पाण्याच्या झऱ्यात उतरल्यावर, लहान मुलंही मोठ्यांसारखी का बरं वागायला लागतात.

त्या काळी समुद्रकिनाऱ्यावर फारशी गर्दी नसायची, त्यामुळे तिथला तो किनारा जणू मुलांची खाजगी मालमत्ता झाली होती. हा निराळाच अनुभव मुलांनी खूप मोकळेपणानं अनुभवला. खूप वेळ पाण्यात खेळून मुलं घराकडे परतली तेव्हा त्यांच्या हाताची बोटं थंडीनं सुरकुतली होती.

प्रत्येक रात्री अंथरुणावर पडलं, की एकेक जण भुताच्या गोष्टी सांगत असे. तोत्तोचान आणि इतर पहिलीतली मुलं घाबरत, प्रसंगी रडत. पण डोळे पुसतापुसता विचारत, ''मग? पुढं काय झालं?''

शाळेतल्या शिबिरापेक्षा किंवा धीटपणाच्या परीक्षांपेक्षाही हा अनुभव विलक्षण होता. जास्त जिवंत होता. रोज वेगवेगळ्या मुलांना भाजी आणि मासे आणायला बाजारात जावं लागे. आणि ''तुम्ही कोण? कुठले?'' अशा प्रश्नांना जास्तीत जास्त नम्रपणाने उत्तरं द्यावी लागत. आसपासच्या झाडीत कोणी रस्ता चुकली होती, तर कोणी समुद्रात दूरवर गेल्यानं इतरांना काळजीत पाडलं होतं. कुणी खेळताना धडपडलं होतं, तर कुणाला वाळूतल्या काचा बोचून जखम झाली होती. आणि या प्रत्येक वेळी सगळ्यांना जास्तीत जास्त मदत करावी लागत होती.

पण त्यामुळेच जास्त मज्जा आली होती. आसपास दाट झाडी होती आणि बर्फगोळे विकणारी दुकानंही. आणि एक माणूस एकटा एक लाकडी होडी बांधत होता. सकाळी उठल्याबरोबर मुलं आधी त्याची होडी कुठवर तयार झाली ते बघायला जात असत. त्या माणसानं तोत्तोचानला लाकूड तासल्यावर निघणारा एक लांब अन् गुंडाळला गेलेला पापुद्रा दिला होता.

''आपण सगळ्यांचा एक फोटो काढला तर?'' निघायच्या दिवशी मुख्याध्यापकांनी विचारलं. मुलं तर भलतीच खूष झाली! कारण त्यांचा एकही एकत्र फोटो नव्हता. पण प्रत्यक्ष फोटो काढायच्या वेळी मात्र कुणी लघवीला गेलं, तर कुणी 'बूट' घालत होतं. शेवटी एकदा सगळे जमले तेव्हा फोटोसाठी उभं राहिल्यानं कंटाळलेली एकदोघं चक्क जमिनीवर लोळत होती.

पण समुद्राच्या पार्श्वभूमीवर वेगवेगळ्या पद्धतीनं उभ्या असलेल्या मुलांचा फोटो नंतर प्रत्येकाच्या आयुष्यातला एक अमूल्य ठेवा झाला. फोटो बघितला, की मागचे सगळे प्रसंग डोळ्यासमोर यायचे- जहाजातली सफर, सगळ्यांना हसवणारा मुलगा, झऱ्याचं गरम पाणी आणि भुतांच्या गोष्टी.

तोत्तोचान ती उन्हाळी सुट्टी जन्मात विसरणं शक्य नव्हतं.

ही त्या काळातील गोष्ट आहे जेव्हा तोक्योमधील घरांजवळील तलावात मासे असत अन् बैल कचरागाड्या ओढत.

## संगीत कवायत

उन्हाळी सुट्टी संपल्यावर दुसरं सत्र सुरू झालं. जपानमध्ये शाळा एप्रिलमध्ये सुरू होतात. स्वतःच्या वर्गातल्या मुलांबरोबरच आता तोत्तोचानची इतर वर्गातल्या मुलांबरोबरही दोस्ती झाली होती. सुट्टीतल्या वेगवेगळ्या उपक्रमांनी तिला तशी संधी दिली होती आणि तिचं तोमोई विद्यालयाविषयीचं प्रेमही अधिक वाढलं होतं.

'तोमोई' मधले वर्ग इतर शाळांपेक्षा वेगळे होते हे तर खरंच. पण तिथे बराच वेळ संगीताला दिला जाई हेही तिथलं एक वेगळेपण. तिथं संगीताचे अनेक धडे दिले जात. त्यातलाच एक होता. 'युरिथमिक्स' म्हणजे संगीत कवायत. संगीताच्या तालावर कवायतीचा हा प्रकार सर्वात पहिल्यांदा 1904 साली शोधून काढला, स्वित्झर्लंडमधले संगीतकार आणि संगीतशिक्षक एमिले जाक डेल्क्रोझ यांनी. थोड्याच अवधीत ही पद्धत सबंध युरोपखंडात प्रसिद्ध झाली आणि अमेरिकेतही लोकमान्य झाली. 'तोमोई'मध्ये ही पद्धत कशी सुरु झाली?

त्याचं असं झालं, की तोमोई सुरु करण्यापूर्वी सोसाकु कोबायाशी युरोपमध्ये गेले होते. तिथे त्यांनी लहान मुलांच्या शिक्षणपद्धतीचा अभ्यास केला, अनेक शिक्षणतज्ज्ञांना ते भेटले. पॅरिसला गेले असताना त्यांची भेट प्रसिद्ध संगीतकार आणि शिक्षणतज्ज्ञ डेल्क्रोझ यांच्याशी झाली.

डेल्क्रोझ यांना नेहमी वाटायचं, की संगीत हा एक नुसता कानांनी ऐकण्याचा विषय होण्यापेक्षा तो मुलांच्या हृदयापर्यंत पोचला पाहिजे. तरच संगीत निर्जीव आणि कंटाळवाणं न वाटता ते जिवंत सळसळतं वाटेल. पण काय केलं म्हणजे ते मुलांच्या मनापर्यंत पोचेल? त्यांनी खूप विचार केला. अचानक मुलांना उड्या मारताना, खेळताना पाहतांना त्यांच्या मनात आले, मुलांच्या या खेळानाच संगीताचा ताल दिला तर? यालाच त्यांनी नाव दिलं, 'युरिथमिक्स' किंवा 'संगीत कवायत'.

कोबायाशी पॅरिसमध्ये राहात असताना 'डेल्क्रोझ विद्यालयात' त्यांनी वर्षभर या नव्या प्रकारचा सर्व बाजूंनी अभ्यास केला. डेल्क्रोझ यांच्या या नव्या पद्धतीनं बरेच जपानी प्रभावित झाले होते. प्रख्यात संगीतकार यामादा; जपानमधील नव्या नृत्यप्रकाराचे जनक बाकु इशि; 'काबुकी' (जपानमधील परंपरागत नाट्यप्रकार) अभिनेता दुसरा इचिकावा सदांजी, नवनाट्याचा प्रणेता काओरू ओसन्नाई, नर्तक मिचिओ इतो, या सगळ्यांचंच मत होतं, की डेल्क्रोझ यांची पद्धत सर्वच कलांसाठी उपयोगी होती.

पण शालेय स्तरावर तिचा वापर करणारे सोसाकु कोबायाशी हे जपानमधले पहिलेच.

तुम्ही जर त्यांना विचारलंत, की 'युरिथमिक्स' म्हणजे काय? तर ते सांगत,

हा एक खेळ आहे. असा खेळ – जो शारीरिक यंत्रणा अधिक कार्यक्षम करतो. असा खेळ–जो मनाला शरीराचा उपयोग कसा करायचा ते शिकवतो. असा खेळ–जो शरीर आणि मनाला लयतालाची जाण देतो. 'युरिदमिक्स'च्या अभ्यासानं संपूर्ण व्यक्तिमत्त्व 'लयबद्ध' होतं, 'लयबद्ध' व्यक्तिमत्त्व अधिक भारदस्त, अधिक सतेज असतं आणि अशी व्यक्तिमत्त्वं निसर्गाच्या नियमांचं पालन अधिक चांगलं करू शकतात.

तोत्तोचानच्या वर्गानं हा शरीराला 'लय' शिकवणारा खेळ शिकायला सुरुवात केली होती. सभागृहातील छोट्याशा मंचावर मुख्याध्यापक 'पियानो' वाजवायला सुरुवात करीत आणि त्याच्या तालावर मुलांनी चालायला सुरुवात करायची. त्यांना कसंही चालायची मुभा होती. अट एकच– इतरांच्या मधे–मधे जाऊन कुणी पडणार नाही याची काळजी घ्यायची. त्यामुळं मुलं बहुधा गोलातच चालायची. मुलांना जर वाटलं, की हे संगीत द्रुतलयीत आहे तर ती चालता चालताच हात खालीवर हलवायची. पाय मात्र जोरात आपटायचे नाहीत किंवा खूप अवघडल्यासारखंही चालायचं नाही. संपूर्ण शरीर सैल सोडून 'आरामसे' चालायचं. सगळ्यात महत्त्वाची गोष्ट होती, स्वाभाविकता, ज्याला जसं आवडेल तसंच चालायचं. ताल बदलला, की त्यानुसार हात हालवायचे, गती बदलायची आणि तालाशी जुळवून घ्यायचं. आणि त्याप्रमाणे चालण्याची गती पण कमी जास्त करायची हे महत्त्वाचं.

अशा प्रकारे 'सहा ठोक्यांच्या' तालापर्यंत हात हालवण्याची पद्धत बदलावी लागे. चार ठोक्यांचा ताल सोपा होता. 'खाली, बाजूला, पीछेमूड आणि वर.'

पण पाचव्या मात्रेवर येताच : खाली, बाजूला, समोर, बाजूला आणि वर करावं लागायचं. तर सहा ठोके असले, की 'हात खाली, बाजूला' पीछेमूड, समोर, पीछेमूड समोर आणि वर या क्रमाने हलवावे लागत.

त्यामुळे ताल बदलला, की बरोबर तसे हात हालवणं कठीण व्हायचं. त्याहीपेक्षा कठीण व्हायचं, जेव्हा मुख्याध्यापक सांगायचे, ''मी संगीताची लय बदलली तरी तुम्ही गती बदलायची नाही.'' म्हणजेच समजा, मुलं द्रुतलयीनुसार वेगानं चालत असली आणि अचानक संगीताची लय मंदावली तरी मुलांनी वेगातच चालायचं. हे खरोखरच कठीण होतं. पण कोबायाशींच्या मते तसं केल्यानं एकाग्रता वाढायला मदत होते.

अखेरीस मुख्याध्यापक सांगायचे, ''आता तुम्ही गती बदलली तरी चालेल.''

मुलांना हायसं वाटायचं, पण त्यांना त्यासाठी खूप सावधान असावं लागायचं. कारण मुलं पहिला वेग बदलून संगीताशी जमवून घेईपर्यंत संगीताचा ठेका कदाचित् पुन्हा बदललेला असायचा. सुरुवाती–सुरुवातीला खूप गोंधळ व्हायचा आणि ''सर, थांबा! सऽऽर'' अशा आवाजांनी सभागृह भरून जायचं. पण

सरावानं तो खेळ अधिकाअधिक शिस्तबद्ध आणि रंजक होऊ लागला. नवीननवीन बदल आणि व्यायामप्रकार मुलांनीच शोधायला सुरुवात केली आणि आनंदात आणखीनच भर पडली.

सर्वसाधारणपणे प्रत्येकजण स्वतंत्रपणे हालचाली करत असत. पण कधीकधी मुलं जोडीजोडीनं हात धरून हालचाल करीत. तर कधी डोळे मिटून चालायचा प्रयत्न करीत. मनाई होती ती फक्त एकाच गोष्टीला–'' आपापसात गप्पा मारायच्या नाहीत!''

शाळेत शिक्षक पालक सभा असली, की पालक याही सभागृहात डोकावत. प्रत्येक मुलाला संगीताच्या तालावर मोकळेपणी हालचाली करताना पाहणं हा खरोखरचं आनंददायी अनुभव असायचा.

अशा प्रकारे युरिथमिक्सचं सगळ्यात पहिलं उद्दिष्ट होतं, शरीर आणि मनाला तालाची जाण देणं. नंतर शरीर आणि आत्म्याची एकतानता साधणं आणि सगळ्यात शेवटी, मुलांची प्रतिभा आणि कल्पनाशक्ती जागृत करणं.

पहिल्यांदा शाळेत आल्यादिवशी तोत्तोचाननं विचारलं होतं,

''आई, 'तोमोई' म्हणजे काय गं?''

''तोमोई' हे एक स्वल्पविरामासारखं परंपरागत प्रतीकात्मक चिन्ह आहे आणि मुख्याध्यापकांनी त्यांच्या शाळेसाठी दोन 'तोमोई' असलेलं प्रतीक तयार केलं होतं. एक काळं आणि दुसरं पांढरं. अशी दोन 'तोमोई' मिळून तयार होत होतं – संपूर्ण वर्तुळ.

यातून त्यांचं मुलांविषयीचं ध्येय सूचित होत होतं – शरीर आणि मन यांचा एकत्रित विकास.

'युरिथमिक्स' चा अंतर्भाव त्यांनी शाळेच्या अभ्यासक्रमात केला होता, कारण त्यांना खात्री होती, की त्यामुळे मुलांचा व्यक्तिमत्त्व विकास अधिक स्वाभाविकपणे होईल.

केवळ पुस्तकी–शिक्षणावर भर असलेल्या आणि मुलांची निसर्गाविषयीची स्वाभाविक ओढ आणि त्याहूनही सूक्ष्म अशा 'ईश्वरी' आवाजांची जाण दाबून टाकणाऱ्या समकालीन शिक्षणाचा मुख्याध्यापकांना तिटकारा होता. कारण 'निसर्ग' आणि ईश्वर' ही प्रेरणास्थानं असतात ही त्यांची धारणा होती.

'बाशो' हा कवीच फक्त हे लिहू शकला–

पुराणे तळे
बेडूक मारी उडी
पाण्याचा ध्वनी–

या ठिकाणी छोट्याशा बेडकाच्या उडीनेसुद्धा जाणवणारा आवाज आणि त्यामुळे जाणवणारी नीरव शांतता बाशोने टिपली आहे. एरवी तळ्यामध्ये उडी मारणारा बेडूक कित्येकांनी बघितलेला असतो. चहाच्या किटलीतील वाफ किंवा झाडावरून पडणारं सफरचंद बघणारे वॉट किंवा न्यूटन काही जगातले पहिलेच नव्हते.

डोळे असतात पण सौंदर्यसृष्टी नसते, कान असतात पण संगीत ऐकलेलं नसतं, मन असतं पण सत्याचं भान नसतं. हृदय असतं पण जगातली दुःखं तिथवर पोचत नाहीत. या गोष्टींची भीती वाटली पाहिजे; कारण त्या माणसाला माणूसपणापासून दूर नेतात, असं मुख्याध्यापक सांगत.

तोत्तोचानपुरतंच बोलायचं झालं, तर अनवाणी पायांनी संगीताच्या तालावर उड्या मारताना आपण जणू 'इसाडोरा डंकन' आहोत असं तिला वाटायला लागायचं आणि ती स्वतःलाही विसरून जायची. मग हा आपल्या शाळेच्या अभ्यासातला एक भाग आहे याचा विसर तिला पडला, तर त्यात नवल ते काय?



# ''मला हेच हवंय''

आयुष्यात प्रथमच तोत्तोचान देवळातल्या जत्रेला गेली होती. तिच्या पूर्वीच्या शाळेजवळ सेन्झोकु तळयाच्या मध्यभागी एक छोटंसं बेट होतं आणि त्यावर होतं बेनतेन्चं मंदिर. बेनतेन ही जपानमधली सौंदर्य, संगीत आणि भाग्याची देवता मानली जाते. (भारतातील सरस्वती ही देवता बौद्ध धर्माद्वारे जपानमध्ये पोहोचली आणि 'बेनतेन' झाली.) जत्रेच्या रस्त्यावर अंधार असला तरी, प्रत्यक्ष जत्रेचं ठिकाण मात्र असंख्य दिव्यांच्या प्रकाशानं उजळून निघालं होतं. आई-बाबांबरोबर जाताना तोत्तोचान रस्त्याच्या दुतर्फा असलेल्या प्रत्येक दुकानात डोकावत होती. चहूबाजूंनी चित्रविचित्र आवाज येत होते. तऱ्हेतऱ्हेचे खाद्यपदार्थ आणि विविध वस्तूंची दाटी झाली होती. सगळंच कसं नवं आणि वेगळं वाटत होतं.

तिथे खेळण्यातला 'हुक्का' होता. तो ओढला, की मस्त 'पेपरमिंट'चा वास यायचा आणि घशाला थंड वाटायचं. अनेक प्रकारची मिठाई आणि लॉलिपॉप जिकडे तिकडे दिसत होते. एके ठिकाणी बांबूच्या बंदुकी होत्या. त्यात एका विशिष्ट वनस्पतीची काडी घातली की बंदुक उडाल्यासारखा आवाज यायचा.

रस्त्याच्या कडेला एक माणूस काचा, सुऱ्या, चाकू खाऊन दाखवत होता. एका जादूगाराजवळ जादूच्या सोन्याच्या अंगठ्या होत्या. सूर्यप्रकाशात धरले, की चित्र उमटणारे कागद होते. पाण्यात भांड्यात बुडवली, की फुलणारी कागदी फुलं होती. हे सारं पहात जात असतानाच तोत्तोचान अचानक थांबली.

''आई, बघ-बघ.'' तिची नजर एका खोक्यात ठेवलेल्या, पिवळ्या रंगाच्या कोंबडीच्या पिलांवर पडली होती.

''आई, मलाही एक हवं. '' तिनं आईचा हात ओढत सांगितलं.

''घे ना गं माझ्यासाठी एक, घे नंऽऽ'' ती पिलं तोत्तोचानकडे माना उंचावून बघत होती आणि खोक्यातल्या खोक्यात उड्या मारत कलकलत होती.

''किती गोऽड आहेत नै ही पिलं?'' तोत्तोचानच्या मनात आलं, ''या पिलांइतकं सुंदर जगात काहीच असू शकणार नाही.''

''घे नंऽऽ'' तिनं मोठ्या आशेनं आईबाबांकडे बघितलं. पण आश्चर्य म्हणजे बाबांनी तिचा हात धरून तिला पटकन् बाजूला केलं.

''पण तुम्ही तर म्हणाला होतात, की जत्रेत तुला हवं ते घेऊन देऊ. मला हेच पाहिजे.''

''राणी, अगं ती बिचारी पिलं लवकरच मरून जातील,'' आईनं शांतपणे समजवण्याचा प्रयत्न केला.

''कशी?'' तोत्तोचाननं विचारलं आणि चक्क रडायला सुरूवात केली.

बाबांनी तिला जरा बाजूला घेतली आणि दुकानदाराला ऐकू जाणार नाही अशा

बेतानं ते म्हणाले, ''हे बघ, ती कितीही गोड दिसत असली, तरी फार अशक्त आहेत. ती फार जगणं शक्य नाहीये. नंतर तुलाच खूप वाईट वाटेल. म्हणून आम्ही ती घेत नाही, समजलं?''

''पण मी त्यांना मरू नाही देणार, त्यांची नीट काळजी घेईन.'' तोत्तोचानला ती पिलं हवीच होती. आई–बाबांनी तिला तिथून दूर नेण्याचा खूप प्रयत्न केला.

''हे बघ, शेवटी तुलाच त्रास होईल, म्हणून सांगतोय नं?''

आता मात्र तोत्तोचान हमसून–हमसून रडायला लागली.

''मी आतापर्यंत इतक्या हट्टानं काहीच मागितलं नव्हतं. यापुढेही काही मागणार नाही. पण ती पिलं मला हवीतच.''

अखेर आई–बाबांनी हार मानली. मुसळधार पावसानंतर स्वच्छ सूर्यप्रकाश पडावा तसं तोत्तोचानला झालं. छोट्याशा खोक्यात दोन पिलांना घेऊन ती नाचत–नाचतच घरी आली.

दुसऱ्या दिवशी सुताराला बोलावून त्यांच्यासाठी एक लाकडी खोकं आईनं करवून घेतलं. पिलांना ऊबदार वाटावं म्हणून आत एक विजेचा दिवाही बसवून घेतला. तोत्तोचान आख्खा दिवस पिल्लांकडे पाहात असे. ती पिल्लं खरोखरच गोड होती, पण अखेर चौथ्या दिवशी त्यातल्या एकाची हालचाल थांबली आणि पाचव्या दिवशी दुसऱ्याची. तोत्तोचाननं त्यांना खूप हाका मारल्या, पण त्यांनी मान वर करुन तिच्याकडे बघितलं नाही, की चोच उघडली नाही. आई–बाबा म्हणाले होते, तसंच झालं होतं.

स्वतःशीच रडत तिनं बागेत एक खड्डा खणला आणि ते दोन्ही निर्जीव पक्षी त्यात ठेवले. वरून माती लोटून तिनं त्यावर छोटी फुलं वाहिली.

रिकामं लाकडी खोकं भकास दिसत होतं आणि त्याच्या कोपऱ्यात अडकून राहिलेलं एक पिवळं पीस पाहून तिच्या आठवणी अनावर होत होत्या. ओठ आवळून ती मनातल्या मनात रडत होती.

यापूर्वी तिनं इतक्या उत्कटपणे कशाचीच इच्छा केली नव्हती आणि ते सगळं इतक्या पटकन् संपलं होतं. तो तिचा विरहाचा आणि दुःखाचा, जीवनातला पहिलाच अनुभव होता.

## सगळ्यात खराब कपडे

मुख्याध्यापक नेहमी पालकांना सांगत, ''मुलांना शाळेत पाठवताना त्यांचे सगळ्यात खराब कपडे घालत जा.''

कपडे खराब असले, की ते मळण्याची किंवा फाटण्याची भीती नसे. कपडे मळण्याच्या किंवा फाटण्याच्या भीतीनं मुलांनी मोकळेपणानं न खेळणं त्यांना

लज्जास्पद वाटायचं. मुलांनी मुलांसारखं असावं आणि त्यांनी निष्कारण काळज्या करू नयेत असं त्यांचं स्पष्ट मत होतं.

''तोमोई'च्या आसपासच्या शाळांमध्ये, मुलं-मुली छान छान गणवेष घालायची, पण तोमोईचे विद्यार्थी मात्र त्यांचे नेहमीचे साधे कपडे घालायचे आणि कपड्यांची फिकीर न करता मनमुराद खेळण्याची त्यांना त्यांच्या शिक्षकांची पूर्ण परवानगी होती. त्यावेळचं पँटचं कापड आजच्या 'जीन्स' इतकं टिकाऊ नव्हतं. त्यामुळं प्रत्येक विद्यार्थ्यांच्या पँटला ठिगळं असायचीच आणि मुलींचे स्कर्टही जास्तीत जास्त जाड कापडाचे असायचे.

तोत्तोचानला बागेच्या तारेच्या कुंपणाखालून सरपटत बागेत जायला खूप आवडायचं. त्यामुळे तर तिला साधे कपडे घालणं फारच सोयीचं होतं. त्याकाळी तारांची कुंपणं कधीकधी अगदी जमिनीलगत असायची. त्याखालून सरपटायचं म्हणजे अक्षरशः कुत्र्या-मांजरासारखं अंग चोरून जावं लागायचं. कितीही काळजी घेतली, तरी तोत्तोचानचे कपडे तारांमध्ये अडकायचे आणि फाटायचे. तिचा एक मलमलचा फ्रॉक होता. एकदा तर तारेत अडकून तो पार वरपासून खालपर्यंत फाटला. खरं म्हणजे तो खूप जुना होता, तरी आईचा खूप आवडता होता. त्यामुळे आईला कसं सांगायचं हा प्रश्नच होता. खरं सांगायचा धीर होईना तेव्हा तिनं खूप विचार करून थाप मारायचं ठरवलं.

''आई, असं मी रस्त्यानं येत होते नं, तेव्हा काय माहीत कोण मुलं होती, पण त्यांनी माझ्या पाठीवर चाकू फेकला आणि माझा फ्रॉक फाटला.'' तिनं घाईघाईनं खोटं बोलून टाकलं. अन् यापेक्षा जास्त आईनं काही विचारलं तर?

पण सुदैवानं आई एवढंच म्हणाली. ''बिचारी!''

तोत्तोचाननं सुटकेचा निःश्वास टाकला. आईला नक्कीच पटलं असणार, तशा परिस्थितीमध्ये ती तरी काय करणार होती?

अर्थातच, आईचा 'चाकूच्या' त्या गोष्टीवर विश्वास बसणं शक्य नव्हतं आणि 'तोत्तोचान' अशा थापा कधीच मारत नसे. आईला जाणवलं, की फ्रॉक फाटल्यानं तोत्तोचानला खूप वाईट वाटलं असणार आणि आईला त्यातच समाधान होतं. पण बऱ्याच दिवसांपासून आईला अजून एका गोष्टीचं कुतूहल होतं आणि ते विचारायला ती छान संधी होती.

''चाकू वगैरेमुळे तुझा फ्रॉक फाटला हे ठीक, पण तुझ्या 'चड्ड्या' कशा फाटतात? आणि त्याही नेहमीच?''

तोत्तोचाननं क्षणभर विचार केला, शेवटी खरं सांगून टाकलं.

''अगं तारेच्या कुंपणाखालून सरपटत जायचं म्हणजे त्यात स्कर्ट अडकणारच आणि शिवाय ''मी आत येऊ का?'' नंतर 'अच्छा' असंही म्हणायलाच हवं की. कपडे फाटणार नाही तर काय?''

आईला खरं म्हणजे काहीही समजलं नव्हतं. पण काहीतरी गंमतशीर प्रकार असावा असं मात्र वाटलं.

''मजा येते?'' तिनं विचारलं.

''तू करून बघ नं एकदा. तुझेही कपडे फाटतील,'' तोत्तोचाननं उत्साहानं सुचवलं.

तोत्तोचानला इतका आवडणारा खेळ काहीसा असा होता :

सर्वात आधी कुणाची तरी तारेचं कुंपण असलेली बाग किंवा मोकळी पडलेली जमीन शोधून काढायची, कुंपणाच्या तारा थोड्या उचलायच्या, आत डोकवायचं आणि विचारायचं, ''मी आत येऊ?'' (हा प्रश्न अर्थात् कुणा माणसाला नाही तर त्या बागेला असायचा) मग अजून दोन-तीन तारा वर उचलायच्या, आत जातायेण्याइतकी जागा व्हावी म्हणून जमीन थोडी उकरून माती बाजूला करायची आणि आत जायचं. आणि पूर्ण आत शिरायच्या आधीच मागे वळून कुंपणाला सांगायचं,'' बरंय, अच्छाऽऽ.''

आता आईच्या डोक्यात प्रकाश पडला. मग तोत्तोचानचे कपडे फाटणंच स्वाभाविक होतं आणि हा खेळ अनेकदा खेळला जायचा. प्रत्येक वेळी ''आत येऊ का?'' आणि ''अच्छा!'' असायलाच हवा होता. मग प्रत्येक वेळी कपडे फाटणारच. तोत्तोचान खूप आनंदानं कुंपणाखालून ये-जा करायची. मोठ्या माणसांना कंटाळवाणा किंवा निव्वळ मूर्खपणाचा वाटणारा एखादा खेळ, लहान मुलांना मात्र किती मजेचा वाटू शकतो नाही? अंगावर मळके कपडे, केसात, नखात आणि कानातसुद्धा धूळ गेल्यानं तोत्तोचानचं ते ध्यान पाहून आईलाही क्षणभर तिचा हेवा वाटला आणि पुन्हा एकदा तिला मुख्याध्यापकांचं कौतुक वाटलं. 'मुलांना असे कपडे घाला, की जे कितीही मळले तरी चालतील.' ही त्यांची सूचना त्यांनी मुलांना किती समजून घेतलेलं होतं याचं जिवंत उदाहरण होती.

## ताकाहाशी

एक दिवस सकाळी मुख्याध्यापक एका छोट्या मुलाला घेऊन आले आणि इतर मुलांना त्याची ओळख करून दिली.

''हा ताकाहाशी, तो आता पहिलीच्या आगगाडीमध्ये बसेल.''

तोत्तोचान आणि तिच्या वर्गमित्रांनी त्याच्याकडे कुतूहलानं बघितलं, त्यानं टोपी काढली आणि सगळ्यांना वाकून 'नमस्ते!' केलं.

तोत्तोचान आणि इतर मुलंही खरं म्हणजे पहिलीत असल्यानं खूप लहान होती. पण हा नवा मुलगा खूपच लहान दिसत होता. बुटकेबुटके पाय आणि छोटेछोटे हात असलेल्या त्या मुलाचे खांदे मात्र रुंद होते. इतर मुलांपेक्षा तो वेगळाच जाणवत असे.

''चला, आपण त्याच्याशी गप्पा मारू,'' तोत्तोचान, मियोचान आणि साकोचानला म्हणाली. त्या तिघी ताकाहाशीजवळ गेल्या. त्यांना येताना पाहून

ताकाहाशी किंचित हसला. तोत्तोचानही उत्साहानं हसली. त्याचे गोलगोल डोळे चमकत होते. त्याला काहीतरी बोलायचं होतं.

''ए, तुला आगगाडीतला आपला वर्ग बघायचाय्?'' तोत्तोचाननं विचारलं.

''हं!'' टोपी परत डोक्यावर घालत तो उत्तरला.

त्याला वर्ग दाखवण्याची तोत्तोचानला फार घाई झाली होती. ती धावतच वर्गाकडे गेली आणि बघता बघता ती गाडीत चढलीसुद्धा, दारात उभं राहून तिनं हाक मारली. ''एऽऽ लवकर येनं.''

ताकाहाशी भराभर धावण्याचा खूप प्रयत्न करत होता. पण तरीही बरंच अंतर होतं.

''आलोऽऽ आलो!'' वेग वाढवण्याचा प्रयत्न करत तो म्हणाला.

तोत्तोचानच्या लक्षात आलं, यासुकीचानसारखा याला पोलिओ जरी झालेला नसला, तरी त्याला पळायला यासुकीचानइतकाच वेळ लागत होता. तिनं शांतपणे त्याच्या येण्याची वाट पाहिली. ताकाहाशी जमेल तेवढ्या वेगानं येत होता आणि 'लौकर' ये असं त्याला सांगण्याची गरजच नव्हती-उपयोगही नव्हता. त्याचे पाय खूपच बुटके होते आणि मोठ्या माणसांना माहीत होतं, की त्याची वाढ खुंटली होती. तो कायमचा बुटका राहाणार होता. जेव्हा त्याने तोत्तोचानला आपल्याकडे बघताना पाहिलं तेव्हा तो अजून जोराने चालू लागला. त्याचे दोन्ही हात या प्रयत्नात वेगाने हलू लागले. वर्गाजवळ पोचल्यावर धापा टाकतच तो तोत्तोचानला म्हणाला, ''तू किती जोरात पळतेस गं.'' आणि अचानक म्हणाला, ''मी 'ओसाका'हून आलोय.''

'ओसाका?' तोत्तोचान जवळजवळ ओरडलीच. 'ओसाका' हे तिला परीकथेतल्या शहरासारखं स्वप्नातलं शहर होतं. तिचा मामा विद्यापीठात शिकत होता. तो कधी घरी आला, की तिचं डोकं दोन्ही हातात पकडून तिला उंच उचलायचा, म्हणायचा,

''तुला ओसाका दाखवू? बघ-बघ दिसलं?'' ती खरं म्हणजे नुसती गंमत होती, पण तोत्तोचानचा मामावर विश्वास होता. तसं केल्यानं तिचे कान ओढले जात, दुखत; पण ती खूप उत्सुकतेनं डोळे फाडून 'ओसाका' बघण्याचा प्रयत्न करायची. अर्थात तिला 'ओसाका' कधीच दिसलं नाही. पण एक ना एक दिवस ते दिसेल याची तिला खात्री होती.

मामा घरी आला, की तीच त्याला म्हणायची, ''मला ओसाका दाखव नं.''

आणि अशा त्या स्वप्ननगरीतून ताकाहाशी आला होता.

''ए, मला ओसाकाबद्दल सांग नं.'' ती म्हणाली.

''ओसाकाबद्दल?'' त्यानं आनंदानं विचारलं. त्याचा आवाज थोडा प्रौढ होता अन् तेवढ्यात घंटा झाली.

'च् च् च्' तोत्तोचान चुकचुकली. ताकाहाशी चटकन वर्गात गेला. आणि

दप्तराखाली जवळजवळ झाकलं गेलेलं त्याचं ठेंगणं शरीर डोलावत डोलावत पहिल्या बाकावर जाऊन बसला. त्या शाळेत जागा ठरलेल्या नसत हे फार बरं होतं. तिला ताकाहाशीला सोडायचं नव्हतं.

आणि तोत्तोचानच्या मित्रमंडळात आता ताकाहाशीची भर पडली होती.

## ''उडी मारण्यापूर्वी पहा''

घरी जाण्याच्या रस्त्यावर, त्या दिवशी तोत्तोचाननं जे बघितलं ते पाहून तिच्या आश्चर्याला आणि आनंदाला सीमाच उरली नाही. खरं म्हणजे घर खूप जवळ आलं होतं पण तिला घरी जाण्याचं भानच नव्हतं.

तो एक मोठ्ठा वाळूचा ढीग होता. समुद्र तर तिच्या गावापासून खूप दूर होता. मग समुद्रातली वाळू इकडे कुठे? तिला वाटलं, ती स्वप्नात तर नाही? आनंदाच्या भरात तिनं धावतधावत जाऊन त्या वाळूच्या किनाऱ्यावर उडी मारली. आणि... तिला काही समजायच्या आत ती कसल्यातरी गुळगुळीत पांढऱ्या चिखलात तिच्या दप्तरासकट बुडाली. तिला हालचालही करता येईना. ती छातीपर्यंत अडकली होती... एखाद्या पुतळ्यासारखी.

तो वाळूचा ढीग खरं म्हणजे वाळूचा ढीग नव्हताच. घराच्या भिंतीना गिलावा करण्यासाठी तयार करून ठेवलेलं ते प्लास्टरचं मिश्रण होतं.

बाहेर पडण्यासाठी ती जो-जो हालचाल करत होती, तो-तो तिचा पाय त्या गुळगुळीत प्लास्टरवरून घसरत होता. जास्त हालचाल केली, तर ती आख्खीच आत बुडण्याची शक्यता होती. त्यामुळे स्तब्ध उभं राहाण्याशिवाय दुसरा मार्ग नव्हता. रस्त्यावरून जाणाऱ्या एक-दोन बायकांना तिनं शुक्शुक् करून हाका मारायचा प्रयत्न केला. पण त्यांना वाटलं, ती त्या चिखलात खेळत असावी, त्या सरळ निघून गेल्या.

संध्याकाळ झाली तरी तोत्तोचान् घरी आली नाही. तेव्हा काळजीनं आई तिला शोधायला बाहेर पडली आणि प्लास्टरच्या ढिगाऱ्यात गळ्यापर्यंत बुडालेल्या तोत्तोचानला पाहून तिला धक्काच बसला. आईनं आधी तिला हाताला धरून बाहेर ओढण्याचा प्रयत्न केला. पण आईचाच पाय प्लास्टरवरून घसरायला लागला. तेव्हा तिनं एक लांब बांबू घेतला आणि त्याच्या साहाय्यानं तिला बाहेर काढली.

'तोत्तोचान' गिलावा केलेल्या पांढऱ्या भिंतीसारखीच दिसत होती.

''मला वाटतं, मी पूर्वीही एकदा तुला हे सांगितलं होतं, की एखादी गोष्ट आवडली म्हणून त्यावर एकदम उडी मारण्याआधी नीट पाहायला शीक,'' आई म्हणाली.

'पूर्वीही एकदा' असं म्हणण्याला तसंच कारण होतं. एकदा तोत्तोचान

सभागृहाच्या मागे उगाचच भटकत होती. तेवढ्यात तिला वर्तमानपत्राचा एक कागद रस्त्यात मधेच पसरून ठेवलेला दिसला.

तिच्या मनात आलं, ''या कागदाच्या बरोबर मधे उडी मारता यायला पाहिजे.'

झालं! तिनं लगेच दोन-तीन पावलं मागं सरकून उडी मारण्याची तयारी केली. एक-दोन साडेमाडे तीन-

आणि धपकन् कसल्यातरी खड्ड्यात पडली. तिची पर्स शोधण्यासाठी उपसलेल्या त्या गटाराचंच ते तोंड होतं. काहीतरी कामासाठी रखवालदारानं ते उघडलं होतं. काहीतरी काम असल्याकारणानं जाताना त्यानं गटाराचा वास येऊ नये म्हणून त्यावर कागद पसरला होता.

नंतर तोत्तोचानला बाहेर काढून स्वच्छ करण्यासाठी शिक्षकांना फारच कष्ट पडले होते. त्या प्रसंगाबद्दल आत्ता आई बोलत होती.

''मी पुन्हा नाही असं करणार.'' तोत्तोचान म्हणाली.

आईनं सुटकेचा निःश्वास टाकला. पण तोत्तोचानचं पुढचं वाक्य ऐकून मात्र तिचा आनंद क्षणिक असल्याचं तिला जाणवलं.

कारण तोत्तोचान म्हणाली, ''मी पुन्हा कधीच वाळूच्या ढिगावर किंवा वर्तमानपत्राच्या कागदावर उडी मारणार नाही.''

अर्थात, याचा अर्थ ती इतर कशावर उडी मारणारच नाही अशी खात्री देता येणं शक्य नव्हतं.

हिवाळ्याचे दिवस होते आणि अंधार वाढत होता. त्या दोघी घरी पोचल्या तेव्हा रात्र पडायला लागली होती.

## ''आणि मग उदंड''

'तोमोई' मध्ये जेवणाची सुट्टी नेहमीच आनंदाची असायची पण आता त्या आनंदात अजून एक भर पडली होती.

पूर्वीप्रमाणेच मुख्याध्यापक प्रत्येकाचा डबा बघत, जे कमी असेल ते त्यांच्या पत्नी वाढत. नंतर ''प्रत्येक घास चावून खावा'' हे गाणं. असा नेहमीचा कार्यक्रम तर होताच, पण त्याच्या जोडीलाच आता रोज काही तरी बोलायला लागायचं.

एक दिवस मुख्याध्यापक म्हणाले, ''मला वाटतं चांगलं कसं बोलावं हे आपल्यापैकी प्रत्येकानं शिकलं पाहिजे. म्हणून आजपासून डबा खात असतानाच, रोज एकानं सगळ्यांसमोर उभं राहून बोलायचं, काहीही बोललं तरी चालेल. चालेल?''

काही मुलांच्या मनात आलं. त्यांना फारसं बोलता येणार नाही. पण इतरांचं ऐकायला काय मज्जा येईल. तर या उलट काहींना वाटलं, त्यांना माहीत असलेल्या गोष्टी इतरांना सांगायच्या. व्वा! खरंच मस्त कल्पनाय्.

तोत्तोचानला, ती कसं बोलू शकेल हे माहीत नव्हतं. पण एकदा प्रयत्न करायला तिची हरकत नव्हती. एकूण काय, सगळ्याच मुलांना कल्पना पसंत होती आणि दुसऱ्या दिवशीपासून ती अंमलात आणली जाणार होती.

खरं म्हणजे जपानी मुलांना जेवताना बोलायचं नसतं, असं शिकवलं जायचं. पण जगात इतर ठिकाणी घेतलेल्या अनुभवामुळे मुख्याध्यापक मात्र शांतपणे गप्पा मारत जेवावं अशा मताचे झाले होते.

शिवाय मुलांनी सगळ्यांसमोर उभं राहून न संकोचता, स्पष्टपणे त्यांच्या कल्पना आणि विचार सांगावेत असा त्यांचा प्रयत्न होता. त्यासाठी प्रत्यक्ष प्रयत्न आणि कृती आता करायला हवी होती. मुलांनी कल्पना मान्य केल्यावर त्यांनी जे सांगितले ते तोत्तोचानने मोठ्या लक्षपूर्वक ऐकलं.

ते म्हणाले, ''तुम्ही चांगलं बोललात का वाईट याची चिंता करू नका. तुम्हाला जे काही आणि जसं बोलायचं असेल तसं बोला. आपण प्रयत्न तर करून पाहू या. हं?''



मग बोलणाऱ्यांचा क्रम ठरवला गेला. आणि असंही ठरलं, की ज्याचा बोलण्याचा वार असेल त्यानं त्या दिवशी पटकन् डबा खाऊन आटोपायचा.

लवकरच मुलांच्या लक्षात आलं, की एकदोन मित्रांशी गप्पा मारणं वेगळं, पण आख्ख्या शाळेसमोर उभं राहून बोलणं मात्र सोपं नाही. सुरुवातीला काही मुलं इतकी लाजायची, की ती तोंडातल्या तोंडात काहीतरी पुटपुटायची. एका मुलानं खूप प्रयत्न करून एक छानसं भाषण तयार केलं. पण तो उभा राहिला आणि सगळंच विसरला.

''बेडूक उड्या का मारतात?'' त्यानं हा भाषणाचा विषय दोन-तीन वेळा सांगितला. मग त्यानं सुरुवात केली, 'पाऊस पडायला लागला की...' पण पुढे काहीच आठवेना. अखेर ''एवढे बोलून मी माझे भाषण संपवतो'' असं म्हणून तो जागेवर जाऊन बसला.

तोत्तोचानची वेळ अजून आली नव्हती. पण तिनं ठरवून टाकलं होतं, की तिची आवडती, ''राजपुत्र आणि राजकन्येची'' गोष्ट सांगायची. खरं तर ती गोष्ट सगळ्यांनाच माहीत होती आणि तिनं कधी ती सांगायला सुरुवात केली तर मुलं



म्हणत, ''ती गोष्ट नको. आता कंटाळा आलाय तिचा.''

पण तरीही तोत्तोचान तीच गोष्ट सांगणार होती.

ही नवी योजना छान पार पडत असतानाच एक दिवस एका मुलानं बोलायला साफ नकार दिला.

''माझ्याकडे सांगण्यासारखं काहीच नैये.'' तो स्पष्ट म्हणाला. तोत्तोचानला याचं फारच आश्चर्य वाटलं.

मुख्याध्यापक त्याच्या बाकाजवळ गेले आणि म्हणाले, ''तुला खरंच काही सांगायचं नाही?''

''खरंच नै.'' त्यानं प्रामाणिकपणानं सांगितलं. त्याला काय बोलावं हे खरंच सुचत नव्हतं.

''चल, आपण तुला बोलण्यासारखं काही तरी शोधू या,'' मुख्याध्यापक म्हणाले.

''शोधू या?'' त्याला धक्काच बसला.

मुख्याध्यापकांनी त्याला सगळ्यांसमोर उभं केलं आणि ते त्याच्या जागेवर बसले.

''हं, आठव बरं, तू सकाळपासून काय काय केलंस? सांग, सकाळी उठल्यापासून शाळेत येईपर्यंत तू काय केलंस?'' त्यांनी विचारलं,

''मी नंऽऽ...'' तो म्हणाला आणि विचार करायला लागला.

''छान! तू म्हणालास, मी नं ...बघ तुला बोलता आलं. पुढे?'' मुख्याध्यापकांनी विचारलं.

''मी.....अंऽऽ मी उठलो.'' तो डोकं खाजवत म्हणाला.

सगळी मुलं मन लावून ऐकत होती.

तो पुढे बोलत होता, ''आणि मग... अंऽऽ!!''

मुख्याध्यापक हसतमुखानं त्याच्याकडे बघत होते.

''अरे व्वा! तू सकाळी उठलास, हे सगळ्यांना छान समजलं. हे बघ, चांगलं बोलता येण्यासाठी लोकांना हसवलंच पाहिजे असे नाही किंवा खूप आवेशात बोललं पाहिजे असंही नाही. सगळ्यात महत्त्वाची गोष्ट अशी, की तू म्हणत होतास की तुझ्याजवळ बोलण्यासारखं काही नाही. पण बघ सापडलं की नै बोलण्यासारखं.''

मग तो अजून मोठ्यानं म्हणाला, ''आणि... अं... आई, अं... ती म्हणाली दात घास... अं... म्हणून... अं... मी दात घासले.''

मुख्याध्यापकांनी टाळ्या वाजवल्या. सगळ्या मुलांनीही वाजवल्या.

''मग... अं...'' त्यानं पुढं सांगायला सुरुवात केली.

सगळे श्वास रोखून ऐकत होते. शेवटी त्यानं विजयी मुद्रेनं सांगितलं...

''नंतर......अंऽऽ....मी शाळेत आलो.''

त्याला बोलता आलं म्हणून सगळ्यांनाच खूप आनंद झाला होता.

मुख्याध्यापक मनापासून टाळ्या वाजवत होते. सगळी मुलंही टाळ्या वाजवत होती.

आणि सगळ्यांसमोर उभा राहून तो, ''आणि मग... अं...'' तो सुद्धा टाळ्या वाजवत होता. सभागृह टाळ्यांच्या आवाजानं भरलं होतं.

मोठं झाल्यानंतरसुद्धा तो त्याचं ते ''नंतर...अं......मी.......'' विसरला नसेल.

## ''पण आम्ही नुसतंच खेळत होतो''

त्या दिवशी तोत्तोचान शाळेतून घरी आल्यावर रॉकीशी 'लांडगा लांडगा' खेळत असताना चांगलाच अपघात झाला.

त्याचं असं झालं, तोत्तोचान आणि रॉकी नेहमीच एक खेळ खेळायचे. दोघांनी विरुद्ध दिशेनं लोळत-लोळत यायचं आणि एकमेकांवर आदळायचं. त्या दिवशीही ते बराच वेळ असं खेळले. आणि त्यांनी ठरवलं, की आता जरा आणखी काहीतरी थोडसं वेगळं खेळू या. अर्थात त्यांनी ठरवलं म्हणजे तोत्तोचाननंच ठरवलं.

तिची नवी कल्पना अशी होती, की दोघांनी दोन बाजूंनी येऊन आदळलं, की एकमेकांकडे बघून लांडग्यासारखा चेहरा करायचा आणि एकमेकांना घाबरवायचं, जो जास्तीत जास्त भीतीदायक चेहेरा करेल तो जिंकला.

रॉकी जर्मन शेफर्ड जातीचा कुत्रा होता. त्यामुळे लांडग्यासारखं दिसणं त्याला मुळीच अवघड नव्हतं. कान ताठ केले, जबडा उघडला आणि डोळे मोठे केले की झालं. पण तोत्तोचानला मात्र थोडं कठीण होतं-ती दोन्ही हात कानासारखे धरायची, डोळे मोठे करायची आणि आऽवासून गुरगुरण्याचा आवाज करायची. सुरुवातीला रॉकी छान खेळत होता, पण तो अजून तसा लहानच होता. त्यामुळे तो अचानक विसरला, की आपण खेळतोय आणि तोत्तोचानला काही समजायच्या आतच घाईघाईनं तिला चावला.

रॉकी जरी लहान होता, तरी तोत्तोचानपेक्षा आकारानं जवळजवळ दुप्पटं होता आणि त्याचे दातही तीक्ष्ण होते. काही कळायच्या आतच तोत्तोचानचा कान फाटून लोंबकळू लागला आणि त्यातून भळाभळा रक्त वाहायला लागलं होतं.

तिची किंकाळी ऐकून आई स्वयंपाकघरातून धावतच आली. खोलीच्या कोपऱ्यात तोत्तोचान दोन्ही हातांनी 'कान' धरून बसली होती. सगळा फ्रॉक रक्तानं माखला होता. बाबा बाहेरच्या खोलीत व्हायोलीन वाजवत बसले होते, तेही चटकन् आत आले. रॉकी ला आता जाणवायला लागलं होतं, की आपण काहीतरी भयंकर केलंय. तो बिचारा मधेमधे घोटाळत होता आणि तोत्तोचानकडे घाबरून पाहात होता.

तोत्तोचानला मात्र वेगळीच भीती वाटत होती. आई-बाबा जर रॉकीवर चिडले आणि त्याला हाकलून दिलं तर? तिच्या दृष्टीनं ते फार भयंकर होतं. ती चटकन् रॉकीजवळ गेली.

''आई, रॉकीवर रागावू नको, त्यानं काही केलं नाही.'' ती जोराजोरात ओरडत होती.

आई-बाबांचं लक्ष मात्र तिला कितपत लागलंय इकडे होतं. म्हणून ते तिचा कानावर धरलेला हात ओढून काढायचा प्रयत्न करत होते.

''दुखत नाहीये. खरंच नाही. पण रॉकीला हाकलून देऊ नका,'' तिचा तो सूर होता. तोत्तोचानला खरोखरच जखमेचं काही वाटत नव्हतं, तिला चिंता वाटत होती ती रॉकीची.

रक्त वाहातच होतं. आई-बाबांना रॉकी तिला चावला असेल याची कल्पना एव्हाना आली होती. त्यांनी तिची खूप समजूत घातली. रॉकीला हाकलून देणार नाही, असं कबूल केलं. तेव्हा कुठं त्या पोरीनं कानावरचे हात काढले.

तोत्तोचानचा कान फाटलेला बघून आईनं तर किंकाळीच फोडली. बाबांनी तिला चटकन् दवाखान्यात नेली. वेळेत उपचार केले म्हणून तिचा कान नीट शिवला गेला. पण तोत्तोचानला एकच काळजी वाटत होती- आई-बाबा कबूल केल्याप्रमाणे वागतील की नाही?

तोत्तोचानच्या डोक्याला सबंध बँडेज बांधावं लागलं. ती एखाद्या सश्यासारखी दिसत होती. बाबांनी कबूल केलं होतं तरी, रॉकीला रागवावं असं त्यांना फार वाटत होतं. पण आईनी डोळ्यांनीच त्यांना दटावलं. कारण रॉकीला रागावलं तर तोत्तोचान काय करेल, हे सांगता येत नव्हतं.

ती घाईघाईनं घरात शिरली. तिला रॉकीला सांगायचं होतं, की तिला छान बरं वाटतंय् आणि आई-बाबा सुद्धा चिडले नाहीयेत्.

पण तिला रॉकीच दिसेना. ''रॉकीऽऽ, रॉऽऽकी'' तिनं तीन चार हाका मारल्या, पण रॉकी आला नाही. आता मात्र तिला रडायला यायला लागलं. ती डॉक्टरांकडे सुद्धा रडली नव्हती... कारण ती रडली असती, तर आईबाबांचा रॉकीवरचा राग अजूनच वाढला असता. पण आता मात्र तिला डोळ्यातलं पाणी थांबवता येत नव्हतं. रडत रडत ती हाका मारत होती,

''रॉकी.....रॉकी'' आणि तेवढ्यात सोफ्याच्या मागून रॉकीची काळी, तपकिरी पाठ हळुहळू वर येताना दिसली. सावकाश सावकाश रॉकी तिच्याजवळ आला आणि बँडेजमधून दिसणारा तिचा चांगला कान त्यानं चाटायला सुरुवात केली. तोत्तोचाननं त्याच्या गळ्यात हात टाकून त्याच्या कानाचा वास घेतला. आई-बाबा म्हणायचे, की त्याच्या कानांना वास येतो, पण तिला मात्र तो वास मनापासून आवडायचा.

ते दोघे खूप दमले होते.

आकाशातून चंद्र त्या पट्टी बांधलेल्या पोरीकडं आणि तिच्या रॉकीकडं डोळे भरून पाहात होता. रॉकी आता पुन्हा कधीच लांडगा-लांडगा खेळणार

नव्हता परंतु त्यांची दोघांची दोस्ती आता पूर्वीपेक्षाही जास्त गाढ झाली होती.

## क्रीडादिन

'तोमोई' मध्ये दर वर्षी तीन नोव्हेंबरला 'वार्षिक क्रीडादिन' साजरा व्हायचा. हा दिवस मुख्याध्यापकांनी खूप विचार करून निवडला होता. त्यांच्या अनेक वर्षांच्या अनुभवानं त्यांना समजलं होतं, की हा दिवस थंडीमधला असा दिवस होता, की बहुतेक कधीच त्या दिवशी पाऊस पडत नसे. त्यांच्या हवामानाची संपूर्ण माहिती गोळा करण्याच्या छंदाचं हे चांगलं फळ होतं. किंवा कदाचित ढग आणि सूर्य यांनीच असं ठरवलं असेल, की मुलांनी उत्साहानं सजवलेल्या मैदानावर आणि मुख्याध्यापकांच्या इच्छेवर पाऊस पडून 'पाणी फिरवायचं' नाही. काय असेल ते असो. पण 'तोमोई'चा क्रीडादिन पावसानं कधीच वाया गेला नाही.

जसं 'तोमोई' विद्यालय अनेक बाबतीत इतर शाळांपेक्षा वेगळं होतं तसाच हा क्रीडादिनही वेगळा असायचा. इतर शाळांमध्ये असलेले दोनच खेळ 'तोमोई'मध्ये असायचे. ते म्हणजे 'रस्सीखेच' आणि 'तीन पायांची शर्यत.' बाकी सगळे खेळ मुख्याध्यापकांनी स्वतः शोधून काढले होते. या खेळासाठी कोणत्याही विशेष साधनांची आवश्यकता नव्हती.

उदाहरणार्थ 'माशांची शर्यत' : कापडांचे शिवलेले आणि रंगवलेले मुलांच्या सणाच्या दिवशी खांबावर लटकवलेले जाणारे मासे मैदानाच्या मध्यभागी ठेवायचे. इशारा आला, की मुलं पळतपळत त्या माशांपर्यंत पोचायचं आणि त्या कापडी माशाच्या तोंडातून शेपटी पर्यंत जायचं आणि तसंच माशासकट परत पळायचं. एका वेळी तीनच मासे ठेवलेले असायचे. एक निळा आणि दोन लाल. त्यामुळे एका वेळी तिघांनी स्पर्धेत भाग घ्यायचा.

जपानमध्ये दरवर्षी 'पाच मे' या दिवशी 'तांगो नो सेकनु' म्हणजेच 'मुलांचा सण' साजरा केला जातो. या दिवशी घरात जेवढी मुलं असतील त्यांच्या प्रत्येकाच्या नावाचा एक कापडी किंवा कागदी रंगवलेला मासा घराच्या छपरावर लटकवतात. 'कोई' नावाचा हा मासा अतिशय 'ताकदवान' असतो व तो प्रवाहाच्या विरुद्ध दिशेनं पोहून जातो अशी कल्पना आहे. मुलांनी त्याच्यासारखं ताकदवान व्हावं म्हणून अशा प्रकारचे मासे तयार केले जातात.

हा खेळ दिसायला खूप सोपा दिसतो. पण प्रत्यक्षात मात्र अवघड असतो. कारण माशाच्या पोटात गडद अंधार असतो आणि मासे चांगलेच लांब असतात. त्यामुळे दिशा चुकण्याची शक्यता खूपच असायची. तोत्तोचान वगैरे मध्येच तोंड बाहेर काढायचे आणि चूक लक्षात आली, की परत माशाच्या पोटात शिरायचे. मागेपुढे सरकण्याचा प्रयत्न करणारी मुलं पाहायला फारच धमाल यायची. कारण

त्यांच्या त्या हालचालीमुळे ते मासे खरंच जिवंत झालेत की काय, असं वाटायचं.

आणखी एक गमतीचा खेळ म्हणजे 'आईला शोधा.' एक-दोन-तीन म्हटलं, की मुलांनी पळत निघायचं, मध्ये एक शिडी आडवी ठेवलेली असे. तिच्या दोन पायऱ्यांमधल्या मोकळ्या जागेमधून रांगत रांगत पलीकडे जायचं मग तिथे एका टोपलीमधे पाकिटं ठेवलेली असत. त्यातलं एक उघडायचं आणि समजा, आतल्या कागदावर लिहिलं असेल, 'साक्कोचानची आई' तर प्रेक्षकांमध्ये बसलेल्या साक्कोचानच्या आईकडे पळत पळत जायचं. तिचा हात धरायचा आणि परत पूर्वीच्या ठिकाणी यायचं. शिडीमधून जाताना मांजरासारखं अंग चोरून आणि सावधपणे जावं लागायचं. नाही तर हमखास पाय अडकण्याची भीती. शिवाय साक्कोचानची आई एकवेळ माहीत असेल, पण जर कागदावर लिहिलं असेल 'ओकुची ताई' किंवा 'त्सुएची आई' किंवा श्रीमती कुनारींचा मुलगा' - ज्याला मुलांनी कधी बघितलंसुद्धा नसेल, तर मात्र प्रेक्षकांमध्ये जाऊन मोठ्यानं हाक मारायची, 'ओकुची ताईऽऽ' आणि अशी हाक मारायला खूपच धाडस लागायचं. ज्या भाग्यवान मुलांच्या कागदावर त्यांच्याच आईचं नाव असायचं ती खूष होऊन उड्या मारत पळत जायची. 'आई लवकर......आई लवकर' म्हणत आईला घेऊन जायची.

अर्थात हा खेळ खेळताना प्रेक्षकांनासुद्धा खूप सावध राहायला लागायचं. कारण कोणत्या क्षणी त्याचं नाव उच्चारलं जाईल आणि त्यांना जागा सोडावी लागेल सांगता येत नसे. शिवाय जमेल तितकं लवकर सगळ्यांमधून वाट काढत त्यांचा छोटा भिडू जिथं वाट पाहात असेल तिथपर्यंत जावं लागायचं. त्यामुळे सगळे 'बाबा'सुद्धा श्वास रोखून बसलेले असत. इकडच्या तिकडच्या गप्पा मारायला किंवा 'चिवडा' खायला वेळच नसे.

मुख्याध्यापक आणि इतर शिक्षक मुलांबरोबर 'रस्सीखेच'च्या खेळात सामील व्हायचे. दोन्ही संघ जीव खाऊन दोरी खेचायचे. 'जोर लगाके है-होऽऽ' अशा आवेशात त्यांचा खेळ चालायचा. आणि 'यासुकीचान' सारख्या अपंग असणाऱ्या मुलांना काम असायचं, दोरीच्या मध्यभागी बांधलेल्या रुमालाकडे लक्ष ठेवायचं.

शेवटी साखळीशर्यतसुद्धा 'तोमोई'मध्ये वेगळीच असायची. कुणालाच जास्त धावण्याची आवश्यकता नव्हती. 'सभागृहाच्या' गोलाकार पायऱ्यांवरून फक्त खाली पळायचं. दिसायला खूप सोपं पण सभागृहाच्या पायऱ्या उंचीला खूपच कमी होत्या आणि एकापेक्षा जास्त पायऱ्या एका वेळी ओलांडायच्या नाहीत असा नियम होता. त्यामुळे ज्यांचे पाय लांब असतील किंवा उंची खूप असेल त्यांना ते फारच अवघड होतं. रोजच्या सवयीच्या पायऱ्यांना क्रीडादिनाच्या दिवशी वेगळंच रूप यायचं. मुलं आनंदानं ओरडत त्यावरून खालीवर उड्या मारायची. दुरून बघणाऱ्यांना तर एखाद्या शोभादर्शकामधून बघावं तसं वाटायचं.

सभागृहाच्या पायऱ्या सगळ्या मिळून फक्त आठ होत्या.

'तोत्तोचान' आणि तिच्या वर्गमित्रांचा पहिला क्रीडादिन मुख्याध्यापकांच्या अपेक्षेनुसारच खूप मजेत पार पडला. मुलांनी सजवलेल्या कागदी साखळ्या आणि सोनेरी चांदण्यांनी मैदानाला एखाद्या उत्सवाची शोभा आली होती.

तोत्तोचाननं पांढरा ब्लाऊज आणि निळी शॉर्टपँट घातली होती. खरं म्हणजे तिला खेळाडू घालतात तसा 'ट्रॅकसूट' घालण्याची इच्छा होती. एकदा ती शाळा सुटल्यानंतर, मुख्याध्यापक बालवाडीच्या शिक्षिकांना 'युरिथमिक्स' धडे देत होते, तिकडे गेली होती. त्यांनी तसे 'ट्रॅकसूट' घातले होते. त्या पोशाखात 'कवायत' करताना त्यांनी पाय जमिनीवर आपटले की त्यांच्या मांड्या फारच छान हलायच्या. तोत्तोचाननं लगेच घरी जाऊन तिची 'शॉर्टपँट' घातली आणि जमिनीवर पाय आपटले, पण तिच्या छोट्या लुकड्या मांड्या अजिबात हलत नव्हत्या. शेवटी तिनं निष्कर्ष काढला, की तसं न होण्याचं कारण तिनं नवा ट्रॅकसूट घातला नव्हता. तिनं आईला सांगितलं, की क्रीडादिनाच्या दिवशी तिला तस्साच ट्रॅकसूट हवा, पण दुदैवानं लहान मुलांच्या मापात तसा पोशाख मिळाला नाही. आणि मग तिला तिच्या शॉर्टपँटवरच समाधान मानावं लागलं.

क्रीडादिनाच्या दिवशी एक विलक्षण गोष्ट घडली होती आणि ती म्हणजे 'ताकाहाशी' – ज्याचे हात–पाय सर्वात छोटे होते तो – सगळ्या खेळांमध्ये पहिला आला होता. खरोखरच अविश्वसनीय अशी गोष्ट होती. इतर जेव्हा माशाच्या तोंडातून कसेबसे आत शिरत होते, तेव्हा तो शेपटीपर्यंत पोचलेला होता. आणि जेव्हा इतर शिडीमधून पलीकडे जायला धडपडत होते तेव्हा ताकाहाशी शिडी ओलांडून तीन चार यार्ड पुढे पळालेला होता. सभागृहाच्या पायऱ्यांवर एक एक पायरी चढायचा इतरांचा प्रयत्न चालू असताना ताकाहाशी त्यांच्या छोट्या–छोट्या पावलांनी वरपर्यंत जाऊन परत खाली पोचलेला होता. जणु चित्रपटातील चित्रांची गती वाढल्यावर चित्रं जशी भराभर सरकावीत तसंच काहीसं ताकाहाशीच्या पळण्याकडे पाहून वाटायचं.

'ताकाहाशीला एकदातरी हरवायला पाहिजे.' ते सगळे पुटपुटायचे.

त्याला हरवायचंच असं ठरवून मुलांनी खूप प्रयत्न केले, पण ताकाहाशी सगळ्यांना पुरून उरला होता. तोत्तोचाननंही खूप प्रयत्न केले. पण व्यर्थ. जोवर सरळ धावावं लागायचं तोवर ताकाहाशीला हरवणं शक्य होतं पण अवघड आणि कौशल्याच्या ठिकाणी मात्र ताकाहाशीला तोड नव्हती.

ताकाहाशी अतिशय आनंदानं आणि अभिमानानं बक्षिसं घ्यायला जात होता. सगळ्या ठिकाणी पहिला असल्याने तो बक्षिसामागून बक्षिसं घेत होता आणि इतर आसूयेनं त्याच्याकडे बघत होते.

''पुढच्या वर्षी ताकाहाशीला नक्की हरवणार,'' प्रत्येकजण स्वतःशीच

म्हणायचा, पण प्रत्येकच वर्षी ताकाहाशी सर्व खेळात चमकायचा.

'तोमोई'मधली बक्षिसंसुद्धा तऱ्हेवाईक. उदाहरणार्थ, पहिलं बक्षीस म्हणून एखादा मोठ्ठा मुळा, दुसरं बक्षीस दोन गाजरं. तिसरं बक्षीस बीट किंवा असंच. पुरेशी मोठी होईपर्यंत किती तरी वर्ष तोत्तोचानला वाटायचं, की सगळ्याच शाळांमध्ये बक्षीस म्हणून 'भाज्या' दिल्या जातात.

त्याकाळी इतर शाळांमधून वह्या, पेन्सिली बक्षीस दिल्या जायच्या. तोमोईच्या विद्यार्थ्यांना हे माहीत नव्हतं. तरी 'बक्षीस' म्हणून 'भाज्या' घ्यायला त्यांना फारसं आवडायचं नाही. तोत्तोचानला दोन गाजरं आणि काही कांदे मिळाले होते, ते आगगाडीतून घेऊन जायचं तिच्या जिवावर आलं होतं. बऱ्याच गोष्टींसाठी बक्षिसं दिली जायची. त्यामुळे बहुतेक प्रत्येकाजवळ कसली तरी भाजी असायचीच. खरं तर भाजी नेण्यात काय वाईट होतं? बरं, आईनं बाजारातून भाजी आणायला सांगितलं तर कोणालाच काही वाटायचं नाही. पण शाळेतून घरी भाजी न्यायची म्हणजे जरा विचित्रच वाटायचं.

एका गुबगुबीत मुलाला 'कोबी'चा गड्डा मिळाला होता. त्याला बिचाऱ्याला त्या कोबीचं काय करावं हेच समजत नव्हतं.

''हे न्यायचं म्हणजे..., त्यापेक्षा इकडेच टाकून द्यावं' तो म्हणाला.

मुख्याध्यापकांनी या तक्रारी ऐकल्या.

ते मुलांना म्हणाले,

''काय झालं? का नकोत या भाज्या? अरे तुम्ही स्वतःच्या कष्टानं या मिळवल्यात. आईला याची छान भाजी करायला सांगा, बघा कशी मस्त चव लागेल. अरे, तुम्ही तुमच्या घरच्यांसाठीसुद्धा 'जेवण' मिळवलंय.''

त्यांचं बरोबरच होतं. आयुष्यात पहिल्यांदा तोत्तोचाननं तिच्या कुटुंबासाठी जेवण मिळवलं होतं.

''आईला मस्त गाजराची कोशिंबीर करायला सांगेन,'' ती म्हणाली, ''कांद्याचं मात्र काय करायचं ते मात्र मी अजून ठरवलं नाहीये.''

आणि मग इतरांनीही आईला काय करायला सांगायचं त्याचा विचार करायला सुरुवात केली.

''छान! आता तुम्हांला नवीन नवीन गोष्टी सुचतील,'' ते म्हणाले आणि दिलखुलास हसले.

त्या रात्री सगळया मुलांची जेवणाची ताटं भाज्यांनी कशी नटलेली असतील आणि क्रीडादिनाच्या गंमती आठवत त्यांची जेवणं कशी होतील याचा ते विचार करत होते.

अर्थात विशेषकरून ते ताकाहाशीचा विचार करत होते. त्याचं ताट त्या दिवशी पहिल्या बक्षिसांनी गच्च भरलेलं असणार होतं आणि यापुढं स्वतःच्या

शरीराबद्दल कुठलाही न्यूनगंड किंवा कमीपणाची भावना त्याच्या मनात निर्माण होणार नव्हती.

आणि कुणास ठाऊक, कदाचित मुख्याध्यापकांनी सगळे खेळ मुद्दाम 'ताकाहाशी' पहिला येऊ शकेल असेच शोधलेले असावेत.

## कवी इस्सा

मुलांना मुख्याध्यापकांना 'इस्सा कोबायाशी म्हणायला खूप आवडायचं. त्यांनी प्रेमानी एक कविताही केली होती.

इस्सा कोबायाशी
इस्सा आमचा बाप
टक्कल डोक्याशी

मुख्याध्यापकांचही आडनाव कोबायाशी होतं. इसा कोबायाशी हा एकोणिसाव्या शतकातील प्रसिद्ध कवी. 'इसा' चे हायकू मुख्याध्यापकांनाही खूप आवडायचे. इसाच्या कविता ते मुलांना इतक्यावेळा ऐकवायचे की मुलांना 'इसा' पण त्यांचा मित्रच वाटायचा. मुख्याध्यापकांना इसाच्या कविता आवडायच्या कारण त्या खूप वास्तववादी आणि सामान्य जीवनाशी संबंधित असायच्या. हायकू लिहिणाऱ्या हजारो कवींमध्ये इसानं स्वतःचं वेगळं विश्व निर्माण केलं होतं. मुख्याध्यापक मुलांना इसाच्या कविता शिकवीत आणि मुलं ती पाठ करत.

कमजोर बेडका
न ये शरण
इस्सा उभा पाठिशी।

फडफडणाऱ्या चिमण्यांनो
वाट करा मोकळी
वाट यज्ञाच्या घोड्यासाठी।

माशीला सोडा रे
हातपाय फडफडवून
तुमच्या दयेची भीक ती मागतेय।

एकदा त्यांनी स्वतःची हायकूची धून बनविली. मग सगळी मुले ती गात.

– सोसाकु कोबायशी



ये खेळ माझ्यासंगे, इवल्याला अनाथ



चिमणे तूला नाही आई

अभ्यासक्रमाचा भाग नसूनही मुख्याध्यापक हायकूचे तास घ्यायचे. हायकू हा जपानी काव्यप्रकार. तीन ओळीच्या ह्या काव्यप्रकारात पहिल्या ओळीत पाच, दुसऱ्या ओळीत सात आणि तिसऱ्या ओळीत पाच अक्षरे असतात

तोत्तोचानच्या पहिल्या हायकूमध्ये तिच्या आवडत्या चित्रकथांमधील काळ्याकुत्र्याचं वर्णन होतं. तिचं हायकू पारंपारिक 5–7–5 पद्धतीचं नव्हतं. तिच्या हायकूमध्ये 5–7–7 अशी अक्षरं होती. पण म्हणून काय झालं? इसाचाही एक हायकू 5–8–7 असा होता.

कुहोनबुत्सुला फिरायला जाताना किंवा पाऊस पडत असताना जेव्हा मुलं सभागृहात जमत तेव्हा तोमोईचे इसा कोबायाशी मुलांना हायकूबद्दल सांगत. 'इसा' चे काही हायकू तर खास तोमोईसाठीच लिहिले गेले असावेत.

हिम वितळे
क्षणात सारं गाव
मुलांनी फुले

## गूढ

तोत्तोचानला त्या दिवशी पहिल्यांदाच पैसे सापडले होते. ती शाळेतून नेहमीप्रमाणे घरी निघाली होती. जियुगाओका स्टेशनवर ती ओईमाची च्या गाडीत चढली. गाडी पुढच्या मिदोरीगा ओका - स्टेशनवर पोचण्याआधी मध्ये एक मोठ्ठं वळण होतं. त्या वळणावरून वळताना गाडी जोरात कीऽऽ असा आवाज करून किंचित् कलती व्हायची. त्यावेळी तोत्तोचान पाय घट्ट रोवून उभी राहायची, नाहीतर पडण्याची भीती असायची. ती नेहमीच गाडीच्या उजव्या दाराजवळ उभी राहायची. कारण तिच्या स्टेशनचा फलाट त्या बाजूला यायचा.

त्या दिवशी जेव्हा गाडी कलती झाली तेव्हा तोत्तोचानला नाण्यासारखं काहीतरी दिसलं. पूर्वी एकदा तिला असंच एक नाणं दिसलं होतं; पण उचलल्यावर तिच्या लक्षात आलं होतं, की ते 'बटण' होतं. वळण संपून गाडी सरळ झाली तेव्हा तिनं नीट वाकून बघितलं, ते नाणंच होतं. तिला वाटलं, की आजूबाजूच्या कुणाचं तरी पडलेलं असणार. तिनं इकडे तिकडे बघितलं. पण तिच्या आसपास तर कुणीच नव्हतं.

काय करावं? तिला समजेना. एकदम तिला आठवलं- कुणीतरी सांगितलं होतं की, 'रस्त्यात जर कधी पैसे सापडले तर ते पोलिसांना द्यावे.' पण गाडीमध्ये तर पोलीसच नव्हता.

तेवढ्यात आगगाडीतील तिकीट तपासनीस तिच्या डब्यात शिरला. तोत्तोचानलाही समजलं नाही, की तिनं तसं का केलं, पण त्याला बघितल्याबरोबर तिनं त्या पन्नास येन ('येन' हे जपानी चलनाचं नाव) च्या नाण्यावर पाय ठेवला. तिकीट तपासनीसाची तिच्याशी ओळख होती. तो तिच्याकडे बघून हसला. पण तोत्तोचान नेहमीच्या मोकळेपणानं हसू शकली नाही. कारण पायाखालच्या त्या नाण्यानं तिच्या मनात अपराधीपणाची भावना जागी झाली होती.

'ऊडकायामा'ला गाडी थांबल्याबरोबर बरीच माणसं गाडीत शिरली. तोत्तोचानला धक्के बसत होते. पण त्या नाण्यावरून पाय बाजूला करण्याची तिची अजिबात इच्छा नव्हती. ती त्यावर घट्ट पाय ठेवून उभी होती. तिनं मनातल्या मनात एक योजना आखली. गाडीतून उतरल्यावर ती ते नाणं पोलिसांना देणार होती. पण तेवढ्यात तिच्या मनात आलं, एखाद्या मोठ्या माणसानं तिला नाणं उचलताना बघितलं तर त्यांना वाटेल, की ती चोर आहे. त्या काळामध्ये, पन्नास येनमध्ये चॉकलेट किंवा एखादी बर्फ कांडी घेणं सहज शक्य होतं. त्यामुळे मोठ्यांना जरी पन्नास येन म्हणजे फारशी रक्कम नव्हती, तरी लहान मुलांच्या दृष्टीनं ती खूप होती.

''हां, असं करता येईल,'' ती मनात म्हणाली.'' माझे पन्नास येन पडले वाटतं.'' असं मोठ्यानं म्हणायचं. म्हणजे मग सगळ्यांना वाटेल, की ते माझेचेत् !'' पण लगेच तिच्या मनात आलं, इतर कुणी ते नाण पाहून हे माझंच असं म्हणालं, तर काय करायचं?

बराच विचार केल्यावर तिला वाटलं, सगळ्यात छान गोष्ट म्हणजे बुटाची नाडी घट्ट करण्याच्या निमित्तानं खाली वाकायचं आणि पटकन् नाणं उचलून घ्यायचं. जमलं! ती फलाटावर उतरली तेव्हा घामानं चिंब भिजली होती. आणि पन्नास येनचं ते नाणं तिनं हातात घट्ट धरलं होतं. पोलीसचौकी बरीच दूर होती आणि तिथपर्यंत जाऊन नाणं पोचतं करायचं तर बराच वेळ गेला असता आणि आईनं काळजी केली असती. म्हणून तिनं ठरवलं, 'मी हे कुठंतरी लपवून ठेवावं

आणि उद्या शाळेत सगळ्यांना दाखवावं, कारण त्यांना थोडंच असं नाणं कुठे सापडलं असेल कधी?'

पण कुठं लपवावं ते तिला समजेना. कारण घरी नेलं तर, आईला कदाचित ते समजेल, मग?......

ती स्टेशनजवळच्या दाट झुडुपात शिरली. तिनं जमिनीत एक छोटासा खड्डा खणला. त्यात ते मौल्यवान नाणं ठेवलं आणि वर एक थोडासा वेगळ्या आकाराचा दगड ठेवून दिला. तिच्या दृष्टीनं ती फारच सुरक्षित जागा होती. नंतर मात्र ती वेगानं घराकडे पळत सुटली.

बहुतेक रात्री तोत्तोचान, आईनं ''चल, झोप आता'' असं म्हणेपर्यंत शाळेविषयी बोलत असायची. पण त्या दिवशी मात्र ती फारसं न बोलता झोपून गेली.

दुसऱ्या दिवशी तो नेहमीपेक्षा जरा लवकरच घरातून निघाली. तिच्या गुप्त खजिन्याच्या आठवणीनं ती उत्साहित झाली होती. स्टेशनजवळ पोचल्याबरोबर ती धावतच त्या झुडुपात शिरली.

तिनं ठेवलेला दगड अजूनही तसाच होता.

''तुला एक गम्मत दाखवू?''

तिनं मागोमाग आलेल्या रॉकीला विचारलं. काळजीपूर्वक दगड बाजूला ठेवून तिनं खणायला सुरुवात केली. पण आश्चर्य म्हणजे ते पन्नास येनचं नाणं लपवताना कुणी बघितलं तर नसेल ना? का तो दगड जागेवरून हलला होता? ते नाणं कुठंच सापडत नव्हतं. तिच्या 'तोमोई'तल्या मित्रांना ते नाणं दाखवता येणार नाही म्हणून ती फारच उदास झाली होती. पण त्याहीपेक्षा जास्त तिला ते नाहीसं होण्याचं गूढ वाटत होतं.

त्यानंतर जेव्हा जेव्हा ती झुडूपाच्या बाजूला जायची तेव्हा ते नाणं शोधायचा प्रयत्न करायची. पण तिला ते कधीच दिसलं नाही.

ते कुणीतरी नेलं असेल का? किंवा कदाचित् ते लपवताना मला देवानं बघितलं असेल. असे विचार तिच्या मनात यायचे. किंवा कधी वाटायचं ते स्वप्नच असेल. जेवढा विचार करायची तेवढं त्या गोष्टीचं तिला अधिक गूढ वाटायचं आणि ते ती कधीच विसरू शकली नाही.

## हातांची भाषा

एक दिवस दुपारी, जियुगाओकाच्या तिकिटाच्या खिडकीपाशी दोन मुलं आणि एक मुलगी एकत्र उभे होते. ते तिघंही वयानं साधारण तोत्तोचान एवढेच किंवा थोडेसे मोठे असतील. ते हातांनी काहीतरी खुणा करत होते. तो प्रकार खूप गम्मतीदार

दिसत होता. ती थोडी त्यांच्याजवळ गेली आणि तिनं निरखून पाहिलं, तेव्हा तिला जाणवलं, की ते एकही अक्षर न उच्चारता एकमेकांशी बोलत होते. एकजण हातांनी तऱ्हेतऱ्हेच्या खुणा करायचा, मग दुसरा लगेच काहीतरी खुणा करून काहीतरी सांगायचा. मग ती मुलगी तशाच खुणा करायची आणि ते तिघेही हसायला लागायचे. फारसा आवाज न होता सुद्धा त्यांचं हसणं, त्यांची प्रसन्नता जाणवत होती. बराच वेळ त्यांचं निरीक्षण केल्यावर तोत्तोचाननं निष्कर्ष काढला, की ते 'हातांनी बोलत होते.'

''मलाही हातांनी बोलता आलं तर?'' तिनं हेवा वाटून त्यांच्याकडे बघितलं. तिला वाटलं त्यांच्यात जावं आणि गप्पा माराव्या. पण हातांच्या भाषेनं त्यांना विचारायचं कसं? येत नव्हती आणि दुसरं म्हणजे ती मुलं तिच्या शाळेतली नव्हती. उगाच त्यांना तिचं मध्येच जाणं नाही आवडलं तर?

''कधी नं कधी मी हातांनी बोलायला शिकणार!'' तिनं निश्चय केला.

पण तोत्तोचानला अजून मूक-बधीर मुलांबद्दल माहीत नव्हतं आणि हेही माहीत नव्हतं, की स्टेशनवर हातांनी बोलणारी ती मुलं 'मूकबधिरां'साठी असलेल्या सरकारी शाळेतली होती.

तिला फक्त एवढंच माहीत होतं, की चमकदार डोळयांनी एकमेकांच्या बोटांकडे पाहाणाऱ्या त्या मुलांमध्ये काही तरी विशेष आहे आणि त्यांची ती भाषाही फार सुंदर आहे.

तिला त्यांच्याशी मैत्री करायची होती.

## सत्तेचाळीस रॉनिन

कोबायाशींची शिक्षणपद्धती एकमेवाद्वितीय होती हे जरी खरं असलं, तरी त्यांच्या विचारांवर 'युरोपीय' आणि इतर परदेशी विचारांचाही खूप प्रभाव होता. उदाहरणंच द्यायची, तर त्यांच्या शाळेतील जेवणाची पद्धत, फिरायला जाण्याची कल्पना, किंवा जेवताना म्हणायच्या गाण्याची 'रो-रो-रो युवर बोट' या इंग्रजी गाण्यावरून घेतलेली चाल, अशी कितीतरी देता येतील.

मुख्यध्यापकांचा उजवा हात सर्वसाधारण शाळांमध्ये उपमुख्याध्यापकांसच म्हणतात. ते होते, 'श्री मारुयामा.' कितीतरी बाबींमध्ये ते मुख्याध्यापकांपेक्षा अगदी वेगळे होते. 'मारुयामा' याचा अर्थ 'गोल टेकडी.' त्यांच्या नावाप्रमाणेच त्यांचं डोकं अगदी गोल आणि तुळतुळीत होतं. कानांच्याजवळ मात्र थोडेसे पांढरे केस होते. ते गोल चष्मा घालायचे आणि कोबायाशींपेक्षा त्यांचे गालही छान लाल होते. ते मुख्याध्यापकांपेक्षाही नुसते दिसायलाच वेगळे होते असं नाही. तर ते त्यांच्या धीरगंभीर आणि भावपूर्ण आवाजात पारंपारिक चिनी कविताही म्हणायचे.

चौदा डिसेंबरच्या सकाळी जेव्हा सगळे सभागृहात जमले, तेव्हा त्यांनी सांगितलं–

''पन्नास वर्षांपूर्वी आजच्या दिवशी सत्तेचाळीस रोनिनांनी (सामुराई योध्द्यांनी) शत्रूंविरुद्ध इतिहासप्रसिद्ध सूड उगवला होता. सेनगाकुजीच्या देवळात जाऊन आपण आज त्यांच्या समाधीला वंदन करू या. तुमच्या पालकांना या कार्यक्रमाची सूचना आधीच दिली आहे.''

मुख्याध्यापकांनी विरोध केला नाही. त्यांच्या मनात काय होतं कुणास ठाऊक; पण ज्याअर्थी त्यांनी विरोध केला नाही त्याअर्थी त्यांची संमती असणार.

निघण्यापूर्वी मारुयामांनी मुलांना ती सत्तेचाळीस योद्ध्यांची प्रसिद्ध गोष्ट सांगितली. त्या शूर आणि स्वामिनिष्ठ सैनिकांनी त्यांच्या मृतनेत्यांच्या 'आसानो'च्या खुनाचा बदला घेण्यासाठी जवळजवळ दोन वर्ष तयारी केली होती. या सत्तेचाळीस सैनिकांबरोबरच एक व्यापारी होता. 'राईहाई आमानोया.' त्यानंच सारी शस्त्रं पुरविली होती. आणि 'शोगुन' च्या सरदारांनी जेव्हा त्याला पकडलं, तेव्हा या धाडसी व्यापाऱ्यानं एकही शब्द उच्चारायला साफ नकार दिला.

मुलांना गोष्टीतलं काही फारसं समजलं नाही. पण एक दिवस अभ्यासाला सुट्टी आणि कुहोनबुत्सुच्या देवळापेक्षाही लांब फिरायला जायचं. सहलीला गेल्यासारखं एकत्र जेवायचं ही कल्पनाच त्यांना खूश करायला पुरेशी होती.

मुख्याध्यापक आणि इतर शिक्षकांचा निरोप घेऊन सर्व पन्नास मुलं मारुयामांबरोबर निघाली. मुलं आपापसात नुकत्याच ऐकलेल्या गोष्टीबद्दल बोलत होती. पकडलं गेल्यावर 'राईहाई आमानोया' कसा बोलला असेल याची कल्पना करत होती. 'मी राईहाई आमानोया, तुम्हाला काहीही सांगणार नाही.' तो म्हणाला असेल.

'सेनगाकुजी' सात किलोमीटर दूर होतं. पण रस्त्यात फारशी वाहनं नव्हती. डिसेंबर महिना असल्यानं आकाश निरभ्र होतं आणि 'मी राईहाई आमानोया......' असं म्हणत जाताना रस्ता काही फार लांब वाटत नव्हता.

सेनगाकुजीला पोचल्यावर मारुयामांनी प्रत्येकाला एक उदबत्ती आणि काही फुलं दिली. देऊळ 'कुहोनबुत्सु'च्या देवळापेक्षा लहान होतं, पण तिथं ओळीनं बऱ्याच समाध्या होत्या. ही जागा पवित्र आहे ह्या विचारानं आणि सत्तेचाळीस रोनिनांच्या स्मृतीनं तोत्तोचान भारावून गेली होती.

समाधीवर उदबत्ती लावून आणि फुलं वाहून तिनं मारुयामांसारखाच नमस्कार केला. सगळं वातावरण विलक्षण भारावलेलं आणि निःशब्द होतं. इतकी शांतता 'तोमोई'च्या मुलांच्या सवयीची नव्हती. प्रत्येक समाधीपुढे लावलेल्या उदबत्तीमधून धुराची वलयं निर्माण होत होती.

त्यानंतर प्रत्येक वेळी उदबत्तीचा वास आला, की मुलांना मारुयामांची

आणि 'राईहाई आमानोयां'ची आठवण यायची. आणि शिवाय तो सुगंध त्यांना 'शांततेचा सुगंध' वाटायचा.

मुलांना सत्तेचाळीस सैनिकांबद्दल फारशी माहीत नसेलही; पण मारुयामा ज्या भक्तिभावानं त्यांच्याबद्दल बोलत होते, त्यामुळे मुलांना मारुयामा बद्दल कोबायाशी इतकाच पण वेगळ्या प्रकारचा आदर वाटायला लागला होता.

तोत्तोचानला त्यांचे, त्यांच्या स्थूल शरीराशी विसंगत असलेले, जाड चष्म्यामागून बघणारे छोटे छोटे डोळे खूप आवडायचे.



## ''मासाओचान''

तोत्तोचानच्या स्टेशनला जाण्या-येण्याच्या रस्त्यावर एक कोरियन लोकांची वस्ती होती. हे निर्वासित कोरियन तंबूमध्ये रहायचे. अर्थातच ते कोरियन आहेत हे तिला माहीत नव्हतं. तिला फक्त एकच गोष्ट माहिती होती, त्या वस्तीमध्ये एक बाई होती. ती मधोमध भांग पाडायची आणि मानेवर सैलसर अंबाडा घालायची. थोडीशी स्थूल असलेली ही बाई पायात रबरी बूट घालायची. तिचे ते बूट पुढच्या बाजूला टोकदार झालेले, बोटीच्या आकाराचे होते. लांब स्कर्ट आणि छोटासा ब्लाऊज असा तिचा वेष असायचा. सगळ्यात महत्त्वाची गोष्ट म्हणजे ती सतत तिच्या मुलाला हाका मारत इकडे-तिकडे फिरताना दिसायची.

''मासाओचानऽऽ मासाओचानऽऽ''

तिची ती उंच पट्टीतली आर्त हाक ऐकून तोत्तोचानला खूप उदास वाटायचं.

त्यांची ती वस्ती ओइमाची च्या रुळांना लागूनच असलेल्या रस्त्यावर होती.

तोत्तोचानला 'मासाओ-चान' चांगलाच माहीत होता. तो तिच्यापेक्षा थोडा मोठा होता आणि बहुतेक दुसरीत शिकत असावा. अर्थात तो कुठल्या शाळेत होता हे तिला ठाऊक नव्हतं? त्याचे केस खूप विस्कटलेले असायचे आणि बरोबर एक कुत्रं असायचं.

एक दिवस तोत्तोचान घरी निघाली होती. तेव्हा तो त्यांच्या वस्तीजवळ, कमरेवर हात ठेवून एखाद्या गुंडासारखा उभा होता.

''कोरियन!''

तो तोत्तोचानच्या अंगावर जोरात ओरडला. त्याच्या आवाजात भयानक तिरस्कार होता. तोत्तोचान तर घाबरूनच गेली. तिनं तर त्याचं काहीच वाकडं केलं नव्हतं. इतकंच काय, पण ती त्याच्याशी कधी एक अक्षरही बोलली नव्हती. त्यामुळं त्याचं ते ओरडणं ऐकून तिला धक्काच बसला.

घरी गेल्यावर तिनं आईला सगळं सांगितलं.

''आई, मासाओ-चान मला कोरियन म्हणाला.''

आईनं पटकन तिच्या तोंडावर हात ठेवला. तोत्तोचाननं आईकडं बघितलं. आईच्या डोळ्यात पाणी आलं होतं. तोत्तोचानला जाणवलं, हे काहीतरी खूपच वाईट असलं पाहिजे. आई आपले डोळे पुसतच राहिली. नाहीत, तिचं नाकही लाल-लाल झालं होतं.

''बिच्चारा!'' ती म्हणाली.

''लोक त्याला इतक्यांदा कोरियन-कोरियन म्हणत असणार की त्याला आहे. म्हणून चिडून तो असं म्हटला असणार. किती दुष्ट असतात लोक!''

डोळे पुसतपुसत आईनं तोत्तोचानला जवळ घेतलं आणि समजावणीच्या सुरात ती म्हणाली, ''तू जपानी आहेस आणि मासाओ-चान कोरिया नावाच्या देशामधून आलाय. पण जशी तू तसाच तोही छोटाच. राणी, एक लक्षात ठेव. माणसामाणसात कधीच फरक करू नये. असं कधीच मनात आणू नकोस, की हा माणूस जपानी किंवा तो कोरियन. सगळ्यांशीच चांगलं वागावं. केवळ कोरियन आहेत म्हणून ती माणसं वाईट आहेत असं समजणं चांगलं नाही.''

हे सगळं समजणं तोत्तोचानच्या वयाला तरी फार अवघड होतं. पण तिला एक गोष्ट नक्की समजली होती. 'मासोचान' तिच्यासारखाच छोटासा आणि चांगला मुलगा होता. पण लोक मात्र निष्कारण त्याच्याशी वाईट वागायचे. म्हणूनच त्याची आई सारखी त्याला शोधत असायची. कारण तिला त्याची काळजी वाटत असणार.

दुसऱ्या दिवशी त्यांच्या तंबूजवळून जाताना तिला त्याच्या आईची हाक ऐकू आली. तेव्हा तिनं ठरवलं की, तो दिसला आणि तो 'कोरियन' म्हणून ओरडला तरी त्याला म्हणायचं,

''अरे, आपण सगळे लहान आहोत! आपण सगळे सारखेच आहोत!'' आणि त्याच्याशी मैत्री करून घ्यायची.

मासाओ-चानच्या आईच्या आवाजात एक विशिष्ट कंप असायचा. खूप त्रासलेला आणि काळजीनं भरलेला वाटायचा तो आवाज. हाका मारून संपल्यावरसुद्धा कितीतरी वेळ तो आवाज हवेत घुमायचा आणि आगगाडी आली, की कधीतरी तिच्या आवाजात विरून जायचा.

'मासाओ-चानऽऽऽ!' एकदा जरी ती काळजीनं भरलेली करुण हाक ऐकली तरी ती विसरणं कधीच शक्य नसे.

## वेण्या

त्या वेळपर्यंत तोत्तोचानच्या दोन महत्त्वाकांक्षा होत्या. एक म्हणजे ॲथलेटिक्स्च्या खेळाडूंसारखी पँट घालायची. आणि दुसरी म्हणजे वेण्या घालायची. गाडीत दिसणाऱ्या वरच्या वर्गातल्या मुलींचे लांब-लांब शेपटे पाहून तिनं ठरवलं होतं, की आपणही अशाच वेण्या घालायच्या. तिच्या वर्गातल्या इतर मुलींचे केस छोटे होते आणि त्या नुसताच भांग पाडायच्या. पण तोत्तोचानचे केस थोडे लांब होते. ती दोन भाग करून रिबीनी बांधत असे. आईला तसंच आवडायचं आणि तोत्तोचानलाही केस अजून थोडे लांब व्हायला हवे होते. कारण तिला वेण्या घालायच्या होत्या.

शेवटी एक दिवस तिनं हट्टानं आईकडून दोन वेण्या घालून घेतल्या. त्यांना रबर लावली आणि वर रिबिनीचं छोटसं फूल. तिला कसं मोठं झाल्यासारखं

वाटत होतं. तिनं आरशात पाहिलं तेव्हा तिला जाणवलं, की इतर मुलींपेक्षा तिच्या वेण्या अगदीच बारीक दिसत होत्या आणि वेणीची शेपटे वाटण्यापेक्षा शेपट्या वाटत होत्या. पण ती धावतच रॉकीकडे गेली आणि दोन्ही वेण्या त्याच्यासमोर तिनं अभिमानानं धरल्या. रॉकीनं डोळे मिचकावून तिच्याकडे बघितलं.

''ए, तुला पण वेण्या घालता आल्या असत्या तर काय मज्जा आली असती नं?'' ती म्हणाली.

गाडीत चढल्यावर ती प्रयत्नपूर्वक डोकं स्थिर ठेवत होती. नाही तर वेण्या सुटल्या असत्या नं. गाडीत कुणीतरी पाहिलं आणि म्हटलं, ''काय छान वेण्या घातल्यात.'' तर किती मजा येईल असं तिला वाटत होतं. पण कुणीच तसं म्हटलं नाही.

पण शाळेत मात्र तिच्या वर्गातल्या मियोचान, साक्कोचान आणि काइकोआओकी म्हणाल्या. ''अय्या! काय मस्त शेपट्या आल्यात!''

तिला खूपच आनंद झाला.

मुलांना मात्र काही विशेष वाटलं नव्हतं. पण डबा खाण्याच्या सुट्टीनंतर अचानकच तिच्या वर्गातला 'ओई' म्हणाला, ''अरेच्या, तोत्तोचाननं आज केसांचं काहीतरी वेगळंच केलेलं दिसतंय.''

वा! मुलांच्याही लक्षात आलं. तोत्तोचान जास्तच खूष झाली.

''त्याला वेण्या म्हणतात!'' तिनं गर्वानं सांगितलं.

ते ऐकून तो जवळ आला. म्हणाला, ''बघू बघू, अरे वा! जरा एक झोका घेऊन बघतो.'' आणि बघता बघता त्यानं तोत्तोचानच्या वेण्यांना लोंबकळायला सुरुवात केली.

''वा वा! अगदी आगगाडीतले हात धरायचे पट्टे असतात तसं वाटतं!'' तो म्हणाला.

पण एवढ्यानंही संपलं नाही. 'ओई' तोत्तोचानपेक्षा दुप्पट जाड होता. तिच्या वेण्यांना तो आगगाडीतले पट्टे म्हणाला याचं वाईट तिला वाटत होतंच, पण त्यानं चक्क रस्सीखेच खेळताना दोरी खेचतात तशा तिच्या वेण्या 'जोर लगाके है हो......' म्हणत खेचायला सुरुवात केली तेव्हा मात्र ती रडायला लागली.

तोत्तोचानच्या दृष्टीनं वेण्या म्हणजे मोठ्या मुलीचं प्रतीक होतं. तिला वाटलं होतं, की वेण्यांमुळे सगळे तिच्याशी आदरानं बोलतील, रडत रडतच ती मुख्याध्यापकांच्या खोलीकडे गेली. तिचा आवाज ऐकून ते बाहेर आले.

खाली वाकून त्यांनी विचारलं, ''काय झालं?''

वेण्या नीट आहेत याची खात्री करून घेत ती म्हणाली, ''ओईनं माझ्या वेण्या ओढल्या आणि 'जोर लगाके है हो! असं म्हणाला.''

मुख्याध्यापकांनी तिच्या वेण्यांकडे बघितलं. चेहरा रडका दिसत असला

तरी वेण्या मात्र हसत होत्या. ते खाली बसले, तिला जवळ बसवून घेतलं आणि दात पडलेले असूनही छानसं हसून म्हणाले, ''वेडे रडतेस कशाला, तुझ्या वेण्या कित्ती छान दिसताहेत बघ तरी!''

''तुम्हाला आवडल्या?'' त्यांच्याकडे बघत तिनं विचारलं.

''फारच! ते म्हणाले.

तोत्तोचानचं रडणं एकदम थांबलं. ती उठली.

''आता ओईनं काहीही केलं, तरी मी रडणार नाही.'' ती म्हणाली.

मुख्याध्यापक पुन्हा एकदा हसले. तोत्तोचानच्याही चेहेऱ्यावर हसू फुललं. आता तिचा चेहरा आणि वेण्या सारख्याच हसऱ्या दिसत होत्या. ती वर्गात परत आली.

खेळता-खेळता ती जवळजवळ सगळं विसरलीच होती. तेवढ्यात ओई आला. डोकं खाजवत, मान खाली घालून म्हणाला, ''चुकलं माझं, मला मुख्याध्यापक रागावले. ते म्हणाले, की 'मुलींशी चांगलं वागावं, त्यांची काळजी घ्यावी!''

तोत्तोचानला आश्चर्य वाटलं. कारण मुलींशी चांगलं वागावं असं आजवर तिच्या ऐकिवात नव्हतं. मुलांना नेहमीच मुलीपेक्षा जास्त महत्त्व दिलं जायचं. ज्यांच्या घरात मुलं आणि मुली असायच्या तिथं जेवतानासुद्धा मुलांना आधी वाढलं जायचं. आणि मुली काही बोलल्या, तर घरातली माणसं म्हणायची, ''लहान मुलींनी छान दिसावं, बोलू नये.''

आणि असं असताना मुख्याध्यापक म्हणत होते, की मुलींशी चांगलं वागावं. हे काहीतरी विचित्रच होतं. मग तिला वाटलं 'किती छान! आपल्याशी मुलं चांगली वागणार.'

ओईला तर धक्काच बसला. कारण मुलींशी चांगलं आणि आदरानं वागायला कुणीच सांगितलं नव्हतं. आणि मुख्य म्हणजे मुख्याध्यापकांकडून रागावून घेण्याची ती पहिली आणि शेवटची वेळ होती. तो दिवस ओई कधीच विसरला नाही.

## ''धन्यवाद''

नवीन वर्षाच्या सुट्ट्या जवळ येत होत्या. उन्हाळ्याच्या सुट्टीसारखी या वेळी मुलं शाळेत एकत्र आली नाहीत. त्यांनी त्यांचा पूर्ण वेळ आपल्या कुटुंबियांसोबत घालविला.

''मी नवीन वर्षाची सुट्टी आपल्या आजोबांसह क्यूशूला घालवणार आहे, मिगिता सगळ्यांना सांगत होता आणि ताईचान, ज्याला विज्ञानाचे प्रयोग आवडत होते तो म्हणायचा, ''मी आपल्या मोठ्या भावासोबत भौतिकशास्त्राची प्रयोगशाळा

बघायला जाईन.'' आणि चालता चालता 'पुन्हा भेटू, असा निरोप देत असताना देखील मुले एक दुसऱ्याला आपले बेत सांगत होते.

तोतोचान आपल्या आईवडिलांबरोबर स्कीइंगसाठी गेली. वडिलांच्याच वाद्यवृंदातील दिग्दर्शक व सैलो वाजविणाऱ्या मित्राचं, हाइदो साइतोचे, शीधाच्या डोंगरावर एक छानसं घर होतं. ते प्रत्येक हिवाळा त्याच्यासोबत त्याच ठिकाणी घालवत. तोत्तोचान खूप छोटी असल्यापासूनच स्कींइग शिकत होती.

स्टेशनपासून स्कींइंग करायच्या जागेपर्यंत घोड्यानी खेचलेल्या स्लेज गाडीवर बसून जावं लागत होतं. तेथे चोहोबाजूनी पसरलेलं शुभ्र बर्फ असायचं आणि सारे डोंगर, दऱ्या बर्फानं आच्छादलेल्या असत. मध्येच कुठे कुठे सुक्या लाकडाची खुंटं दिसायची इतकंच. ज्या लोकांना रहाण्यासाठी साईतोसारखं घर नव्हतं त्यांच्यासाठी तेथे एक जपानी सराय बनवले होते. एक पश्चिमात्य प्रकारचं हॉटेल सुद्धा तिथं होतं. खूप विदेशी लोक तेथे यायचे.

पण हे वर्ष तोतोचानसाठी काही वेगळं असंच वर्ष होतं. आता ती प्राथमिक शाळेच्या पहिल्या इयत्तेत शिकत होती आणि इथं ती थोडीफार इंग्रजी देखील शिकली होती. वडिलांनी तर तिला 'धन्यवाद' म्हणायला शिकवलं होतं.

प्रत्येक विदेशी माणूस जो तोतोचानला स्कीच्या पोशाखात पाही, जरुर काहीतरी म्हणे. बहुधा ते सांगत असतील, 'किती गोड मुलगी आहे' किंवा अशीच दुसरी काहीतरी स्तुती. तोतोचानला हे सारं काही कळत नव्हतं आणि त्यांना काय उत्तर द्यावं तेही तिला माहीत नव्हतं. पण आता ती त्यांना आपलं डोकं हलवून उत्तर देई, ''धन्यवाद.''

ह्यावर ती विदेशी माणसे तिला हसत. आपसांत अजून काही बोलत. कधी कधी एखादी स्त्री खाली वाकून तिच्या गालावर आपले गाल घासायची. किंवा एखादा पुरुष खांद्याला पकडून तिला जवळ घ्यायचा. तोत्तोचानला मग खूप बरं वाटायचं. केवळ 'धन्यवाद' शब्द उच्चारल्यानतंर किती लोकांशी मैत्री होऊ शकते याचं तिला राहून राहून आश्चर्य वाटत असे.

एक दिवस एक तरुण समोर आला. त्याने खुणेने काही विचारलं की, 'तुला माझ्या स्कीच्या पुढे बसून घसरायला आवडेल का?' असंच तो काहीतरी विचारू पाहतोय असं तोत्तोचानला वाटलं. वडिलाना तिनं तसं सुचवताच त्यांनी तिला तात्काळ होकार दिला.

तोत्तोचानने उत्तरादाखल 'धन्यवाद' म्हटले. तेव्हा त्या तरुणाने आपले दोन्ही पाय आखडून घेतले आणि तोत्तोचानला स्कीच्या पुढे उक्कड बसवलं. नंतर ते सगळ्यात लांब व सोप्या उतारावरुन खाली घसरू लागले. असं वाटत होतं ते वाऱ्याहून वेगात जात होते. वेगामुळे कानातून शिळा ऐकू येऊ लागल्या. आपण पुढे ढकलली जाऊ नये, म्हणून तोत्तोचानने दोन्ही हाताने आपले गुडघे जोरात

जखडून टेवले होते. तिला भीतीही खूप वाटत होती आणि मजाही खूप येत होती. शेवटी ते खाली आल्यावर थांबले तसं जवळ उभ्या असलेल्या लोकांनी टाळया वाजविल्या. स्कीवरुन उतरून तोत्तोचानने खाली वाकून अभिवादन स्वीकारलं आणि त्यांना 'धन्यवाद' देखील दिले. त्यावर सगळ्यांनी अजून जोरात टाळ्या वाजविल्या.

त्या तरुणाचं नाव स्नाइडर होतं हे तर तोत्तोचानला खूप उशिरा कळलं. तो विश्वविद्यालयाचा प्रसिद्ध स्कीअर होता आणि नेहमी चांदीच्या बनविलेल्या स्की काठ्या वापरायचा. त्या दिवशी तिला सर्वात आवडलेली गोष्ट दुसरीच होती. जेव्हा ते उतार उतरुन खाली आले आणि लोक त्यांचं टाळ्यांनी स्वागत करत होते तेव्हा तो वाकून तिच्याजवळ बसला. त्याने तोत्तोचानचा हात आपल्या हातात घेऊन तिला 'धन्यवाद' सांगितलं. जणू काही तोत्तोचान कोणी खास व्यक्ती आहे असंच ते दृष्य होतं. त्याने तोत्तोचानला छोटी मुलगी मानलं नव्हतं. त्याचं वागणं असं होतं जणू तोत्तोचान कोणी प्रौढ स्त्री आहे. जेव्हा तो खाली वाकला होता तेव्हाच तोत्तोचानला त्याची आदबशीर सभ्यता जाणवली होती. त्याक्षणी त्यांच्या मागे दूरवर कुठंही न संपणारे बर्फाचे दऱ्या डोंगर पसरलेले होते.

## ग्रंथालयाचा डबा

मुलं दिवाळी सुट्टीनंतर परत आली तेव्हा त्यांना नवाच शोध लागला आणि त्या शोधाचं स्वागतही त्यांनी मोठ्या उत्साहानं केलं.

वर्गाच्या डब्यांच्या रांगेसमोर नवा डबा उभा होता. मुलांच्या गैरहजेरीमध्ये तो डबा म्हणजे ग्रंथालय झालं होतं. शाळेचा रखवालदार रेयोचान, मुलांना त्याच्याविषयी खूपच प्रेम होतं. त्यानं सुट्टीत खूप मेहनत करून नव्या ग्रंथालयात अनेक कपाटं व्यवस्थित मांडली होती आणि ती कपाटं अनेक तऱ्हेच्या रंगीबेरंगी पुस्तकांनी भरली होती. ग्रंथालयात टेबल खुर्च्याही मांडल्या होत्या. तिथं बसून कोणतंही पुस्तक वाचण्याची परवानगी होती.

''हे तुमचं ग्रंथालय,'' मुख्याध्यापक म्हणाले, ''कोणतंही पुस्तक कोणीही वाचलं तरी चालेल. हे पुस्तक मला मिळेल की नाही वगैरे भीती बाळगण्याचं काहीच कारण नाही. तुम्हाला हवं तेव्हा इथं येऊन तुम्ही पुस्तक वाचू शकाल आणि हवं तर घरीही नेऊ शकाल. पुस्तक पूर्ण वाचून झालं, की परत आणून द्या आणि जर तुमच्या घरी कुठली पुस्तकं असतील जी इतरांनीपण वाचावी असं तुम्हाला वाटत असेल तर ती तुम्ही इथं आणून देऊ शकाल. पण जितकं जास्त जमेल तितकं वाचा.''

''आज आपण पहिला तास ग्रंथालयाचा तास करू या.'' मुलं एका सुरात

ओरडली.

''तुमची तशी इच्छा असेल तर काहीच हरकत नाही,'' मुख्याध्यापक हसत म्हणाले.

तोमोई मधले सगळे पन्नासच्या पन्नास विद्यार्थी ग्रंथालयात शिरले. त्यांनी हवी ती पुस्तकं घेऊन वाचायला सुरुवात केली. अर्थात फक्त निम्म्याच मुलांना बसायला जागा होती. आता मात्र तो डबा खरोखरच गर्दी झालेल्या आगगाडीच्या डब्यासारखा दिसत होता. ज्याला जिथं जागा मिळेल तिथं तो बसला होता. आणि ज्यांना जागा नव्हती ते उभं राहून वाचत होते. ते दृश्य एकंदर गंमतशीर दिसत होतं.

मुलांचा आनंद तर गगनात मावत नव्हता. तोत्तोचानला अजून खूप छान वाचता येत नव्हतं म्हणून तिनं एक चित्रांचं पुस्तक निवडलं. प्रत्येकाजवळ पुस्तक आल्यावर काही क्षण डबा शांत झाला, पण काही क्षणच. तऱ्हेतऱ्हेच्या आवाजांनी डबा काही वेळातच भरून गेला. काहीजण मोठ्यानं वाचत होते. काही, न समजलेल्या शब्दांचे अर्थ इतरांना विचारत होते. मुलांच्या हसण्यानं ग्रंथालय भरून गेलं होतं.

एक मुलगा 'गाणारी चित्रं' नावाचं पुस्तक पाहात होता आणि त्यातली गाणी वाचत एक चित्र काढत होता.

एक गोल ऐक टिंब, एक गोल एक टिंब
दोन रेषा आडव्या त्यावर दोन उभ्या.
अजून एक गोल आणि एक टिंब
तीन केस, तीन केस, तीन केस अरे वॉ!
चुटकीसरशी झाली की जाडी बाई, का हो?॥

अरे वा! या शब्दापाशी तोंडाचा गोल पूर्ण करायचा होता. आणि चुटकीसरशी झाली, की जाडी बाई, का हो? म्हणताना तीन अर्धगोल पूर्ण करायचे होते.



सगळ्या रेषा बरोबर आल्या तर जाड जपानी बाईचा जुन्या पद्धतीची केशरचना केलेला चेहरा तयार होत असे.

तोमोईमध्ये प्रत्येकाला हवा त्या पद्धतीनं अभ्यास करायची मुभा होती. पण त्यामुळेच इतरांनी काहीही केलं तरी आपली एकाग्रता न ढळू देण्याचं शिक्षण त्याना दिलं गेलं होतं. म्हणून तो मुलगा गात असूनही सगळे आपापली पुस्तक वाचत होते.

सकाळच्या उन्हात आनंदानं पुस्तक वाचणाऱ्या मुलांना पाहून मुख्याध्यापकांच्या चेहेऱ्यावर खूप समाधान होतं.

मुलांनी तो आख्खा दिवस ग्रंथालयात घालवला.

अनेकदा जेव्हा पावसामुळं मुलं मैदानात खेळू शकत नसत तेव्हा ग्रंथालय ही त्यांची आवडती जागा होऊन बसली.

''मला वाटतं ग्रंथालयाजवळ एक स्वच्छतागृह बांधून घ्यावं,'' मुख्याध्यापक म्हणाले.

कारण मुलं पुस्तकामध्ये इतकी गढून जायची, की शेवटच्या क्षणापर्यंत ती पुस्तकच वाचत राहायची आणि अगदी घाई लागली की एकमेकांना धक्के मारत धावत सुटायची.

## शेपूट

एक दिवस दुपारी शाळा सुटल्यावर तोत्तोचान घरी जाण्याची तयारी करत होती, तेवढ्यात ओई धावत-धावत आला आणि अगदी हलक्या आवाजात म्हणाला, ''मुख्याध्यापक कुणावर तरी जाम चिडलेत.''

''कुठे?'' तिनं विचारलं.

मुख्याध्यापक चिडल्याचं तिनं कधीच ऐकलं नव्हतं. तिला आश्चर्यच वाटलं.

ओई सुद्धा चकीत झाला होता म्हणून तर इतका पळत आला होता.

''तिकडे स्वयंपाकघरात.'' तो नाकपुड्या फुगवून आणि डोळे मोठे. मोठे करून सांगत होता.

''चल.'' तोत्तोचाननं ओई चा हात धरला आणि त्या दोघांनी मुख्याध्यापकांच्या घराकडे मोर्चा वळवला.

मुख्याध्यापकांचं घर सभागृहाला लागूनच होतं. जेव्हा तोत्तोचान संडासात पडली होती तेव्हा तिला स्वच्छ करण्यासाठी बाथरूमकडे स्वैपाकघरातूनच नेलं होतं आणि याच स्वैपाकघरात, 'काहीतरी समुद्रातलं आणि काहीतरी डोंगरावरच तयार होत असे.

ते दोघं स्वैपाकघरापाशी पोचले तेव्हा त्यांनी मुख्याध्यापकांचा रागावलेला

आवाज ऐकला.

''तुम्ही कोणताही विचार न करता ताकाहाशीला शेपूट आहे असं कसं म्हणालात?'' मुख्याध्यापक तोत्तोचानच्या वर्गशिक्षिकेला म्हणत होते.

''मला त्या अर्थानं नव्हतं म्हणायचं,' त्यांचं उत्तर आलं,

''त्यावेळी तोच समोर दिसला म्हणून...''

''पण तुम्ही जे म्हणालात त्याचं गांभीर्य तुमच्या लक्षात येतंय का? मी ताकाहाशीच्या बाबतीत इतकी काळजी का घेतो हे तुम्हाला समजत कसं नाही?''

तोत्तोचानला वर्गात घडलेला सकाळचा प्रसंग एकदम आठवला...

वर्गात बाई, ''माणसालाही पूर्वी शेपूट होतं ''असं सांगत होत्या. मुलांना गम्मत वाटली. मोठ्या माणसांच्या मते तो 'उत्क्रांतीवाद' होता. आणि जेव्हा बाईंनी सांगितलं, की प्रत्येकालाच शेपटीचा अवशेष असलेलं माकडहाड असतं तेव्हा प्रत्येकजण आपलं कुठंय ते शोधायला लागला आणि वर्गात गोंधळ माजला. तेवढ्यात बाई गंमतीनं म्हणाल्या, ''कदाचित इथल्या कुणालातरी अजूनही शेपूट असेल. काय ताकाहाशी?''

ताकाहाशी पटकन उभा राहिला आणि मान हालवत काकुळतीला येऊन म्हणाला, ''मला नाहीए!''

मुख्याध्यापक त्याच प्रसंगाविषयी बोलत होते. त्यांचा आवाज आता चिडका येण्यापेक्षा दु:खी वाटत होता.

''तुमच्या प्रश्नामुळे ताकाहाशीला काय वाटलं असेल?''

बाईंचं उत्तर ऐकू आलं नाही. पण मुख्याध्यापक चिडले का? हे मात्र तोत्तोचानला समजलं नाही. तिला जर कुणी विचारलं असतं,

''तुला शेपूट आहे का?'' तर तिला ते आवडलं असतं.

अर्थात तोत्तोचान धडधाकट होती म्हणून तिला या प्रश्नाचं काही वाटलं नसतं. पण ताकाहाशीची वाढ खुंटली होती आणि हे त्याला माहीत होतं. म्हणून तर ताकाहाशीचा विचार करून मुख्याध्यापकांनी क्रीडादिनाचे खेळ ठरवले होते. ताकाहाशीसारख्या मुलांना त्यांच्या शरीराची लाज वाटू नये, म्हणून त्यांनी मुलांना पोहण्याचा पोशाख न घालता पोहायला लावलं होतं. ताकाहाशी आणि यासुकीचानसारख्या मुलांचा न्यूनगंड दूर करण्यासाठी त्यांनी सगळे प्रयत्न केले होते. त्यामुळे कुणी इतक्या निष्काळजीपणानं त्याला असे प्रश्न विचारावे हे त्यांना सहनच झालं नाही.

बाईंनी हा प्रश्न विचारला तेव्हा मुख्याध्यापक नेमके त्यांच्या वर्गाबाहेरच उभे होते.

बाई आता रडत होत्या, ''चुकलं माझं. मी आता काय करू म्हणजे ताकाहाशीला बरं वाटेल?''

मुख्याध्यापक काहीच बोलले नाहीत. तोत्तोचानला ते दिसत नव्हते. पण त्याक्षणी तिला ते खूप जवळच्या मित्रासारखे वाटले. ओईलाही तसंच वाटलं असणार.

मुख्याध्यापक बाईंना रागावले तरी सर्व शिक्षकांच्या समोर रागावले नाही हे ती कधीच विसरू शकली नाही. तिला तेव्हा हे समजत नव्हतं, तरी त्यांचं ते वागणंच दाखवत होतं की ते खरोखर उत्तम शिक्षक होते. त्यांचा तो आवाज आणि ते शब्द तिच्या मनात कायमचं घर करून राहिलं.

ती जवळजवळ वसंत ऋतूची सुरुवात होती. हा तोत्तोचानचा 'तोमोई' मधला दुसरा वसंत होता आणि शाळेचं नवं सत्रदेखील सुरु होणार होतं.

## तोमोई मधील दुसरे वर्ष

मैदानातल्या सगळया झाडांना आता कोवळी हिरवी पालवी फुटली होती आणि ताटव्यातल्या फुलांनाही फुलायची घाई झाली होती. लाल पिवळी फुलं माना उंचावून 'तोमोई'तल्या नव्या विद्यार्थ्यांना जणू विचारत होती,

''काय? मजेत ना?''

ट्युलिपचे लांब दांडे अजूनच लांब झाले होते आणि चेरीच्या कळ्या मंद हवेच्या झुळकीबरोबर डोलत डोलत उमलण्याची वाट पाहात होत्या.

पोहोण्याच्या तलावाजवळच्या छोट्याशा चौकोनी हौदातले काळे सोनेरी मासे पाण्यामधे बागडत होते.

वसंत आला असे सांगण्याची गरजच नव्हती. कारण ज्या ऋतूमध्ये निसर्गातली प्रत्येक वस्तू प्रसन्न आणि चमकदार दिसते त्या ऋतूच्या आगमनाच्या दवंड्या देण्याची गरजच काय?

सर्वांनाच माहीत होतं, ''वसंत आलाय.''

तोत्तोचान पहिल्यांदा आईबरोबर तोमोईमध्ये आली त्यागोष्टीला बरोब्बर एक वर्ष झालं होतं. जमिनीतून उगवलेलं फाटक पाहून तिला गंमत वाटली होती. आगगाडीतील शाळा बघून ती जाम नाचली होती आणि सोझाकु कोबायाशी आपले चांगले मित्र होणार याची तिला खात्री पटली होती.

आज तोत्तोचान आणि तिचे वर्गमित्र दुसरीत गेल्याच्या आनंदात होते, तर नवीनच पहिलीत आलेली मुलं उत्सुकतेनं इकडे-तिकडे बघत होती. एक वर्षापूर्वी 'तोत्तोचानच्या' डोळ्यातलं कुतूहल आज त्यांच्या डोळ्यात होतं.

ते वर्ष तिला खूप आनंदाचं गेलं होतं आणि प्रत्येक नव्या दिवसाची तिनं आतुरतेनं वाट पाहिली होती. तिचं अजूनही रस्त्यावरच्या बँडवाल्यांवर प्रेम होतं. पण आजूबाजूच्या कितीतरी गोष्टींवरसुद्धा प्रेम करायला ती शिकली होती.

शाळेत त्रास देते म्हणून शाळेतून काढून टाकलेली ती चिमुरडी पोरगी आता

तोमोईची चांगली विद्यार्थिनी झाली होती.

काही पालकांच्या तोमोईविषयी काही गैरसमजुती होत्या. क्वचित् तोत्तोचानच्या आईबाबांना सुद्धा वाटायचं, ''आपण केलं त्यात काही चुकलं तर नाही ना?''

कोबायाशींच्या शिक्षणपद्धतीचा जे वरवर विचार करायचे त्यांना ती काहीतरी जगावेगळी वाटायची आणि कधी कधी तर मुलांना काढून दुसऱ्या शाळेत घालण्याचाही 'पराक्रम' ते पालक करायचे. मुलांना मात्र तोमोई सोडून जायचं नसायचं. सुदैवाने तोत्तोचानच्या वर्गातलं कुणीही शाळा सोडून जाणार नव्हतं. पण वरच्या वर्गातला एक मुलगा मुख्याध्यापकांना मिठी मारून रडत होता. त्याला शाळा सोडून जायचं नव्हतं. मुख्याध्यापकांचे डोळेही रडून लाल झाले होते. पण त्या मुलांच्या पालकांनी कुणाचंच ऐकलं नाही. जाताना प्रत्येक पावलाला तो मागे वळून बघत होता आणि सर्वांना टाटा करत होता. पण असे प्रसंग फारच क्वचित् घडायचे.

तोत्तोचान आता दुसरीत गेली होती. नव्या वर्षाच्या नव्या आशा तिच्या मनात होत्या. त्या वेळेपर्यंत तोत्तोचानच्या दप्तराची तिच्या पाठीशी चांगलीच गट्टी जमली होती.

## 'स्वानलेक'

हिबीया हॉलमध्ये तोत्तोचान नृत्यनाट्य पहायला गेली होती. नाटिकेचं नाव होतं 'स्वानलेक.' बाबा व्हायोलिन वाजवत होते. नाटक सादर करणारा संच फारच तयारीचा होता. तोत्तोचान पहिल्यांदाच नृत्यनाट्य पहात होती. राणीहंसीनं चमचमणाऱ्या शुभ्र खड्यांचा छोटासा किरीट घातला होता आणि ती हवेत इतक्या अलगद झेपावत होती की वाटावं जणू खरोखरच हंसी उडते आहे. राजपुत्राला राणी हंसी आवडते आणि शेवटी ते दोघेही एकत्र नृत्य करतात. खूपच तरल आणि सुंदर! त्या नाट्यानं आणि त्यातील संगीतानं तोत्तोचान इतकी भारावली होती की घरी आल्यावरही तिच्या डोक्यातून 'मानसरोवर' जात नव्हतं. दुसऱ्या दिवशी सकाळी उठल्याबरोबर ती तोंडही न धुता स्वयंपाकघरात आईपाशी गेली आणि तिनं जाहीर करुन टाकलं 'आई मला गुप्तहेर व्हायचं नाहीये आणि तिकिटंही विकायची नैयेत. मला नर्तिका व्हायचंय आणि 'मानसरोवर' मध्ये नृत्य करायचं.'

'असं?' आईला फारसं आश्चर्य वाटलं नाही.

नृत्यनाट्य जरी तोत्तोचाननं पहिल्यांदाच बघितलं असलं तरी मुख्याध्यापकांकडून तिनं इसाडोरा डंकन बद्दल बरंच ऐकलं होतं. ती एक अमेरिकन नर्तकी होती आणि फारच सुंदर नृत्य करायची. कोबायाशींप्रमाणेच

इसाडोरा डंकनवरही डेल्क्रोझ यांचा खूप प्रभाव पडला होता. मुख्याध्यापकांना 'इसाडोरा' आवडायची एवढंच तोत्तोचानला ती आवडायला पुरेसं होतं. तोत्तोचाननं इसाडोराचं नृत्यं खरं तर कधीच बघितलं नव्हतं पण तोत्तोचानला मात्र ती खूप माहिती असल्यासारखं वाटायचं त्यामुळे तोत्तोचानला नर्तकी व्हावसं वाटणंही स्वाभाविकच होतं नै का?

कोबायाशींच्या युरिथमिक्स शिकविणाऱ्या मित्राची एक नृत्यशाळा होती. आईनं तोत्तोचानला त्यांच्या नृत्याच्या वर्गात घातलं. आई तोत्तोचानला असं कर. तसं कर, असं कधीच सांगत नसे पण तोत्तोचान काही करते म्हणाली तर ती लगेच तयार होत असे आणि कुठलेही जास्तीचे प्रश्न न विचारता तिला हवं ते करण्याची व्यवस्था करत असे.

तोत्तोचाननं नृत्याचे धडे घ्यायला सुरुवात केली. कधी नं कधी तिला मानसरोवर मध्ये नृत्य करायचं होतं. पण नृत्यशिक्षकांची शिकविण्याची वेगळीच पद्धत होती. ते सर्वांना पियानो भोवती जमवत आणि एखाद्या गाण्याची धून पियानोवर वाजवता वाजवता अचानक म्हणत ''मुद्रा.'' मग विद्यार्थ्यांनी स्वतःच कल्पना करून एखादी नृत्यमुद्रा घेऊन स्तब्ध उभं राहायचं. मुलांच्या कल्पनाशक्तीला आणि सर्जनशीलतेला वाव देणारं ते नृत्य होतं.

तोत्तोचानच्या मात्र मनातलं हे ते मानसरोवरवालं नृत्य नव्हतं. तिला तो चकाकणारा मुकूट घालून, झालरींचा शुभ्र झगा घालून आभाळात तरंगणाऱ्या राणी हंसीचं नृत्य हवं होतं. शेवटी एक दिवस तोत्तोचाननं सगळा धीर एकवटला आणि शिक्षकांपाशी जाऊन राणी हंसीची मुद्रा करून विचारलं, ''आपण असं नृत्य कधी करायचं?'' ''आपल्याकडे असं नृत्य नसतं,'' ते म्हणाले, मानसरोवर छान आहे पण मला वाटतं तुम्ही तुमच्या मर्जीनुसार आवडेल तसं नृत्य करावं. त्यानंतर तोत्तोचान नृत्यशाळेत गेलीच नाही.

खूप वर्षांनंतर तोत्तोचानला समजलं की त्या नृत्यशिक्षकांचं नाव होतं 'बाकु इशी' ज्यांनी जपानला मुक्तनृत्याची ओळख करून दिली इतकंच नाही तर त्या प्रदेशाला त्यांनी 'जियुगाओका' म्हणजे स्वातंत्र्याची टेकडी असं नावं दिलं. आणि मनमुक्त नृत्याचा आनंद तोत्तोचानला शिकविण्यासाठी धडपडणारा हा माणूस तेव्हा पन्नास वर्षांचा होता.

## शेतीचे शिक्षण

''हे आजचे तुमचे शिक्षक. हे तुम्हाला खूप नवीन नवीन गोष्टी शिकविणार आहेत.'' असे सांगून मुख्याध्यापकांनी एका नव्या शिक्षकांची ओळख करून दिली. तोत्तोचाननं त्यांच्याकडे निरखून बघितलं. पण ते तर अजिबातच

शिक्षकासारखे दिसत नव्हते. त्यांनी पट्ट्यापट्ट्याची सुती बंडी अंगात घातली होती. आणि टाय न बांधता गळ्याभोवती नुसताच पंचा गुंडाळला होता. गडद निळ्या रंगाची ठिगळं लावलेली कुठलीतरी जुनाट पँट आणि कामगार घालतात तसले रबरी बूट त्यांनी घातले होते.

सगळी मुलं कुहोनबुत्सु मंदिराजवळच्या तळ्यापाशी जमली होती. तोत्तोचानला सारखं वाटत होतं, आपण यांना आधी कुठंतरी पाहिलंय. 'कुठं बरं?' तिनं विचार केला. त्यांच्या उन्हानं रापलेल्या प्रेमळ चेहऱ्यावर खूप सुरकुत्या होत्या. ते सगळंच तिला ओळखीचं वाटत होतं. अचानक तिच्या डोक्यात प्रकाश पडला.

''त्या नाल्याजवळच्या शेतात काम करणारे ते शेतकरी तुम्हीच नं?'' तिनं विचारलं.

''बरोब्बर.'' नवे शिक्षक म्हणाले.

तुम्ही कुहोनबुत्सुला जाताना नेहमी माझ्या शेतावरून जाता. आठवतंय? मोहोरीच्या पिवळ्या फुलांनी भरलेलं ते शेत माझंच.''

''वा! आणि तुम्ही आज आम्हाला शिकवणार?'' मुलांच्या आनंदाला पारावार राहिला नाही.

''छे! छे! मला काही शिकवता येत नाही. मी आपला एक साधासुधा शेतकरी आहे, तुमचे गुरुजी म्हणाले म्हणून मी...''

''बरोबर आहे. हे आपले शेतीचे शिक्षक आहेत. शेतामध्ये लावणी, पेरणी कशी करावयाची हे ते आपल्याला शिकवणार आहेत. चला तर मग. आपण सुरुवात करूयात.''

सर्वसाधारण शाळांमध्ये कोणताही शिक्षक नेमायचा म्हणजे त्याला काहीतरी शैक्षणिक पात्रता असणं आवश्यक असतं. पण कोबायाशींना असल्या गोष्टीची पर्वा नव्हती. मुलांनी प्रत्यक्ष पाहून शिकावं असं त्यांना वाटायचं.

''मग करायची सुरुवात?'' शेतीच्या शिक्षकांनी विचारलं.

कुहोनबुत्सुच्या तळ्याजवळची ती जागा मोठी प्रसन्न आणि शांत होती. कुदळ-फावडी यांची व्यवस्था मुख्याध्यापकांनी आधीच केली होती. त्या जमिनीच्या बरोबर मध्यभागी मुलं काम करणार होती.

''चला कुदळी घ्या!'' शिक्षकांनी त्यांना सांगितलं. मग त्यांनी 'तण' उपटायला सुरुवात केली. त्यांनी मुलांना तणाची सगळी माहिती दिली.

''काही काही प्रकारचं 'तण' तर पिकापेक्षाही वेगानं वाढतं आणि पिकाचं खत-पाणी-सूर्यप्रकाश स्वतःच खाऊन टाकतं. शिवाय किड्यांना लपायला ती सर्वात छान जागा. म्हणून वेळच्या वेळी तण उपटायलाच हवं.'' ते बोलत होते. पण बोलताना त्यांचे हातपाय मात्र काम करत होते. मुलंही ते सांगतील ते

करत होते. मग त्यांनी मुलांना नांगरायचं कसं, खत कसं घालायचं आणि शेतात करायची सगळी सगळी कामं शिकवली.

एका छोट्याशा सापानं गवतातून डोकं काढलं. त्याचा दात ता-चान नावाच्या मुलाला किंचित् लागला. पण शिक्षक म्हणाले,

''इथले साप मुळीच विषारी नसतात आणि तुम्ही त्यांना जर त्रास दिला नाहीत तर ते सुद्धा काही करत नाहीत.''

शेतात रोपांची लावणी कशी करावी हे शिकवता शिकवताच त्यांनी मुलांना किड्यांबद्दल, पक्ष्यांबद्दल, फुलपाखरांबद्दल, हवामानाबद्दल आणि इतर गोष्टींबद्दल कितीतरी माहिती दिली. त्यांच्या घट्टे पडलेल्या मजबूत हातांवरूनच लक्षात येत होतं, की हे सगळं ते स्वतःच्या अनुभवातून शिकवले होते.

शिक्षकांच्या मदतीनं साऱ्या शेतात पेरणी करून झाली, तेव्हा मुलं घामानं निथळत होती. काही थोडेसे चर वेडेवाकडे खणले होते. पण बाकी सगळं शेत कसं बरोब्बर आखल्यासारखं दिसत होतं.

त्या दिवसापासून मुलांच्या मनात शेतकऱ्यांविषयी विलक्षण आदर वाढला होता. आणि त्यांना कधीही बघितलं तरी मुलं म्हणायची,

''आपले शेताचे सर!'' त्यांच्याकडे खत उरलं, की ते मुलांच्या शेतात पसरत असत. पीक छान वाढायला लागलं होतं. रोज एकजण तरी शेताला भेट द्यायचा आणि मुख्याध्यापकांना ते कसं वाढतंय ते सांगायचा.

स्वतः लावलेल्या बियांपासून झाड होताना पाहाण्याचा आनंद मुलं मनसोक्त लुटत होती आणि दोन-तीन मुलं एकत्र जमली, की गप्पा नकळत त्यांच्या शेताच्या प्रगतीकडे वळायच्या.

जगामध्ये 'भयंकर' गोष्टी घडायला सुरवात झाली होती; पण मुलांच्या छोट्या शेतात आणि छोट्याशा हृदयात मात्र अजूनही शांती आणि समाधान होतं.

## रानातील स्वयंपाक

त्या दिवशी शाळा सुटल्यावर तोत्तोचान कुणाशीही न बोलता सगळ्यांना 'अच्छा!' न करता थेट घरी निघाली होती. अन् तोंडानं सतत काहीतरी बडबडत होती.

'मेघांच्या गर्जना, धबधब्याची दरी।
रानातल्या स्वयंपाकाची गंमत न्यारी'

खरं म्हणजे तिच्या एवढ्या मुलीला ते लक्षात ठेवणं जरा अवघडच होतं. पण ती अगदी लक्षपूर्वक ते शब्द म्हणत होती. आजूबाजूला जर कुणी तिच्याशी काही बोललं असतं तर ती नक्कीच ते विसरली असती. एवढंच काय, पण रस्त्यातल्या

डबक्यावरून उडी मारताना तिनं नेहमीसारखं 'एक–दोन–साडे–माडे–तीन' जरी म्हटलं असतं तरी तिचा गोंधळ झाला असता. म्हणून तर एक क्षणही न थांबता सारखं तेच गाणं ती म्हणत होती.

सुदैवानं त्या दिवशी तिला मध्ये कोणी भेटलं नाही. पण स्टेशनमधून बाहेर पडता पडता तिथे काम करणाऱ्या एका माणसानं तिला विचारलं, ''अरेच्या! आज इतक्यात परत आलीस?''

ती उत्तर देणार इतक्यात तिनं स्वतःला सावरलं. उगाच नसता गोंधळ होऊन बसायचा.

घराच्या दाराशी पोचल्यापोचल्या ती मोठ्यांदा ओरडली,

''मेघांच्या गर्जना, धबधब्याची दरी।
रानातल्या स्वयंपाकाची गम्मत न्यारी॥''

पहिल्यांदा आईला समजेना, हे काय नवीनच? मग तिच्या डोक्यात प्रकाश पडला. तोदोरोकी स्टेशनजवळच तोदोरोकी केइकोकु किंवा मेघदरी नावाचं प्रसिद्ध सौंदर्यस्थळ होतं. जुन्या टोकियोमधील निसर्गसौंदर्यासाठी सर्वात प्रसिद्ध ठिकाण होते. तिथं दरीत सुरेखसा धबधबा होता. खळाळत वाहाणारे ओहळ होते अन् खूपशी झाडी होती. उरली रानातल्या स्वयंपाकाची गोष्ट. तर त्याची गंमत अशी, की जियुगाओकापासून तीन स्टेशनांच्या अंतरावर असलेल्या या ठिकाणी मुलं जाणार होती आणि त्या जंगलात स्वतः स्वयंपाक करणार होती. मुलांना लक्षात ठेवायला खरंतर अवघड असलेलं ते गाणं; पण आवडीची गोष्ट असली, की पटकन् लक्षात राहातं एवढं खरं!

शेवटी त्या अवघड शब्दांतून तोत्तोचानची सुटका झाली. मग मात्र तिनं आईला भराभर सगळी माहिती तपशीलवार दिली. येत्या शुक्रवारी सर्वांना सकाळी शाळेत जमायचं होतं. बरोबर लहान वाडगं, चॉपस्टिक (जपानी लोक जेवताना वापरतात त्या बांबूच्या काड्या) आणि एक वाटी तांदूळ न्यायचे होते. मुख्याध्यापक म्हणाले, की ते शिजवले की दोन वाट्या होतात. तिनं आईला न विसरता सांगितलं. ते 'पोर्कसूप' म्हणजे डुकराच्या मासाचं सूप सुद्धा करणार होते. म्हणून काही भाज्या आणि इतर सामग्री थोडीफार न्यायची होती. शिवाय जर काही खायला पाहिजे असं वाटत असेल, तर थोडंसं काहीतरी आणायलाही हरकत नव्हती.

नंतरचे काही दिवस तोत्तोचान आईच्या आसपास स्वयंपाकघरातच घोटाळायची. आई सुरी कशी वापरते, भांडं कसं धरते आणि भात कसा वाढते याचं ती निरीक्षण करायची. आईचं असं निरीक्षण करायला तिला खूप आवडायचं. आणि मधूनच कधीतरी आई, 'स्स्स् चटका बसला' असं म्हणायची आणि पटकन् कानाची पाळी, अंगठा आणि मधल्या बोटात पकडायची. हे तर तिला

फारच आवडलं होतं.

''अगं, कानाची पाळी थंड असते ना, म्हणून,'' आईनं तसं करण्याचं कारण सांगितलं.

''जेव्हा आम्ही मेघांची गर्जना, धबधब्याची दरी तिकडे जाऊ, तेव्हा मी पण असंच करणार.'' तिनं ठरवून टाकलं होतं.

शेवटी एकदाचा शुक्रवार उजाडला. मुलं 'मेघदरी'ला पोचली. मुख्याध्यापकांनी मुलांकडे बघितलं. झाडांच्या फांद्यातून झिरपणाऱ्या सूर्यप्रकाशात त्यांच्या लाडक्या चिमण्यांचे चेहरे चकाकत होते. पाठीवरच्या पिशव्या सांभाळत मुलं, मुख्याध्यापक पुढं काय सांगतात याची वाट पाहात होती आणि त्यांच्यामागे तो प्रसिद्ध धबधबा अतिशय लयबद्धपणे कोसळत होता.



''चला!'' मुख्याध्यापक म्हणाले

''आधी छोटे-छोटे गट करून आपापल्या शिक्षकांनी आणलेल्या विटा रचून चूल तयार करू या. मग काहींनी तांदूळ धुऊन आणा. ते शिजायला चुलीवर ठेवू या आणि पोर्कसूपच्या तयारीला लागू या, करू या सुरुवात?''

मुलांनी गट केले. फक्त पन्नासच मुलं असल्यानं गट करायला काही फारसा वेळ लागला नाही. जमिनीत खड्डे करून, बाजूनी विटा रचून चुलीही तयार झाल्या. त्यावर बारक्या-बारक्या लोखंडी सळ्या घालून भांडी डुगडुगणार नाही अशी व्यवस्था केली. हे चालू असतानाच काहींनी झाडीत हिंडून सरपण गोळा केलं तर काहींनी तांदूळ धुवून आणले. मुलांनी स्वतःची कामं वाटून घेतली होती.

तोत्तोचान सूपसाठी भाज्या चिरत होती. तिच्यापेक्षा दोन वर्षांनी मोठा असलेला एक मुलगा तिला मदत करत होता; पण तो एक तर फारच बारीक तुकडे करायचा किंवा फारच मोठे, त्यामुळे मदत होण्याऐवजी काम मात्र वाढत होतं, अन् कामाची सवय नसल्यानं तो घामानं डबडबला होता. तोत्तोचान मात्र आईचा आदर्श समोर ठेवून कौशल्यानं भाज्या चिरत होती. शिवाय तिनं स्वतःहून काही काकड्या वगैरे खारवून लोणची तयार केली. तिच्याहून मोठ्या मुलींना सुद्धा ती कामाला मदत करत होती. तिला जणू खरोखरच आपण आई असल्यासारखं वाटत होतं. तिच्या खारवलेल्या भाज्यांनी तर सगळेच प्रभावित झाले होते.

''मी म्हटलं, बघावं जमतंय का'' ती संकोचून सगळ्यांना सांगत होती.

'सूप'चा मस्त वास सुटला होता. वेगवेगळ्या गटांमधून 'वा!' 'आहऽऽ' अशा प्रतिक्रिया ऐकू येत होत्या, मुलांच्या आवाजात आवाज मिसळून पक्षीही किलबिलत होते.

त्या दिवसापर्यंत स्वयंपाक करण्याची वेळ क्वचितच् कुणावर आली होती. बहुतेक वेळी आईनं वाढलेलं गरम गरम जेवण्याची त्यांना सवय होती. स्वतः अन्न शिजवण्याचा आनंद आणि पदार्थ तयार होत असताना त्यात होत जाणारे बदल पाहाणं हा त्यांना पूर्णपणे वेगळा प्रयोग होता.

थोड्याच वेळात सर्व चुलीवरची भांडी उतरवली गेली. मग मुख्याध्यापकांनी हिरवळीवरची जागा मुलांकडून साफ-सूफ करून घेतली. प्रत्येक गटांपुढे एक भाताचं आणि एक सूपचं भांडं होतं. पण तोत्तोचाननं मात्र तिनं ठरवलेली गोष्ट केल्याशिवाय सूपचं भांडं चुलीवरून मुळीच उतरवू दिलं नाही. तिनं हातानं भांड्यावरचं झाकण काढलं. मग 'स्स्स्ऽऽ चटका बसला' असं म्हणून कानाच्या पाळीला हात लावला. मग ती म्हणाली:

''हंऽ आता न्यायला हरकत नाही.''

मुलांनी भांडं, बसण्याच्या ठिकाणापर्यंत नेलं. कुणाला तिच्या त्या कृतीत

विशेष रस वाटला नव्हता. पण तोत्तोचानचं मात्र समाधान झालं होतं.

प्रत्येकाचं लक्ष आता पुढ्यातल्या भाताच्या वाडग्याकडे होतं. सूपच्या वाडग्यामधूनही वाफा येत होत्या. मुलांना खूप भूक लागली होती; पण त्याहूनही महत्त्वाचं म्हणजे त्यांनी स्वतः तयार केलेलं ते पहिलंच जेवण होतं.

''बत्तीस वेळा चावून खावा...''

हे गाणं म्हणून झाल्यावर मात्र सारं जंगल शांत झालं होतं. आणि आता त्या दरीत फक्त कोसळणाऱ्या धबधब्याचा आवाज होता.

## ''तू खरोखर चांगली मुलगी आहेस''

''तुला माहीतेय? तू खरोखर फार चांगली मुलगी आहेस.'' मुख्याध्यापक प्रत्येक वेळी तोत्तोचानला हे वाक्य म्हणायचे आणि प्रत्येक वेळी ते तसं म्हणाले, की तोत्तोचान छोटीशी उडी मारायची आणि हसून म्हणायची;

''मी चांगली मुलगीय.''

तिचा यावर फार विश्वास होता.

तोत्तोचान अनेक बाबतीत खरोखरच चांगली मुलगी होती. सर्वांबद्दल तिला आपुलकी होती. विशेषतः अपंगांविषयी तिला फारच जिव्हाळा होता. ती त्यांना नेहमीच मदत करायची. इतर शाळेतील मुलं जर त्यांच्याशी वाईट वागली, तर ती जोरदार विरोध करायची. भांडायची सुद्धा! अर्थात बहुतेक वेळी तोत्तोचानच्या रडण्यानं या भांडणाचा शेवट व्हायचा. मुक्या प्राण्यांचीसुद्धा ती खूप काळजी घ्यायची. पण जरासं काहीतरी निराळं दिसलं, की तिची उत्सुकता जागी व्हायची आणि मग मात्र तिचं समाधान करणं शिक्षकांनाही कठीण होऊन बसायचं.

बऱ्याचदा काहीतरी वेगळंच करायला तिला फार आवडायचं. उदाहरणार्थ , सकाळी सभागृहात जमण्यासाठी रांगेनं जाताना दोन्ही वेण्या हाताखाली घट्ट दाबून ठेवून जायला तिला आवडायचं. 'असं का?' याला अर्थातच उत्तर नसे. एकदा वर्ग झाडण्याची तिची पाळी होती. तिनं सगळा केर गोळा केला आणि वर्गाच्या जमिनीला असलेलं दार उघडून खाली टाकून दिला. तो वर्ग जेव्हा खरोखरीच्या आगगाडीचा डबा होता तेव्हा डब्याची चाकं आणि मशिन्स टाकटीक आहेत का हे पाहाण्यासाठी ठेवलेली ती झडप होती. तोत्तोचाननं ते दार उघडलं खरं; पण ते बंद मात्र करता येईना. तेव्हा मात्र तिनं आख्खी शाळा डोक्यावर घेतली.

असचं एकदा कुणीतरी तिला दुकानात मांस कसं लटकवतात ते सांगितलं. झालं! या बाईसाहेबांच्या मनात काय आलं कुणास ठाऊक, ती पळतच मैदानात उभ्या केलेल्या 'बार' पाशी गेली. आणि एका हातानं सर्वात उंच बार धरून

लटकत राहिली. जेव्हा बाईंनी तिला बघितलं आणि काय करतीस म्हणून विचारलं, तेव्हा ती म्हणाली:

''मी आजच्या दिवस मांसाचा तुकडा झाली आहे.''

पण असं म्हणत असतानाच तिची 'बार' वरची पकड सुटली आणि ती अशी काही आपटली, की दिवसभर बोलूही शकली नाही. आणि आधीचा तो प्लास्टरच्या ढिगाऱ्यात उडी मारण्याचा ऐतिहासिक प्रसंग! सर्वांना ठाऊक आहेच.

असले अनेक उद्योग तिनं केले; पण मुख्याध्यापकांनी कधी आई–बाबांना बोलावून घेतलं नाही. इतर मुलांबाबतही तेच. काही असलं तरी मुलांमध्ये आणि मुख्याध्यापकांमध्येही तिसऱ्या माणसाला कधीही बोलावलं गेलं नाही. जसं पहिल्या दिवशी तोत्तोचानचं म्हणणं त्यांनी चार तास ऐकून घेतलं होतं, त्याचप्रमाणे इतर मुलांचंही मुख्याध्यापक ऐकत. मुलांचं जर खरंच काही चुकलं असलं आणि त्यांच्या ते लक्षात आलं, की ते प्रेमानं फक्त एवढंच म्हणत:

''चल, चुकलं म्हण आणि पुन्हा असं करू नकोस!''

तोत्तोचानच्या तक्रारी त्यांच्या कानावर जात असत म्हणून तर ती भेटली की ते म्हणत:

''तुला माहीतेय? तू खरोखरच फार चांगली मुलगी आहेस.''

यातील 'खरोखर' शब्दांचं महत्त्व फक्त मोठ्या माणसांनाच समजू शकत असे.

''मुख्याध्यापकांना तिला समजावून द्यायचं होतं ते असं :

''काहींच्या मते तू खोडकर मुलगी असशील; पण तुझ्यात खूप चांगले गुण आहेत, आणि मला ते माहीत आहेत.''

तोत्तोचानला हा इतका खोल अर्थ समजायला खूप वर्ष लागली. पण या वाक्यानं तिच्यात एक आत्मविश्वास रुजवला होता. 'चांगली मुलगी.'

त्या वाक्याचे प्रतिध्वनी तिच्या मनात सतत उमटत असत.

ती जेवढी वर्ष तोमोई विद्यालयात होती तेवढी वर्ष कोबायाशी ते वाक्य म्हणत राहिले. त्यांच्या त्या वाक्यानं तोत्तोचानच्या पूर्ण आयुष्याला दिशा दाखवली होती.

''तोत्तोचान, तू खरोखरच फार चांगली मुलगी आहेस!''

## नवरी

आज तोत्तोचान जरा उदास होती. ती आता तिसरीत होती. तिच्याच वर्गातला 'ताईचान' तिला फार आवडायचा. तो बुद्धिमान होता आणि भौतिक शास्त्रात फारच हुशार होता. शिवाय तो इंग्रजीसुद्धा शिकत होता. कोल्ह्याला इंग्रजीमध्ये 'फॉक्स' म्हणतात ते त्यानंच तिला पहिल्यांदा सांगितलं होतं. 'फॉक्स.' तोत्तोचाननं तो शब्द दिवसभर मनाशी घोळवला होता.

रोज वर्गाच्या डब्यात शिरल्याबरोबर ती सर्वात आधी ताईचानच्या कंपासमधील पेन्सिलींना चाकूनं नीट टोकं करून ठेवत असे. स्वतःच्या पेन्सिली मात्र ती अक्षरशः दातांनी कुरतडायची.

असं असूनही आज ताईचान तिच्याशी खूपच कठोरपणे बोलला होता. झालं काय, तोत्तोचान दुपारच्या सुट्टीत शाळेच्या मागच्या त्या ऐतिहासिक गटाराच्या जवळपास उगीचच भटकत होती.

तेवढ्यात 'तोत्तोचान!' अशी ताईचान ची हाक आली. ती खरं तर दचकलीच. कारण ताईचानचा आवाज रागावल्यासारखवा वाटत होता. ती एकदम एका जागीच उभी राहिली. एक क्षणभर थांबून मोठ्ठा श्वास घेऊन ताईचान म्हणाला,

''मी मोठा झाल्यावर तुझ्याशी मुळीच लग्न करणार नाही. तू कितीही वेळा विनंती केलीस तरी मी तुझं काहीएक ऐकणार नाही.''

एवढंच म्हणून तोंड फिरवून तो निघून गेला. ताईचान आणि त्याचं मोठ्ठं डोकं दृष्टीआड होईपर्यंत तोत्तोचान डोळे विस्फारून पाहातच राहिली.

तिनं खिशात हात घातले.

''याला एकाएकी झालं तरी काय?''

तिनं मनाशी खूप विचार केला. शेवटी तिनं वर्गातल्या मियो-चानला घडलेला सगळा प्रकार सांगितला.



तिचं ऐकून घेऊन मियोचान तिला एखाद्या मोठ्या माणसाच्या थाटात म्हणाली, ''बरोबरच आहे, अगं आज खेळाच्या तासाला तू त्याला सुमोच्या (जपानी पद्धतीची कुस्ती) रिंगणातून बाहेर ढकलून दिलंस ना? आणि त्याचं डोकं शरीराच्या मानानं मोठ्ठं असल्यानं तो चटकन रिंगणाबाहेर ढकलला गेला म्हणूनच रागावला असणार तो.''

तोत्तोचानला खूप दुःख झालं. तिला वाटलं, ''बरोबर असंच असणार. रोज पेन्सिलींना टोक करून देण्याइतकं आवडणाऱ्या मुलाला तिनं खरं तर असं ढकलून देण्याची काय गरज होती. समजा तो खेळात जिंकला असता तरी काय बिघडणार होतं?'' पण आता खूप उशीर झाला होता.

तो तिच्याशी कधीच लग्न करणार नव्हता.

''असू दे, तरीपण मी त्याच्या पेन्सिलींना टोकं करणारच.'' तिनं निश्चय केला. ''काही झालं तरी मला आवडतो तो!''

## जुनाट शाळा

'अकामात्सु' प्राथमिक शाळेत शिकणाऱ्या मुलांमध्ये एक लोकप्रिय गाणं होतं. मुलं घरी निघाली, की पुनः एकदा मागे वळून बघत आणि म्हणत :

खूप जुनी शाळा आहे, अकामात्सू शाळा।
आत येऊन पाहाल तर किती सुंदर शाळा।।

इतर शाळांची मुलं त्या शाळेजवळून निघाली, की अकामात्सु शाळेकडे बोट दाखवीत आणि म्हणत,

खूप जुनी शाळा आहे, अकामात्सू शाळा।.
आत जाऊन पाहाल तर किती जुनाट शाळा।।

आणि मग आरडा-ओरडा करीत ती निघून जात.

पहिल्या ओळीमध्ये 'सुंदर' का 'जुनी' हे शाळेच्या इमारतीच्या नवेपणावर किंवा जुनेपणावर अवलंबून होतं; पण जास्त महत्त्वाची होती ती दुसरी ओळ. कारण बाहेरुन शाळा जुनाट असल्याने काही बिघडत नाही; पण शाळा आत कशी आहे हे जास्त महत्त्वाचं असतं.

एक दिवस दुपारी 'तोमोई' मधली मुलं शाळा सुटल्यावर नेहमीप्रमाणे खेळत होती. शेवटची घंटा होऊन शाळेचं मैदान सोडावं लागेपर्यंत काहीही करण्याची मुलांना मुभा होती. मुलांना स्वतंत्रपणे हवं ते करायला पुरेसा वेळ मिळणं फार आवश्यक आहे, असं मुख्याध्यापकांना वाटायचं. त्यामुळे शाळा सुटल्यावर खेळण्याचा वेळ इतर शाळांपेक्षा 'तोमोई'मध्ये जास्त होता.

त्या दिवशी काही मुलं चेंडू खेळत होती. काही लोखंडी बारवर लोंबकळत होती, काही वाळूत उड्या मारत होती. तर काही मुली पाट्यावर बसून गप्पा मारत होत्या. ताईचान सारखे काहीजण अजूनही वर्गात रेंगाळत विज्ञानाचे प्रयोग करत होते.

ग्रंथालयात काहीजण वाचत बसले होते. ज्यांना प्राणी आवडतात असे काहीजण एका मांजराचं निरीक्षण करत होते. एकंदर सगळे आपापल्या मनाप्रमाणे हवं ते करत होते.

तेवढ्यात शाळेबाहेर मोठ्ठा आवाज ऐकू आला–

तोमोई शाळा आहे जुनाट शाळा
आतमधून सुद्धा खूप जुनाट शाळा

तोत्तोचान फाटकाशीच उभी होती. बाप रे! बाहेरचा आवाज अगदी स्पष्ट ऐकू येत होता. तिच्या शाळेला आतून बाहेरून जुनाट म्हणायचं म्हणजेऽऽ तिला खूप राग आला. इतर मुलांनाही राग आला. ती धावतच फाटकापाशी आली.

'जुनाट शाळा'!

बाहेरची मुलं हेटाळणीच्या सुरात ओरडत पळून गेली.

तोत्तोचान इतकी चिडली होती, की ती त्या मुलांच्या मागे एकटीच धावली. पण ती मुलं खूप जोरात पळाली होती. आणि बघता बघता एका छोट्याशा रस्त्यानं दिसेनाशी झाली होती. तोत्तोचान खिन्नपणे परत फिरली. चालताचालता ती पुटपुटत होती–

खूप छान शाळा आहे तोमोई शाळा।
आतून आणि बाहेरून खूप छान शाळा॥

तिला ते आवडलं आणि तिला थोडंसं बरं वाटलं. जेव्हा ती परत शाळेपाशी पोचली तेव्हा बाहेरच्या शाळेतली असल्यासारखी उभी राहिली आणि सगळ्यांना ऐकू जाईल अशा मोठ्या आवाजात म्हणाली,

खूप छान शाळा आहे तोमोई शाळा
आतून आणि बाहेरून खूप छान शाळा!

अगोदर मैदानात खेळणाऱ्या मुलांना समजेना, की हे गाणं कोण म्हणतंय. जेव्हा ती तोत्तोचान आहे असं लक्षात आलं, तेव्हा सगळी मुलं रस्त्यावर आली आणि तिच्या आवाजात सूर मिसळून गायला लागली. हळुहळू मुलांनी एकमेकांचे हात हातात घालून साखळी केली आणि एकत्र शाळेकडे चालायला सुरुवात केली. त्यांच्या सुरांपेक्षाही त्यांची हृदयं एक झाली होती. अर्थात् मुलांना त्याची जाणीव नव्हती. जितके ते शाळेजवळ जात होते तितका त्यांचा जोष वाढत होता.

खूप छान शाळा आहे तोमोई शाळा।
आतून आणि बाहेरून खूप छान शाळा॥

ऑफिसमधे बसून मुख्याध्यापक सारा प्रकार ऐकत होते. त्यांना किती आनंद होत होता हे मुलांना माहीत नव्हतं.

कुठल्याही शिक्षकाला या गोष्टीचा आनंद झाला असता; पण विशेषतः कोबायाशीसारखे जे मुलांचा इतका विचार करतात त्यांना तर शाळा चालवणं म्हणजे फारच जिकीरीचं काम, 'तोमोई'मधे तर प्रत्येकच गोष्ट निराळी होती. त्यामुळे लोकांची टीका होणं स्वाभाविकच होतं.

अशा परिस्थितीत (मुख्याध्यापकाच्या दृष्टीने) मुलांच्या त्या गाण्याइतकी सुंदर भेट दुसरी काय असणार!

खूप छान शाळा आहे तोमोई शाळा!
आतून आणि बाहेरून खूप छान शाळा॥

त्या दिवशी शेवटची घंटा नेहमीपेक्षा थोडी उशीराच झाली.

## रिबिन

एके दिवशी जेवणाच्या सुट्टीत मुलांचं खाऊन झाल्यावर तोत्तोचान सभागृहाच्या आसपास रेंगाळत होती. तेवढ्यात मुख्याध्यापक समोरून आले.

''इकडे आहेस होय तू? माझं तुझ्याकडे काम होतं एक.''

''काय?'' मुख्याध्यापकांचं आपल्याकडे काम आहे या कल्पनेनंच तोत्तोचान हुरळून गेली.

तू ही रिबिन कुठनं आणलीस? तिच्या केसांना बांधलेली रिबिन पाहून त्यांनी विचारलं.

तोत्तोचानला तो प्रश्न ऐकून खूप आनंद झाला. तिनं कालपासून ती रिबिन लावली होती आणि ती तिला सापडली होती. तिनं टाचा उंच करून मुख्याध्यापकांना ती रिबिन नीट दाखविली.

''ही नं, माझ्या आत्याच्या जुन्या शाळेच्या गणवेशावर होती. ती काल तो गणवेश कपाटात ठेवत होती तेव्हा मी बघितली. आत्यानं ती मला देऊन टाकली. आत्या म्हणते, की माझं फार लक्ष असतं म्हणून.''

''अस्सं होय?''

मुख्याध्यापक विचारात पडल्यासारखे वाटत होते.

तोत्तोचानला त्या रिबिनीचा फार अभिमान वाटत होता. तिनं सांगितलं, की ती आत्याकडं गेली होती तेव्हा आत्या काही जुने कपडे कपाटात ठेवत होती.

त्यात एक जुना लांब स्कर्ट होता. आत्या तो स्कर्ट घडी घालत असतानाच तोत्तोचानला त्यावर काहीतरी छानसं दिसलं.

''ते काय आहे?'' तोत्तोचाननं विचारलं. तिच्या प्रश्नावर आत्या क्षणभर थांबली. ते काहीतरी म्हणजे एक छानशी रिबिन होती. स्कर्टच्या मागच्या पट्ट्याला ती लावली होती.

''मागून छान दिसण्यासाठी ते बांधण्याची पद्धत होती. त्या पूर्वीच्या काळी हातानं विणलेल्या पट्टीचं किंवा अशा रिबिनीचं फूल बांधत असत.'' आत्यानं सांगितलं.

तोत्तोचान कौतुकानं त्या रिबिनीकडे पाहात होती.

''तुला हवी तर घेऊन जा. मी काही आता वापरत नाही.'' आत्या म्हणाली. तिनं कात्री घेऊन ती रिबिन स्कर्टपासून कापून वेगळी केली आणि तिला दिली.

रिबिन खरोखरच फार सुंदर होती. ती रुंद आणि रेशमी होती आणि छान फुलाफुलांची नक्षी होती. त्यावर आत्या म्हणाली होती की ते रेशीम परदेशी होतं. त्या रिबिनीचं फूल तोत्तोचानच्या डोक्याइतकं मोठं व्हायचं.

बोलताना तोत्तोचान मधून मधून डोकं हालवत होती आणि तिची मान हलली, की तिच्या रिबिनीचा आवाज येत होता.

''एकूण असं आहे!'' मुख्याध्यापक म्हणाले, ''काल मियोचान म्हणत होती, की तिला तुझ्यासारखी रिबिन हवीय. मी सगळ्या दुकानांमधे पाहिलं पण तशी नाही मिळाली. एकूण ती परदेशी आहे.''

त्यांचा चेहरा चिंतेत पडलेल्या बाबांच्या चेहऱ्यासारखा दिसत होता.

''तोत्तोचान, तू जर शाळेत ही रिबिन नाही बांधलीस तर? अगं, होतं काय, की मियोचान माझ्यामागे सारखी भुणभुण करत राहाते. बघ, म्हणजे तुला चालणार असेल तर...''

तोत्तोचाननं हाताची घडी घालून एक क्षणच विचार केला आणि पटकन म्हणाली, ''ठीक आहे, मी उद्यापासून ही रिबिन नाही लावणार.''

''आभारी आहे मी तुझा!'' मुख्याध्यापक म्हणाले.

खरं तर तोत्तोचानला वाईट वाटलं होतं; पण मुख्याध्यापक चिंतेत दिसले म्हणून तिनं कबूल केलं होतं. शिवाय तिच्या आवडत्या मुख्याध्यापकांना एका रिबिनीसाठी दुकाना-दुकानांतून हिंडावं लागलं याचं तिला दुःख वाटलं होतं. हे तर तोमोईचं वैशिष्ट्य होतं. एकमेकांचा विचार करायला, एकमेकांना समजून घ्यायला आणि अडी-अडचणीत मदत करायला तिथं मुद्दाम शिकवायला लागत नसे. कुठल्याही वयाच्या माणसाबाबत ती अगदी स्वाभाविक गोष्ट होती.

दुसऱ्या दिवशी तोत्तोचान शाळेत गेल्यावर आई जेव्हा तिची खोली आवरायला गेली, तेव्हा तिला ती रिबिन तोत्तोचानच्या आवडत्या खेळातल्या अस्वलाच्या गळ्याला बांधलेली सापडली. आईला आश्चर्य वाटलं. ज्या रिबिनीचा तोत्तोचानला एवढा अभिमान होता ती तिनं का टाकली? आईनं पाहिलं. ते अस्वल अचानकं इतकी छान रिबिन बांधल्यामुळे जरा जास्तच खुषीत दिसत होतं.

## जखमी जवानांशी भेट

आयुष्यात पहिल्यांदाच तोत्तोचान जखमी जवानांच्या हॉस्पिटलमध्ये जात होती. तिच्याबरोबरच इतर प्राथमिक शाळांमधली एकूण तीस मुलं होती. तिची त्यातल्या कोणाशीही ओळख नव्हती. प्रत्येक शाळामधून सर्वसाधारणपणे दोन-तीन मुलं पाठवली जात असत. पण तोमोईसारख्या छोट्या शाळेतून एखादाच विद्यार्थी पाठवला जायचा. कुठल्याही शाळेतील एक शिक्षक सर्वांबरोबर असायचा. तोत्तोचान तोमोईची प्रतिनिधी होती.

बरोबर आलेल्या बाईनी मुलांना एका वॉर्डमध्ये नेलं. तिथे पांढरे कपडे घातलेले पंधरा जवान होते. काही पलंगावर झोपले होते तर काही इकडे तिकडे हिंडत होते. तोत्तोचानला काळजी होती, की ते जवान कसे दिसत असतील कुणास ठाऊक. पण ते सगळे चांगले हसतमुख होते. काहींच्या डोक्याला मोठाली बँडेजे बांधलेली होती; पण चेहऱ्यावर मात्र दुःखाची रेषासुद्धा नव्हती. तोत्तोचाननं सुटकेचा निःश्वास टाकला.

बाईनी सगळ्यांना वॉर्डच्या मध्यभागी एकत्र केलं आणि त्या जवानांकडे बघून त्या म्हणाल्या- ''आम्ही सगळे तुम्हाला भेटायला आलोय!''

मुलांनी त्यांना 'नमस्ते' केलं.

''आज 'पाच मे' म्हणजे मुलांचा सण!'' बाई पुढे म्हणाल्या, ''म्हणून आज मुलांच्या सणाचंच गाणं आम्ही म्हणणार आहोत.''

बाईनी मुलांकडे बघितलं.

''चला सुरू? एक-दोन-तीन......'' आणि त्यांनी हातांनी ताल द्यायला सुरुवात केली. मुलं एकमेकांना ओळखत नव्हती; पण त्यांनी एका सुरात गायला सुरुवात केली.

''उंचावरल्या निळ्या सागरी
ढगांपलिकडे निळ्या सागरी...

तोत्तोचानला ते गाणं माहीत नव्हतं, कारण असलं कुठलंच गाणं 'तोमोई' मध्ये शिकवलं जात नव्हतं. ती एका जवानाच्या पलंगावर एका कडेला बसून राहिली. त्या जवानाचा चेहेरा खूप मायाळू दिसत होता. ती संकोचून ते गाणं ऐकत होती. पहिलं गाणं संपल्यावर बाई म्हणाल्या, आता बाहुलीच्या उत्सवाचं गाणं म्हणू या. तोत्तोचान सोडून सर्वांनी ते गाणं फारच सुंदर म्हटलं.

''ज्योतीने लावू ज्योती
दीपांनी उजळू राती''

शांत बसून राहाण्याशिवाय तोत्तोचान काहीच करू शकत नव्हती.

गाणं संपल्यावर सर्वांनी टाळ्या वाजवल्या. मग घोड्याचं गाणं झाल्यावर तो

अंथरुणावरचा जवान तोत्तोचानला म्हणाला, ''तू नाही म्हटलंस गाणं?''

तोत्तोचानला खूप ओशाळल्यासारखं झालं. ती त्या जवानांना भेटण्यासाठी आली होती आणि तिला एक गाणंसुद्धा म्हणता आलं नव्हतं.

शेवटी ती पलंगावरून खाली उतरली आणि धीटपणे म्हणाली, ''ठीक आहे, आता मला माहीत असलेलं एक गाणं म्हणते.''

''काहीतरी ठरवल्यापेक्षा वेगळं घडत होतं.

बाईंनी विचारलं, ''तू का म्हणणारेस?''

पण तोवर तोत्तोचाननं एक खोल श्वास घेऊन सुरुवात केली.

बत्तीस वेळा चावून खावा.
प्रत्येक घास जेवताना...

काही मुलं हसायला लागली.

काहींची आपापसात कुजबूज सुरू झाली,

''ए, हे कुठलं गाणं?''

बाईंनी तिच्या गाण्याला ताल द्यायचा प्रयत्न केला; पण शेवटी त्यांनाही काय करायचं ते समजेना. तोत्तोचानला थोडा संकोच वाटला, पण तिनं नेटानं गाणं पूर्ण म्हटलं. ''हसतमुखाने नेहमी खावा प्रत्येक खाऊ खाताना.''

गाणं संपल्यावर तिनं सर्वांना मान लववून अभिवादन केलं. तिनं मान वर केली तेव्हा तिला धक्काच बसला. कारण त्या जवानाच्या डोळ्यातून अश्रूंच्या धारा लागल्या होत्या. तिला वाटलं, तिनं काहीतरी वाईट केलं असणार, तेवढ्यात तिच्या बाबांपेक्षा वयानं किंचित् मोठ्या वाटणाऱ्या त्या जवानानं तिच्या डोक्यावर हलकेच हात ठेवला आणि सद्गदित आवाजात तो म्हणाला, ''फार आभारी आहे मी तुझा.''

तो तिच्या डोक्यावर हलके-हलके थोपटतच होता आणि अश्रूंचा आवेगही त्याला आवरत नव्हता. जरा त्याला बरं वाटावं म्हणून बाई म्हणाल्या, ''आता मुलं तुम्हाला त्यांनी सैनिकांसाठी लिहिलेले निबंध वाचून दाखवतील.''

मुलांनी आळीपाळीने निबंध वाचायला सुरुवात केली. तोत्तोचाननं त्या जवानाकडे बघितलं, त्याचे डोळे आणि नाकाचा शेंडा लाललाल झाला होता; पण तो तोत्तोचानकडं बघून हसला. तीही हसली. तिला जरासं बरं वाटलं.

त्या जवानाच्या डोळ्यात पाणी का आलं हे त्याचं त्यालाच माहीत, कदाचित् त्याला तोत्तोचानसारखी छोटीशी मुलगी असेल. किंवा कदाचित् तिच्या त्या गाण्याच्या गोड आणि निरागस पद्धतीमुळे त्याचं मन हेलावून गेलं असेल. किंवा युद्धभूमीवर अनेकदा उपासमार होण्याचा अनुभव असताना, 'बत्तीस वेळा चावून खावा' हा या गोड पोरीचा संदेश त्याला उदास करून गेला असेल. चावायला

काही मिळायला तर हवं ना? त्या जवानाला कदाचित् थोड्याच दिवसात या कोवळ्या पोरांना काय पाहावं लागेल या विचारांनंही वाईट वाटलं असेल.

निबंध वाचतांना मुलांना काहीच जाणवलं नसेल; पण प्रशांत महासागरात एव्हाना युद्धाला सुरुवात झाली होती.

## आरोग्य साल

स्टेशनवरच्या माणसाला गळ्यातला पास दाखवून तोत्तोचान जियुगाओका स्टेशनच्या बाहेर पडली.

स्टेशनजवळ काहीतरी वेगळं दृश्य दिसत होतं. एक तरुण माणूस चटईवर मांडी घालून बसला होता. त्याच्या पुढ्यात एक वाळक्या काटक्यांचा ढीग पडला होता. त्या काटक्या बहुधा झाडाच्या वाळक्या साली होत्या. पाच-सहा माणसं त्याच्याभोवती कोंडाळं करून उभी होती. तोत्तोचानही त्यांच्यात सामील झाली.

तो माणूस सांगत होता, ''नीट लक्ष द्या, मी काय म्हणतोय ते ऐका. आपली सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे आरोग्य. सकाळी उठल्याबरोबर तुमची तब्येत बरीय का हे समजायला हवं असेल, तर फक्त या सालीचा एक तुकडा चावून पाहा. कडवट लागला तर नक्की समजा, की प्रकृतीत बिघाड आहे. आणि कडवट नाही लागलं तर मात्र बिन्धास्त राहा. तब्येत ठणठणीत आहे असं खात्रीनं समजा. ही साल तुम्हाला सांगेल, तुम्ही निरोगी आहात की नाही? आणि या इतक्या मौल्यवान सालीची किंमत फक्त वीस पैसे. कोपऱ्यातले दादासाहेब या. या. अहो, एकदा परीक्षा तर घेऊन पाहा.'' असं म्हणून त्यानं एका हाडकुळ्या माणसाला एक तुकडा दिला. त्यानं किंचित् चावून बघितलं.

''मला वाटतं थोडंसं कडू लागतंय.''

तो साली विकणारा माणूस पटकन म्हणाला :

''दादा जरा काळजी घ्या. काहीतरी रोग खात्रीनं आहे. पण तशी विशेष चिंता नाही. थोऽऽऽडंसंच कडू वाटतंय ना? मग हरकत नाही. पण तरीही जपाच.''

''बाईसाहेब, तुम्हीही पाहा नं एकदा परीक्षा करून.'' असं म्हणत त्यानं दुसऱ्या एका बाईकडे मोर्चा वळवला.

तिनं एक मोठ्ठासा तुकडा घेतला आणि भराभर चावला, ''छेऽऽ! अजिबात कडूबिडू लागत नैये.''

''वा! वा! अभिनंदन. बाईसाहेब, तुमची प्रकृती उत्तम आहे.''

मग आवाज चढवून तो म्हणाला :

''वीस पैसे. फक्त वीस पैशात तुमच्या प्रकृतीचं अचूक निदान करा. फक्त वीस पैसे.!''

तोत्तोचानला खरं तर एक तुकडा चावून बघायचा होता; पण तिला संकोच वाटत होता. शेवटी तिनं विचारलं, ''शाळा सुटल्यावर तुम्ही इथे असाल का हो?''

''होऽ हो, असेन की!'' तो त्या शाळकरी पोरीकडे बघत म्हणाला.

तोत्तोचान शाळेकडे धावत सुटली. तिला शाळा भरायच्या आत पोचायचं होतं आणि गेल्यागेल्या तिला काहीतरी विचारायचं होतं.

वर्गात शिरल्याशिरल्या तिनं विचारलं, ''मला कोणीतरी वीस पैसे उसने देऊ शकेल?''

पण कोणाकडंच वीस पैसे नव्हते. एका चॉकलेटलासुद्धा दहाच पैसे लागायचे. वीस पैसे ही काही फार मोठ्ठी रक्कम नव्हती; पण तरीही कोणाकडेच वीस पैसे नव्हते.

''मी आई-बाबांना विचारू का?'' मियोचान म्हणाली. अशा वेळी मियोचान मुख्याध्यापकांची मुलगी होती हे फार सोयीचं होतं. मियोचानचं घर सभागृहाशेजारीच होतं. त्यामुळे जणू काही ती शाळेतच राहात असल्यासारखं होतं.

''बाबा म्हणाले, ते तुला वीस पैसे देतील.'' मियोचाननं जेवणाच्या सुट्टीत सांगितलं, ''पण ते विचारत होते, की तुला ते हवेत कशासाठी?''

तोत्तोचान लगेच मुख्याध्यापकांकडे गेली.

''तुला वीस पैसे हवेत ना?'' त्यांनी चष्मा काढता काढता विचारलं.

''कशाला गं?''

''मला नं आपण बरे आहोत का नाही ते सांगणारी झाडाची साल घ्यायचीय !'' तिनं पटकन् सांगून टाकलं. मुख्याध्यापकांची उत्सुकता वाढली होती.

''अच्छा? अन् ती कुठे मिळते?''

''स्टेशनसमोर.'' तिनं भराभरा सकाळची सगळी हकीगत सांगितली.

''ठीक आहे. तुला हवी तर घे एक विकत. पण मलाही एकदा ती साल चावायला देशील ना?'' मुख्याध्यापकांनी खिशातून पैशाचं पाकीट काढलं आणि तिच्या हातावर वीस पैसे ठेवले.

''धन्यवाद! मी नं आईकडून घेऊन तुम्हाला पैसे परत करेन. ती मला नेहमी पुस्तकांना वगैरे पैसे देते. मला इतर काही हवं असेल तर आधी विचारावं लागतं; पण ही साल सर्वांनाच उपयोगी पडणारेय म्हणून ती काही नाही म्हणणार नाही.''

शाळा सुटल्यावर हातात वीस पैसे घट्ट धरून ती पळत पळत स्टेशनकडे गेली. तो माणूस अजूनही तिथे बसून त्या साली विकत होता.

तोत्तोचानच्या हातातले वीस पैसे बघून तो म्हणाला, ''अरे वा! आता ही साल पाहून तुझे आई-बाबा खूष होतील.''

''हो, आणि रॉकी पण,'' ती पटकन म्हणाली.

''रॉकी कोण?'' त्यानं विचारलं.

''रॉकी आमचा कुत्राय्- जर्मन शेफर्ड जातीचा आहे तो.''

एक क्षणभर विचार करून तो म्हणाला, ''कुत्रा...हरकत नाही. मला वाटतं कुत्र्यालासुद्धा उपयोग होईल. त्याला जर कडू लागली तर तो ती खाणार नाही. म्हणजेच त्याची तब्येत बरी नाही.'' त्या माणसानं सहा इंच लांब आणि साधारण एक इंच रुंदीचा सालीचा एक तुकडा काढून दिला.

''हा घे. रोज थोडासा चाव. कडू लागला तर तुला बरं नाही असं समज आणि नाहीतर काहीच प्रश्न नाही.''

तोत्तोचाननं नीट जपून ती साल घरी नेली. गेल्या गेल्या तिनं आधी ती साल चावून बघितली. छे! ती अजिबात कडू नव्हती. खरं तर तिला कसली चवच नव्हती.

''आ हा! माझी तब्येत एकदम नीटय.''

''आहेच मग.'' आई हसून म्हणाली. ''का काय झालं?''



तोत्तोचाननं आईला सगळं नीट समजावून सांगितलं. आईलासुद्धा एकदा साल चावून बघायला लावली.

''नाही गं, कडू नाहीये.'' आई म्हणाली.

''म्हणजे तू पण अगदी ठणठणीत आहेस.''

''मग तोत्तोचान रॉकीकडे गेली आणि तिनं तो तुकडा त्याच्यासमोर धरला. रॉकीनं तो हुंगून बघितला. नंतर चाटला.

''ए, चावून बघ ना, त्याशिवाय कसं समजणार की तू बरा आहेस की नाहीएस ते?'' तोत्तोचाननं त्याला आग्रह केला.

पण रॉकीनं काही तो तुकडा चावण्याचा प्रयत्न केला नाही. तिनं परत एकदा त्याच्या तोंडाजवळ तो तुकडा नेला.

''एक चाव रे, तुला बरं नसेल तर मला फार वाईट वाटेल.''

रॉकीनं शेवटी एक छोटासा चावा घेतला. आणि परत एकदा हुंगला. त्याला आवडला नाही असं वाटत नव्हतं. त्यानं एक मोठ्ठी जांभई दिली.

''बरं झालं बाई, तुला काहीही झालेलं नाहीये.''

दुसऱ्या दिवशी सकाळी आईनं तिला वीस पैसे दिले. ती सरळ मुख्याध्यापकांकडे गेली आणि तिने चटकन् सालीचा तो तुकडा त्यांच्या समोर ठेवला. त्यांनी प्रश्नार्थक नजरेनं तिच्याकडे बघितलं. तेवढ्यात तिच्या हातातले वीस पैसे त्यांना दिसले आणि त्यांना आठवलं.

''चावून बघा!'' तोत्तोचान म्हणाली,

''कडू लागलं तर तुम्हाला बरं नाही असं समजा!''

मुख्याध्यापकांनी ती किंचित् चावली आणि नंतर नीट निरखून बघितली.

''कडू लागतेय?'' तोत्तोचाननं काळजीनं त्यांच्याकडे बघितलं.

''याला चवच नाहीये.'' तिला तो तुकडा परत देतादेता ते म्हणाले, ''अग मी पूर्ण बराय.''

तिला खूपच आनंद झाला. त्या दिवशी तिनं शाळेत सगळ्यांना तो तुकडा चावून बघायला लावला. एकाही मुलाला तो तुकडा कडू लागला नाही. याचाच अर्थ ते सगळे निरोगी होते. तोत्तोचानचा आनंद गगनात मावत नव्हता.

सगळी मुलं मुख्याध्यापकांना जाऊन सांगत होती, की ती निरोगी होती. आणि प्रत्येकाला मुख्याध्यापक म्हणत होते, ''अरे वा छान!''

मुख्याध्यापकांना सगळं समजत होतं. त्यांना माहीत होतं, की कोणीही चावली तरी ती साल कडू लागणार नव्हती.

पण मुख्याध्यापकांना आवडला होता तो तोत्तोचानचा सगळे निरोगी असण्याबद्दलचा आनंद. तोत्तोचानवरच्या संस्कारामुळे ती साल कुणाला कडू तर लागत नाही ना, याविषयी तिला काळजी वाटत होती.

तोत्तोचाननं रस्त्यावरच्या एका कुत्र्यालासुद्धा ती साल चावायला लावण्याचा प्रयत्न केला. जवळजवळ ते कुत्रं तिला चावलंच; पण त्याचंही तिला काही वाटलं नाही.

''अरे, तुला समजेल रे तू बरा आहेस का नाही?'' ती त्या कुत्र्यावर ओरडली. ''चाव रे. तू आजारी नसलास म्हणजे झालं.''

शेवटी एकदाचे तिचे प्रयत्न सफल झाले. त्या कुत्र्यानं एकदाचा तो तुकडा चावला.

''अरे वा! तू पण निरोगी आहेस.'' ती उड्या मारत म्हणाली.

कुत्र्यानं जणू आभार मानण्यासाठी मान हलवली आणि तो पळून गेला.

मुख्याध्यापकांच्या अंदाजाप्रमाणेच साली विकणारा तो माणूस परत कधीच जियुगाओकामध्ये दिसला नाही.

रोज सकाळी शाळेला निघताना तोत्तोचान तिच्या कप्प्यातून ती साल काढायची. ती साल म्हणजे एक 'शक्तिवर्धक' झालं होतं. साल चावून रोज एकदा म्हणायची, 'वा! मी निरोगी आहे, आणि सुदैवाने तोत्तोचान खरोखरच निरोगी होती.

## इंग्रजी बोलणारा मुलगा

'तोमोई' मध्ये एक नवा विद्यार्थी दाखल झाला. प्राथमिक शाळेच्या मुलांच्या मानाने तो बराच उंच होता. आणि जाडही. तोत्तोचानला तर तो सातवीत असल्यासारखा वाटला. त्याचे कपडेही इतरांपेक्षा वेगळे होते, थोडेसे मोठ्या माणसासारखे.

त्या दिवशी मैदानात मुख्याध्यापकांनी त्याची सर्वांशी ओळख करून दिली. ''हा 'मियाझाकी'. याचा जन्म अमेरिकेत झाला आणि तो इतके दिवस तिथेच होता. म्हणून त्याला नीट जपानी बोलता येत नाही. त्यासाठीच तो 'तोमोई'मध्ये आला आहे. म्हणजे त्याला सर्वांशी मैत्री करता येईल आणि अभ्यासही करता येईल. तो तुमच्यातलाच एक आहे. याला आपण कोणत्या वर्गात घालू या? मला वाटतं, याला ता-चान वगैरे बरोबर पाचवीत घालू या.''

''होऽऽ चालेल.'' मोठ्या भावाच्या अविर्भावात ता-चान म्हणाला, तो चित्रकलेत निपुण होता.

मुख्याध्यापक हसून पुढे म्हणाले:

''मी तुम्हाला सांगितलंय, की याचं जपानी फारसं चांगलं नैये; पण त्याचं इंग्रजी फार छान आहे. त्याच्याकडून थोडं शिकून घ्या. त्याला इथल्या राहाणीमानाची सवय नाही. त्याला सांभाळून घ्या.

''घ्याल ना? आणि अमेरिकेतील जीवनाविषयी त्याला खूप प्रश्न विचारा. तो

तुम्हाला खूप वेगवेगळ्या गमती सांगेल. ठीकै? आजपासून मी याला तुमच्यावर सोपवतोय.''

मियाझाकीनं सर्वांना मान लववून नमस्ते केलं. आणि 'ता-चान' बरोबर इतरही वर्गातल्या सर्व मुलांनी त्याला परत नमस्ते केलं.

जेवणाच्या सुट्टीत 'मियाझाकी' मुख्याध्यापकांकडे गेला. सगळी मुलं त्याच्या मागोमाग गेली. त्यानं सरळ बूट घालून त्यांच्या घरात प्रवेश केला. सारी मुलं मागून ओरडायला लागली, ''ए बूट काढ, बूट काढ.''

तो जरा गडबडला. ''सॉरी हंऽऽ'' म्हणत त्याने बूट काढले.

सगळ्या मुलांनी त्याला काय करायचं ते एकदम सांगायला सुरुवात केली.

''तातामी'' (जपानी पद्धतीच्या चटया घातलेल्या खोलीत बूट घालून जायचं नाही आणि सभागृहातसुद्धा. पण वर्गात आणि ग्रंथालयात बूट घातले तर चालतात.''

''कुहोनबुत्सुच्या मंदिरात गेल्यावर अंगणात बूट घालून गेलं तरी चालतं. पण देवळात मात्र नाही हं.''

जपान आणि अमेरिकेच्या चालीरीतींमधला फरक समजून घ्यायला खरंच मजा यायची.

दुसऱ्या दिवशी मियाझाकीनं एक मोठ्ठं चित्राचं इंग्रजी पुस्तक शाळेत आणलं. जेवणाच्या सुट्टीत सगळी मुलं त्याच्या भोवती जमली. मुलांना गंमत वाटली. त्यांनी इतकी सुंदर चित्रं कधीच बघितली नव्हती. आत्तापर्यंत त्यांनी पाहिलेल्या चित्रांमध्ये भडक लाल, हिरवा आणि पिवळा एवढेच रंग असायचे; पण या पुस्तकामध्ये फिक्या गुलाबी रंगाच्या सुरेख रंगछटा होत्या आणि निळ्या रंगाच्यासुद्धा पांढऱ्यात मिसळणाऱ्या निरनिराळ्या छटा होत्या. शिवाय तेलीखडूच्या पेटीतल्या ठराविक चोवीस रंगांव्यतिरिक्त इतरही विविध रंग होते. इतकंच काय, पण ते रंग 'ता-चान'च्या अठ्ठेचाळीस खडूच्या पेटीतसुद्धा नव्हते. त्या पुस्तकानं सगळेच प्रभावित झाले होते.

चित्रांच्या बाबतीत सांगायचं तर पहिल्या चित्रात एक छोटंसं बाळ होतं. आणि एक गोंडस कुत्रं त्या बाळाच्या दुपट्याचं टोक धरून ओढत होतं. मुलांना ते चित्र जास्त आवडलं. कारण ते बाळ अजिबात चित्रात रंगवल्यासारखं वाटत नव्हतं. गुलाबी गुलाबी गालाचं, इवलेसे हातपाय असलेलं ते अगदी खरंखुरं वाटत होतं. इतक्या छान आणि गुळगुळीत कागदावर छापलेलं असं पुस्तक त्यांनी कधीच बघितलं नव्हतं. तोत्तोचान नेहमीच्या उत्सुकतेनं आणि उत्साहानं जास्तीतजास्त जवळ सरकून ती चित्रं बघत होती.

मियाझाकी त्यातली इंग्लिश गोष्ट वाचून दाखवत होता. त्याची ती भाषा इतकी मधुर वाटत होती, की मुलं एकाग्रतेने ऐकत होती. मग मियाझाकीनं जपानीमध्ये त्याचा अर्थ सांगायचा प्रयत्न सुरू केला. अर्थात जपानीमध्ये सांगताना तो

चांगलाच गोंधळत होता.

मियाझाकीनं नक्कीच काहीतरी नाविन्यपूर्ण आणि निराळं शाळेत आणलं होतं.

''अकाचान (बाळ) म्हणजे बेबी.'' त्यानं जपानी शब्दांचा अर्थ इंग्रजीत सांगायला सुरुवात केली.

''अकाचान म्हणजे बेबी.'' सर्वांनी त्याच्या मागून म्हटलं.

''उत्सुकुशी (सुंदर) म्हणजे ब्युटिफुल,'' तो पुढे म्हणाला. पण तो उत्सुकुशी मधील 'कु' वर जोर देत होता.

'उत्सुकुशीऽऽ म्हणजे ब्युटिफुल.'' मुलं म्हणाली तेव्हा मियाझाकीच्या लक्षात आलं, की त्याचा उच्चार चुकला होता. त्यानं विचारलं, ''उत्सुकुशीऽऽ असं म्हणायचं का?''

लवकरच मियाझाकीची सगळ्यांशी दोस्ती झाली. तो रोज निरनिराळी पुस्तकं तोमोईमध्ये आणायचा आणि जेवणाच्या सुट्टीत सर्वांना वाचून दाखवायचा.

जसा मियाझाकी त्या सर्वांचा इंग्रजीचा शिक्षक होता तसं त्याचंही जपानी झपाट्यानं सुधारत होतं आणि त्याही पेक्षा विशेष म्हणजे 'तोकोनामा' मध्ये जाऊन बसण्याची चूकही तो आता करत नव्हता. 'तोकोनामा' म्हणजे फुलझाडं किंवा इतर सजावटीच्या वस्तू ठेवण्याचा मोठ्ठा कोनाडा.

तोत्तोचान आणि तिचे सर्व मित्र मियाझाकीकडून अमेरिकेबद्दल बरंच काही जाणून घेत. तोमाई बाहेर मात्र अमेरिका जपानचा शत्रू होता. आणि इंग्रजी ही शत्रूंची भाषा असल्याकारणानं सर्व शाळांच्या पाठ्यपुस्तकांतून इंग्रजी हटविली गेली होती.

'अमेरिका शत्रू आहे' अशी सरकारने घोषणा केली खरी, परंतु तोमोईतील मुलं आताही 'उत्सुकुशी म्हणजे ब्युटिफुल' असं म्हणत होती. तोमाईत तेव्हा संथ गतीनं उबदार हवा खेळत होती. आणि तिथली मुलं खरोखरीनं खूपच सुंदर होती.

## पहिलं नाटक

''आम्ही एक नाटक सादर करणार आहोत.''

तोमोईच्या आजवरल्या इतिहासातलं हे पहिलचं नाटक. हे खरंय की दुपारी जेवणानंतर मुलं रोज भाषण देत. पण मंचावर उभं होऊन प्रेक्षकांसमोर नाटक करणं म्हणजे जरा वेगळीच गोष्ट होती. तसा मंचावर पियानोदेखील ठेवलेला होता जो मुख्याध्यापक ताल व्यायामाच्या वेळी वाजवीत. पण खरी गोष्ट अशी होती की तोवर एकाही मुलाने नाटक पाहिलेलं नव्हतं. अगदी तोत्तोचानदेखील स्वान लेक (मान सरोवर) हे बॅले नृत्य पाहण्याचा प्रसंग वगळता कधीच

कुठल्याच नाट्यगृहात गेलेली नव्हती. तरीही, वार्षिक महोत्सवात यावेळी नाटक करायचं असं मुलांनी ठरविलेलं होतं.

तोत्तोचानच्या पूर्ण वर्गाने यासाठी वर्गणी गोळा करायचा निर्णय घेतला. ते एक जुनं 'काबुकी' नाटक होतं. आणि तोमोईत केलं जाऊ शकेल, अशाप्रकारचं नाटक तर ते मुळीच नव्हतं. पण नाटक मुलांच्या जपानी भाषेच्या पुस्तकातलं होतं.

श्री मारुयामांना नाटक शिकविण्याचं काम दिलं गेलं होतं. आईको साईशीला पैलवानाच्या (बेंकई) भूमिकेसाठी निवडलं गेलं होतं. तीच वर्गात सर्वात उंच अन् जाड होती. आमाडेरा रागीट दिसू शकत होता म्हणून त्याला मुख्य चौकीदाराच्या (तोगाशी) भूमिकेसाठी निवडण्यात आलं, आणि तोत्तोचानला मालकाची (योशित्सुने) भूमिका द्यावी असं चर्चेनंतर ठरवलं गेलं. नाटकातील या मालकाला एका मजूराच्या वेशात पळून जाण्याचा प्रयत्न करायचा असतो. वर्गातील बाकी सर्व मुले परिक्रमा करणारे भिक्षू होणार होती. नाटकाची तालीम सुरु होण्याआधी प्रत्येकाने आपले संवाद पाठ करणं आवश्यक होतं. तोत्तोचान आणि भिक्षूंची मजा होती कारण त्यांना काहीच बोलायचं नव्हतं. तोत्तोचानला मालकाच्या भूमिकेत गुडघे टेकून एका टोपात आपलं तोंड लपवून ठेवायचं होतं. बेंकईला म्हणजे जो पैलवान खरोखर मालकाचा नौकर असतो त्याला आपल्याच मालकावर ओरडण्या-खेकसण्याचं, मारण्या-झोडण्याचं काम करायचं होतं. म्हणजे तो आपल्या वेषांतर केलेल्या मालकांना आणि इतर भिक्षूंना असाका नावाच्या चौकीप्रमुखाला चकवून पलीकडे नेऊ शकणार होता. ही पूर्ण तुकडीच एका मंदिरासाठी दान गोळा करण्याच्या मिषानं बाहेर पडते. आईको साईशीची बेकेई (पैलवान) ची भूमिका फारच तगडी होती. चौकी प्रमुखाबरोबरचे तिचे संवाद अगदी चटकदार होते. शिवाय हा पैलवान दानाचे आज्ञापत्र वाचून दाखवितो तो प्रसंगही रमणीय होता. कारण जो कागद बेकेई पैलवान वाचून दाखवीत असतो तो मुळात कोराच असतो आणि संकटात सापडल्यावर गडबडून जाऊन धर्मगुरुंच्या भाषेची नक्कल करून तो म्हणतो, ''सर्वप्रथम तोदाइजी मंदिराच्या जीर्णोद्धारासाठी ...''

आईको साईशी तिचं ते 'सर्वप्रथम' वालं भाषण रोज म्हणून बघायची.

चौकीप्रमुख 'तोगाशी'ला सुद्धा खूप संवाद होते. कारण तो पैलवान बेकेईचे सगळे युक्तिवाद परतवून लावण्याचे प्रयत्न करत असतो. आमाडेराला ते पाठ करायला जरा त्रास होत होता.

शेवटी सरावाला सुरुवात झाली. तोगाशी चौकीप्रमुख आणि बेंकेई पैलवान एकमेकांसमोर उभे रहायचे. पैलवान बेंकेईच्या मागे भिक्षूंची रांग आणि मालक योशित्सुनेच्या वेशात सर्वात पुढे तोत्तोचान खाली मान घालून गुडघे टेकून. पण तोत्तोचानला नेमकं काय चाललंय याची कल्पनाच येत नव्हती. त्यामुळे बेकेईने

योशित्सुनेवर हल्ला केला, तेव्हा तिला खूप चीड आली. मग तिनं आइकोला सरळ लाथ मारली तशी आईको कळवळली, आणि भिक्षू बनलेली मुलं हसू लागली.

पैलवान बेंकेईनं कितीही मारलं तरी मालक योशित्सुनेनं निमूटपणे सहन करायचं असतं. कल्पना अशी असते, की तोगाशीला बेंकेईच्या खरेपणाबद्दल शंका येते. पण बेंकेईच्या चातुर्यानं तो इतका प्रभावित होतो, की तो सर्वांना नाक्यावरून गावात शिरण्याची परवानगी देतो. शिवाय बेंकेईला हे नाटक वठवण्यासाठी त्याच्या मालकाला मारावं लागतं याचंही तोगाशीला वाईट वाटतं.

योशित्सुनेनं जर बेंकेईला प्रतिकार केला तर नाटकाची मध्यवर्ती कल्पनाच ढासळणार होती. मारुयामांनी ही गोष्ट तोत्तोचानला समजावून सांगण्याचा खूप प्रयत्न केला; पण तिच्या काही ते डोक्यात शिरेना.

''मला जर आईकोनं मारलं तर मी तिला मारणारच.'' तिचं आपलं एकच ध्रुवपद चालू.

अर्थातच नाटक पुढंच जाईना.

शेवटी मारूयामा म्हणाले:

''मला वाटतं, आपण ताईचानला योशित्सुने करू या. तोत्तोचान तू भिक्षू होशील का?''

तोत्तोचानला जरा बरं वाटलं. कारण उगीचच्या उगीच मार खायला तिला मुळीच आवडलं नसतं. ती भिक्षूच्या रांगेत सर्वात शेवटी उभी राहिली.

मारुयामांना वाटलं, चला आता सर्व टीक होईल. पण छे! थोड्याच वेळात शांतपणे एका जागी उभं राहायचा तोत्तोचानला कंटाळा आला. मग तिनं पुढच्या मुलाला गुदगुल्या कर नाही तर त्याच्या पायावर पाय दे, असे प्रकार सुरू केले. हा प्रकार आसपासच्या मुलांमध्ये गोंधळ माजवणारा तर होताच; पण त्यामुळे बेंकेई आणि तोगाशी यांच्यामधला प्रवेशही बिघडत होता.

परिणामी तोत्तोचानकडून भिक्षूचं कामही काढून घेतलं गेलं.

ताईचान योशित्सुनेच्या भूमिकेत समरसून काम करत होता. तो आपला मार मुकाट्याने सहन करत होता. साहजिकच प्रेक्षकांना त्याच्याबद्दल खरोखरच दया येऊ लागली.

तोत्तोचानच्या अनुपस्थितीत नाटकांचा सराव सुरळीत झाला.

तोत्तोचान एकटीच शाळेच्या मैदानात गेली. तिने बूट काढले आणि एकटीनेच नाचायला सुरुवात केली. तिच्या मनाला येईल तसं ती नाचत होती. कधी ती हंस व्हायची तर कधी वारा, कधी शिकारी तर कधी झाड. तिच्या दृष्टीनं ती सर्वात सुंदर नाचत होती. रिकाम्या मैदानात ती नाच नाच नाचली.

खोल मनात कुठंतरी वाटत होतं की आपण योशित्सुनेचं काम करायला हवं होतं. आजही तिला काम करण्याची संधी मिळाली असती तर ती मार

खाऊन गप्प न राहता आईकोला तिनं मारलं असतं मात्र नक्कीच.

अशा तऱ्हेनं तोमोईमधल्या पहिल्या आणि शेवटच्या नाटकात काम करण्याची संधी तिनं गमावली होती.

## चाक

तोमोईचे विद्यार्थी दुसऱ्यांच्या भिंतीवर रेघोट्या कधीच मारत नसत कारण त्यांना शाळेत तसं करण्याची संधी मिळत असे.

संगीताच्या तासाला सगळी मुलं खडू घेऊन त्यांना हवं तिथं जमिनीवर बसत. मुख्याध्यापकांनी पियानो वाजवायला सुरुवात केली की मुलं त्या तपकिरी लाकडी जमिनीवर खडूनं संगीतातील खुणा करायला लागत.

तोत्तोचानच्या वर्गात फक्त दहा मुलं होती आणि सभागृहात इतकी जागा होती की कुणालाही हवं तेवढं मोठ्ठं लिहिता येत असे. तोमोईमध्ये या ठेक्यांना विशिष्ट नांवे होती.

 याला उडी म्हणत. कारण हा उड्या मारायला छान ठेका होता.

 याला झेंड्यासारखा दिसतो म्हणून झेंडा म्हणत.

 याला झेंडा-झेंडा म्हणत.

 याला दुहेरी झेंडा म्हणत

 हा काळा

 हा पांढरा

 हा तीळवाला पांढरा

 अन् हा गोल.

या पद्धतीनं मुलं संगीतही शिकत आणि मजाही करत. तो वर्ग मुलांना फारच आवडायचा.

जमिनीवर खडूनं लिहायचं ही मुख्याध्यापकांची कल्पना. कागद अपुरा पडतो अन् सगळ्यांना पुरण्याइतके फळे नसतात मग जमिनीचाच फळा का करू नये?

त्यावर कितीही मोठं लिहिता येतं आणि मुख्य म्हणजे मुलांना संगीताचाही आनंद लुटता येतो. शिवाय वेळ उरला तर मुलं त्यावर विमानं, बाहुल्या किंवा काहीही काढत. कधी कधी मुलं सगळी चित्रं गम्मत म्हणून एकमेकाला जोडत आणि मग ती सगळी जमीनच एक प्रचंड चित्र होई.

मध्ये मध्ये मुख्याध्यापक प्रत्येकापाशी येऊन पहात. अरे हा झेंडा-झेंडा नव्हता ती उडी होती. सगळयांची चिन्हं तपासून झाल्यावर ते परत पियानोवर तीच धुन वाजवीत आणि मुलं त्यांची चिन्हं त्या ठेक्यांशी जुळवून पहात. कितीही काम असलं तरी मुख्याध्यापक संगीताचा वर्ग स्वतःच घेत असत. मुलांना तर त्यांच्याशिवाय संगीत ही इतकी आनंदाची गोष्ट कधीच वाटली नसती.

त्यानंतर जमीन स्वच्छ करणं हे एक मोठ्ठं काम असायचं. आधी फळा पुसायच्या फडक्यानं सगळी चित्रं पुसायची आणि मग सगळयांनी मिळून जमीन पुन्हा लखलखीत करायची. बाप रे! तोमोईच्या मुलांनी सभागृहाची जमीन सोडून कधीच कशावर रेघोट्या मारल्या नाहीत त्या म्हणूनच.

तोमोईच्या मुलांना खडू बद्दलचं संपूर्ण ज्ञान झालं होतं. कुठल्या प्रकारचा खडू चांगला, तो कसा धरायचा, त्याची चित्रं चांगली येण्यासाठी तो कसा वापरायचा. त्यांच्यातला प्रत्येकजण खडू बहाद्दर होता.

## यासुकीचान देवाघरी गेला

उन्हाळी सुट्टीनंतरचा शाळेचा पहिलाच दिवस होता. मैदानात जमलेल्या मुलांसमोर कोबायाशी नेहमीप्रमाणेच उभे होते. दोन्ही हात कोटाच्या खिशात घालून थोडा वेळ ते शांत उभे राहिले. नंतर त्यांनी खिशातून हात बाहेर काढले आणि मुलांकडे बघितलं. त्यांच्या डोळ्यात पाणी आलं होतं.

''यासुकीचान देवाघरी गेला.'' त्यांनी संथपणे बोलायला सुरुवात केली.

''आज आपण त्याच्या अंतिम संस्कारांसाठी जायचं आहे. मला माहितीय, तुम्हाला सर्वांनाच फार आवडायचा तो. फार वाईट वाटतंय मला पण...''

यापेक्षा जास्त ते बोलू शकले नाहीत. त्यांचा चेहरा लालबुंद झाला होता आणि गालांवरून अश्रू ओघळत होते. मुलांना तर धक्काच बसला. कोणीच काही बोलत नव्हतं. सगळयांच्या मनात फक्त यासुकीचानचाच विचार होता. तोमोईनं इतकी भयाण शांतता यापूर्वी कधीच अनुभवली नव्हती.

''पण इतक्या लवकर कसा काय देवाघरी गेला तो?''

तोत्तोचानच्या मनात आलं, ''त्यानं मला दिलेलं 'टॉमकाकाचं घरकुलं' हे पुस्तक अजून वाचूनसुद्धा झालं नाही माझं. तो नेहमी म्हणायचा, की ते पुस्तक एकदा तरी प्रत्येकानं वाचायला पाहिजे, म्हणून तर त्यानं मला सुट्टी सुरू

होण्याआधी ते वाचायला दिलं होतं.''

तिला सुट्टी सुरू होण्याआधी त्यानं पुस्तक दिलं आणि अच्छाऽऽ केला तेव्हाची त्याची बोटं आठवली. ती खूप बारीक आणि अशक्त वाटली.

अगदी पहिल्यांदा तो भेटला तेव्हा तिनं त्याला विचारलं होतं, ''तू असा का चालतोस?''

त्यावर तो म्हणाला होता, ''मला पोलिओ झालाय.''

तिच्या मनात सारखे त्याचेच विचार येत होते. तो कसा बोलायचा, कसा हसायचा आणि त्या दिवशी झाडावर चढण्याचा तो प्रसंग! तो तर ती जन्मात कधी विसरणं शक्य नव्हतं. किती जड होतं त्याला वर खेचणं, पण त्याचा पूर्ण विश्वास होता तोत्तोचानवर. अमेरिकेत टी. व्ही. नावाचं काही तरी असतं हेही त्यानंच तोत्तोचानला सर्वात प्रथम सांगितलं. तोत्तोचानला खूप आवडायचा तो. ती दोघं एकत्र डबा खायची. सुट्टीत एकत्र खेळायची. आणि स्टेशनपर्यंत एकत्रच जायची. आता यासुकीचानची कमतरता तिला खूपच जाणवणार होती. यासुकीचान देवाघरी गेला याचा अर्थ तो आता कधीच परत येणार नव्हता. त्या कोंबडीच्या पिलांसारखा. तिनं त्या पिलांना किती हाका मारल्या तरी त्यांनी पुन्हा डोळे उघडले नव्हते.

देनेनच्योमध्ये यासुकीचानचं घर होतं. यासुकीचानवर देनेन्च्योच्या समोरील चर्चमध्ये अंतिम संस्कार होणार होते. मुलं एका रांगेत शांतपणे तिथपर्यंत गेली. तोत्तोचान आज नेहमीप्रमाणे इकडे-तिकडे बघत उड्या मारत नव्हती. तिची नजर जमिनीला खिळली होती.

मुख्याध्यापकांनी पहिल्यांदा ही बातमी सांगितली. तेव्हाच्या तिच्या भावना आणि आत्ताची मनःस्थिती यात फरक होता. तिची पहिली प्रतिक्रिया होती – अविश्वास! नंतर तिला खूप दुःख झालं; पण आत्ता मात्र तिच्या मनात एकच इच्छा होती, तिला यासुकीचानला परत जिवंत झालेलं बघायचं होतं. त्याच्याशी खूप गप्पा मारायच्या होत्या. तो पुन्हा दिसणार नाही, ही कल्पनासुद्धा तिला सहन होत नव्हती.

चर्चमध्ये सगळीकडे पांढरीशुभ्र लिलीची फुलं फुलली होती. यासुकीचानची आई, बहिणी आणि इतर नातेवाईक काळे कपडे घालून उभे होते. तोत्तोचानला बघितल्यावर तर त्यांना अजिबात राहावेना. त्या आणखीच रडायला लागल्या. तोत्तोचान कुणाच्या तरी अंतिम-संस्काराला आयुष्यात पहिल्यांदाच जात होती. ते सगळं किती दुःखदायक असतं हे तिला चांगलंच जाणवत होतं. कोणीच काही बोलत नव्हतं. चर्चमधल्या ऑर्गनवर मंद मंद करुण सुरात धार्मिक मंत्रांचं संगीत वाजत होतं. निरभ्र आकाशात सूर्य चमकत होता. चर्चमध्ये प्रकाशही भरपूर होता; पण तरीही सगळं अंधारून आल्यासारखं वाटत होतं. चर्चमधल्या एका

माणसानं सगळ्यांनाच एक-एक लिलीचं पांढरं फूल दिलं आणि सांगितलं, की प्रत्येकानं ते फूल शवपेटिकेमध्ये यासुकीचानच्या मृतदेहावर वाहायचं.

शवपेटिकेमध्ये यासुकीचान डोळे मिटून पहुडला होता. त्याच्यात जरी चैतन्य नव्हतं, तरी त्याचा चेहरा मात्र पूर्वीइतकाच मायाळू आणि हुशार दिसत होता. तोत्तोचाननं गुडघे टेकले, फूल त्याच्याजवळ ठेवलं आणि हलकेच त्याच्या हाताला स्पर्श केला. यापूर्वी तो हात धरून तिनं किती तरी वेळा स्टेशनपर्यंतचा प्रवास केला होता. तिच्या गुबगुबीत गुलाबी हातापेक्षा त्याचा हात किती तरी अशक्त आणि निस्तेज होता; पण बोटं मात्र लांबसडक होती.

''अच्छाऽऽ'' ती हळूच म्हणाली, ''कदाचित् मोठं झाल्यावर आपण परत कधी तरी भेटू आणि कदाचित् तोवर तुझा पोलिओ बरासुद्धा झालेला असेल.''

मग ती उठली, तिनं पुन्हा एकदा त्याच्याकडे बघितलं.

''अरे, विसरलेच होते मी,'' ती म्हणाली.

''आता तुझं पुस्तक परत कसं करणार मी? असं करू या, तू परत भेटेपर्यंत माझ्याचकडे ठेवते मी ते. कुण्णाला देणार नाही, चालेल?''

परत फिरताना तिला वाटत होतं, मागून यासुकीचान म्हणत होता,

''तोत्तोचान, किती मजा करायचो नं आपण? हो नं. मी तुला कधीच विसरणार नाही!''

चर्चच्या फाटकापर्यंत पोचल्यावर तिनं मागे वळून बघितलं.

''मीसुद्धा तुला कधीच विसरणार नाही.'' ती म्हणाली.

वसंतऋतूमधला दिवस होता तो. तिची यासुकीचानशी पहिली भेट झाली त्या दिवसासारखाच सूर्यप्रकाश आजही होता; पण आज मात्र तिचे हसरे गाल अश्रूंनी भिजलेले होते.

## गुप्तहेर

तोमोईमधले विद्यार्थी नंतर यासुकीचानच्या आठवणीनं बरेच दिवस उदास होते. विशेषतः सकाळी शाळा भरण्याच्या वेळी जेव्हा ही जाणीव व्हायची, की यासुकीचानला यायला उशीर नाही झालेला, तर तो आता येणारच नाही, तेव्हा ते मुलांना प्रकर्षानं जाणवायचं. त्याच्या नसण्याची सवय करून घ्यायला मुलांना बराच वेळ लागला. लहान वर्ग असण्याचे फायदे एरवी कितीही असतील; पण असा एखादा प्रसंग घडला, की मात्र फार कठीण असतं. छोट्याशा वर्गात एकाची अनुपस्थितीसुद्धा फार जाणवणारी असते. एक बरं होतं, की तोमोईमधल्या मुलांच्या जागा ठरवलेल्या नव्हत्या, तसं असतं तर मात्र यासुकीचानची रिकामी जागा मुलांना जास्तच जाणवली असती.

गेले काही दिवस तोत्तोचान मोठेपणी कोण व्हायचं याचा विचार करत होती. लहानपणी तिला रस्त्यावरचा बँडवाला व्हायचं होतं किंवा एखादी नृत्यांगना. तोमोईमध्ये पहिल्या दिवशी ती आली तेव्हा स्टेशनवर तिकिटं विकायची तिची इच्छा होती. पण हल्ली तिला वाटायला लागलं होतं, की काहीतरी बायकांना शोभेल असं, पण इतरांपेक्षा वेगळं काम करावं. 'नर्स' व्हावं असं तिच्या मनात आलं; पण लगेच तिला आठवलं, जखमी जवानांना भेटायला ती हॉस्पिटलमध्ये गेली तेव्हा तिनं बघितलं होतं, नर्स इंजेक्शन वगैरे देत होत्या. 'बाप रे! ते नाही आपल्याला जमणार.' तिनं ठरवून टाकलं.

अचानक तिचा चेहरा उजळला. "अरेच्या, मी आधीच नव्हतं का ठरवलं कोण व्हायचं ते." मग ती ताईचानकडे गेली. त्यानं नुकताच स्पिरिटचा दिवा पेटवून प्रयोगाला सुरुवात केली होती.

''मी गुप्तहेर व्हायचं ठरवलंय!'' तिनं अभिमानानं सांगितलं.

ताईचाननं तिच्याकडे जरा वेळ निरखून बघितलं. नंतर थोडा वेळ तो खिडकीबाहेर बघत राहिला. तो बहुधा कसला तरी विचार करत होता. मग तो गंभीर आवाजात म्हणाला,

''गुप्तहेर व्हायला खूप बुद्धिमान असायला हवं आणि शिवाय बऱ्याच भाषा यायला लागतात त्यासाठी.''

ताईचान क्षणभर थांबला. नंतर त्यानं तोत्तोचानकडे बघितलं आणि तो थंडपणे म्हणाला, सर्वात महत्त्वाचं म्हणजे, मुलींनी गुप्तहेर व्हायचं असेल तर दिसायला सुंदर असायला लागतं.''

तोत्तोचाननं तिची दृष्टी खाली वळवली.

थोडा विचार करून ताईचान हलक्या आवाजात तिच्याकडे न बघता म्हणाला, ''आणि मला नाही वाटत बडबड्या मुलींना गुप्तहेर होता येईल.''

तोत्तोचान एकदम गप्प झाली. तो तिच्या गुप्तहेर होण्याच्या विरुद्ध होता म्हणून नाही, तर तो जे काही बोलत होता ते खरं होतं म्हणून. तिच्या लक्षात आलं, गुप्तहेर होण्याचे कुठलेच गुण नव्हते तिच्यात. आणि ताईचान काही तिला वाईट वाटावं म्हणून बोलत नव्हता. तिला तो विचार मनातून काढून टाकण्याशिवाय मार्गच नव्हता.

''काय आश्चर्य,'' तिच्या मनात आलं, ''हा तर माझ्याएवढाच आहे, पण माझ्यापेक्षा किती जास्त समजतं याला.''

समजा, ताईचान तिला म्हणाला असता, की त्याला वैज्ञानिक व्हायचंय तर ती काय उत्तर देणार होती?

ती फार तर असं म्हणू शकली असती,

''हो. तुला स्पिरिटचा दिवा छान लावता येतो.''

पण ते फारच बालिश झालं असतं.

किंवा, ''तुला कित्सुने (कोल्हा) चा अर्थ 'फॉक्स' हे माहितीय म्हणून तू वैज्ञानिक होऊ शकशील.''

पण छे! त्यालाही काही अर्थ नव्हता.

ते काही असो; पण तिला खात्री होती, की ताईचान कुणीतरी मोठ्ठा माणूस होणार होता.

म्हणून ती गोऽऽऽड आवाजात म्हणाली, ''नाही होणार मी गुप्तहेर, पण तू मात्र नक्की कुणीतरी मोठ्ठा माणूस होणार!''

ताईचान काहीतरी पुटपुटला, त्यानं डोकं किंचित् खाजवलं आणि तो समोरच्या पुस्तकात गढून गेला. पण जर ती गुप्तहेर होणार नव्हती तर काय होणार होती? समोरच्या स्पिरिटच्या दिव्याच्या ज्योतीकडे एकटक बघत ती विचार करत होती.



## बाबांचं व्हायोलिन

तोत्तोचानच्या कुटुंबालाही हळूहळू युद्धाचे परिणाम जाणवायला लागले होते. रोजच आसपासच्या तरुणांना युद्धावर जाण्यासाठी 'बांझाई'च्या आरोळ्या देऊन निरोप दिले जात होते. दुकानांमधून एकामागून एक खाद्यपदार्थ नाहीसे व्हायला लागले होते. ''डोंगरावरचं काहीतरी आणि समुद्रातलं काहीतरी'' या नियमाचं पालन करणं दिवसेंदिवस अवघड होत चाललं होतं. समुद्री-गवत आणि प्लमच्या लोणच्यानं आई कसाबसा तोत्तोचानचा डबा भरत होती. पण लवकरच तेही अशक्य व्हायला लागलं. गोळ्या-बिस्किटं तर दुकानात बघायलासुद्धा मिळत नव्हती.

ओकायामाच्या जवळचं एक टॉफीचं स्वयंचलित मशीन तोत्तोचानला माहीत होतं. त्या मशीनच्या खाचेत पाच पैशाचं एक नाणं टाकलं, की टॉफीचं छोटं पाकीट मिळायचं. दहा पैशाचं नाणं टाकलं, की जरासं मोठं पाकीट मिळायचं. पण गेले कित्येक दिवस ते मशीन रिकामं पडलं होतं. कितीही नाणी टाकली तरी काहीसुद्धा मिळायचं नाही; टाकलेली नाणी मात्र परत यायची.

पण तोत्तोचानला मात्र वाटायचं की अजूनही त्यात टॉफीचं पाकीट असेल. कदाचित् ते आत अडकून बसलं असेल.

म्हणून ती रोज ओकायामाच्या स्टेशनवर उतरायची आणि पाच पैशाची, दहा पैशाची नाणी खाचेतून टाकत राहायची. पण टॉफीचं पाकीट काही कधी मिळालं नाही.

त्याचवेळी कुणीतरी तोत्तोचानच्या बाबांना सांगितलं, की त्यांनी जर दारू-गोळ्याच्या कारखान्यात जाऊन तिथल्या लोकांसाठी व्हायोलिनवर लोकप्रिय समरगीतं वाजवली तर त्यांना साखर, तांदूळ आणि इतरही वस्तू मिळतील. शिवाय बाबांना उत्कृष्ट व्हायोलिनवादक म्हणून नुकतंच एक मोठं बक्षीस मिळालं असल्यानं त्यांना तर नक्कीच खूप गोष्टी मिळतील असं त्यांच्या मित्राचं म्हणणं होतं.

''तुम्ही काय ठरवलंय?'' आईनं विचारलं, ''जाणार आहात?''

संगीताचे कार्यक्रम दुर्मिळ होत चालले होते. रेडिओवर सुद्धा फक्त युद्धाशी संबंधित कार्यक्रमच प्रसारित होत होते. त्यामुळे बाबांना आणि त्यांच्या साथीदारांना काही कामच उरलं नव्हतं. त्यांनी खरं तर या संधीचा फायदा घ्यायला हवा होता.

बाबांनी उत्तर देण्याआधी थोडा विचार केला.

''माझ्या व्हायोलिनवर तसलं काही वाजवायला खरं म्हणजे मला आवडणार नाही.''

''बरोबर आहे तुमचं.'' आई म्हणाली, ''जेवणाची व्यवस्था आपण करू

कशीतरी.''

बाबांना माहीत होतं, की तोत्तोचानला पुरेसं खायला मिळत नव्हतं, मशीनमधून टॉफी मिळवण्याचे ती व्यर्थ प्रयत्न करीत होती. आणि दोन चार गाणी व्हायोलिनवर वाजवली तर त्यांच्या कुटुंबाला बरीच मदत होणार होती. पण मूठभर अन्नापेक्षा त्यांच्या दृष्टीनं संगीताचं मोल कितीतरी जास्त होतं. आईलाही ते माहीत होतं. म्हणूनच तिनंही बाबांना कधी आग्रह केला नाही.

''तोत्तोचान, मला क्षमा कर,'' ते खिन्नपणे म्हणाले.

कला, आदर्श आणि काम हे सगळं समजण्याइतकी तोत्तोचान मोठी नव्हती; पण बाबांचं त्यांच्या व्हायोलिनवर खूप प्रेम आहे हे मात्र तिला नक्कीच माहीत होतं. बाबांनी आलेली चांगली संधी गमावली म्हणून कित्येक नातेवाईकांनी त्यांच्याशी बोलणं सोडलं होतं. खूप खडतर दिवस काढावे लागले; पण बाबांनी त्यांच्या कलेचा व्यापार केला नाही. आणि बाबांना जे आवडत नाही ते त्यांनी मुळीच करू नये असं तोत्तोचानचं ठाम मत होतं.

त्यांच्याभोवती उड्या मारत नाचत ती म्हणाली, ''मलासुद्धा तुमचं व्हायोलिन खूप आवडतं.''

पण तरीही दुसऱ्या दिवशी ती नेहमीप्रमाणे ओकायामाच्या स्टेशनवर उतरली आणि मशीनच्या खाचेला डोळा लावून तिनं आत पाहाण्याचा प्रयत्न केला. आत काही असण्याची शक्यताच नव्हती. पण तिचं मात्र समाधान होत नव्हतं. त्यात एखादी तरी टॉफी असेलच अशी तिला आशा होती.

## वचन

सुट्टीत डबा खाऊन झाल्यावर मुलं खुर्च्या आणि टेबलं व्यवस्थित सरकवून ठेवत असत, तेव्हा सभागृह खूप मोठं वाटायचं.

''आज सगळ्यात आधी मुख्याध्यापकांच्या पाठीवर मी बसणार.'' तोत्तोचाननं पक्कं ठरवलं होतं.

ती खरं म्हणजे, नेहमीच तसं ठरवायची; पण ऐनवेळी दुसरंच कोणीतरी तिची जागा घ्यायचं. ते सभागृहाच्या मध्यभागी मांडी घालून बसले रे बसले, की कोणीतरी पटकन् त्यांच्या मांडीवर बसायचं आणि निदान दोन जणं तरी पाठीवर बसून त्यांना काहीतरी सांगण्याचा प्रयत्न करत असायची.

''अरे! अरे! थांबा थांबा!!'' मुख्याध्यापक हसत हसत म्हणायचे. हसून हसून त्यांचा गोरा गोरा चेहरा लालबुंद झालेला असायचा. पण एकदा त्यांच्या पाठीशी लागलेली मुलं जराही त्या जागेवरूनच हलायची नाहीत. त्यामुळे

तुम्हाला एक क्षण जरी उशीर झाला तरी मुख्याध्यापक गर्दीनं पूर्ण वेढलेले असायचे. पण यावेळी मात्र तोत्तोचानचा निश्चय पक्का होता आणि ती आधीच त्यांची वाट बघत सभागृहाच्या मध्यभागी थांबली होती.

मुख्याध्यापक आल्याआल्या ती ओरडली, "सर, तुम्हाला एक सांगायचंय!"

"काय बुवा? एवढं काय सांगायचंय?" त्यांनी मांडी घालून बसता बसता विचारलं.

खूप दिवस विचार करून ठरवलेली एक गोष्ट तोत्तोचानला त्यांना सांगायची होती. ते बसल्यावर अचानक तिनं निर्णय बदलला आणि पाठीवर बसण्याऐवजी ती एकदम त्यांच्या पुढ्यात जाऊन बसली. तिला जे सांगायचं होतं ते समोरून सांगणं जास्त सोयीचं पडलं असतं. तिनं एकदा मान वर करून मुख्याध्यापकांकडे बघितलं. मग आईच्या भाषेत सांगायचं तर तिचा गोंडस चेहरा किंचित् बाजूला झुकवून ती गोंडस हसली. असं हसलं की तिलाही आत्मविश्वास वाटायचा आणि खरंच चांगली मुलगी आहे असंही वाटायचं.

मुख्याध्यापकांनी तिच्याकडे उत्सुकतेने बघितलं.

"काय गं? सांग ना."

तोत्तोचान सावकाशपणे, थोडा मोठ्या माणसांचा आव आणून पण अतिशय मंजूळ आवाजात म्हणाली,

"मला मोठं झाल्यावर आपल्या शाळेत शिकवायला यायचंय."

तोत्तोचानला वाटलं होतं, ते हसतील;

पण मुख्याध्यापकांनी अत्यंत गंभीरपणे तिला विचारलं, "वचन देतेस?"

त्यांना मनापासून तिनं तसं करावंस वाटत होतं.

तोत्तोचाननं चटकन् मान हलविली.

"हे घ्या वचन!"

तिथं शिकवायला यायचा तिचा निर्धार पक्का झाला होता. त्याक्षणी तिच्या मनात ती अगदी पहिल्यांदा 'तोमोई' मधे आली त्या दिवसाच्या आठवणी होत्या. आता त्या घटनेला कित्येक वर्षे उलटल्यासारखी तिला वाटत होतं. तिची मुख्याध्यापकांशी पहिली भेट झाल्यापासून, "तू आता या शाळेची झालीस" असं त्यांनी सांगेपर्यंतच्या सगळ्या गोष्टी तिच्या डोळ्यांसमोर उभ्या राहिल्या. चार तास त्यांनी तिची बडबड न कंटाळता ऐकली होती.

कोबायाशी त्यावेळी तिला जितके आवडले होते त्याहूनही कितीतरी जास्त ते तिला आवडायला लागले होते. आणि त्यांच्यासाठी वाट्टेल ते करण्याची तिची तयारी होती.

तिनं वचन दिल्यावर ते नेहमीप्रमाणे पडक्या दाताची फिकीर न करता मोकळेपणाने हसले.

तोत्तोचाननं तिचं छोटसं बोट मुख्याध्यापकांसमोर धरलं. त्यांनीही आपलं बोट

तिच्यासमोर धरलं. जपानी परंपरागत पद्धतीनं बोटाला बोट जुळवून वचन दिलं. मुख्याध्यापकांच्या चेहऱ्यावर हसू होतं. तोत्तोचान पण हसली. तोमोईमधे ती शिक्षिका होणार होती. वा! काय सुंदर कल्पना होती ती!

''मी शिकवायला लागेन तेव्हा...'' तिच्या डोळ्यांसमोर एक छानसं चित्र होतं. थोडा अभ्यास, पुष्कळसे क्रीडादिन, शेतामध्ये स्वयंपाक, शिबीर, शेकोट्या आणि फिरायला जाणे.

मुख्याध्यापकांना खूप आनंद झाला होता. तोत्तोचान अजून फारच लहान होती. पण त्यांना खात्री होती की तोत्तोचान नक्की तोमोईमधे शिक्षिका होईल. तोमोईमधले सगळेच विद्यार्थी चांगले शिक्षक झाले असते. कारण बालपण आणि विद्यार्थीपण त्यांनी खऱ्या अर्थानं अनुभवलं होतं.

इकडे तोमोईमध्ये मुख्याध्यापक आणि एक चिमुकली विद्यार्थिनी दहा वर्षांनंतर करावयाच्या गोष्टीबद्दल निश्चय करत होती अन् तिकडं जपानच्या आकाशात अमेरिकेची विमानं बॉंबगोळ्यांसह हजर झाली होती.

## रॉकी नाहीसा होतो

बरेचसे सैनिक मारले गेले होते. खाद्यपदार्थ दुर्मिळ होत चालले होते. माणसं जीव मुठीत धरून रहात होती. पण उन्हाळा मात्र नेहमीप्रमाणे आला. जिंकणाऱ्या आणि हरणाऱ्या सगळ्याच देशात तो भेदभाव न करता आला.

तोत्तोचान नुकतीच कामाकुरात राहाणाऱ्या काकाकडून टोकियोमध्ये परतली होती. आजकाल तोमोईमध्ये शिबिरं होत नसत. आणि गरम पाण्याच्या झऱ्यांच्या सहलीही नसत. आता उन्हाळी सुट्टीचा आनंद लुटायला बहुतेक कधीच मिळणार नव्हता. तोत्तोचान दरवर्षी उन्हाळ्याची सुट्टी कामाकुरामधे चुलत भावंडांबरोबर घालवत असे. त्यांच्या नात्यातला एक मोठा मुलगा दरवर्षी लहान मुलांना भुतांच्या गोष्टी सांगत असे. पण आता तो सैन्यात भरती झाला होता. त्यामुळे आता भुताच्या गोष्टीही नव्हत्या. आणि तिचा काका जो अमेरिकेबद्दलच्या खूप मजेदार गोष्टी सांगायचा, तेही आता युद्धावर गेला होता. त्याचं नाव होतं 'शू तागुची.' तो अतिशय उत्तम छायाचित्रकार होता. न्यूयॉर्क मधील जपानी बातमीसंस्थेचा प्रमुख म्हणून तो काम करत असताना 'शु तागुची' नावानं लोक त्याला ओळखत. बाबांचा तो मोठा भाऊ. बाबांनी आपल्या आईचं माहेरचं आडनाव घेतलं होतं. म्हणून त्याचं आडनाव वेगळं होतं. नाहीतर त्यांचंही खरं आडनाव तागुची असंच होतं.

तागुचीकाकांनी चित्रित केलेले 'राबाऊलचे युद्ध' सारखे चित्रपट चित्रपटगृहातून प्रदर्शित होत होते. पण युद्धाच्या आघाडीवरून तो फक्त छायाचित्रं आणि वृत्तचित्रंच पाठवायचा. त्यामुळे काकू फार काळजीत होती. फोटोमध्ये सैनिक धोक्यात असलेले दिसायचे आणि ते फोटो काढण्यासाठी काकाला त्यांच्याही पुढं जावं लागतं असे असं बाकीची मोठी माणसं म्हणायची.

कामाकुराचा समुद्रकिनारा त्यावर्षी फारच सुनसान दिसत होता. या सगळ्या उदास वातावरणात सगळ्यांना हसविणारी एकच व्यक्ती होती, ती व्यक्ती म्हणजे काकांचा सगळ्यात मोठा मुलगा यातचान. तो तोत्तोचानपेक्षा एक वर्षानं लहान होता. सगळी मुलं एकत्र एकाच मच्छरदाणीत झोपत असत. झोपायला जाण्यापूर्वी 'यातचान' मोठ्यानं ओरडायचा, ''महाराजांचा जयजयकार असो!'' आणि मग गोळी लागून पडलेल्या सैनिकाप्रमाणं ठार झाल्याचं नाटक करत तो जोरात पडायचा.

तोत्तोचानची आई बाबांबरोबर टोकियोमध्येच राहिली होती. सुट्टी संपल्यामुळे तोत्तोचानला, त्या भुतांच्या गोष्टी सांगणाऱ्या मुलाची बहीण टोकियोला परत घेऊन आली.

आल्याआल्या नेहमीप्रमाणे तोत्तोचाननं रॉकीला हाका मारायला सुरवात केली. पण तो कुठेच दिसत नव्हता. बाबांनी पैदास केलेल्या आर्किडच्या रोपवाटिकेतही त्याचा पत्ता नव्हता. तिला काळजी वाटायला लागली. खरं तर ती घरात पोचायच्या आधीच रॉकी तिला भेटायला येत असे. तिनं घराच्या आसपास, रस्त्यावरसुद्धा रॉकीला हाका मारल्या; पण त्याचे ते प्रेमळ डोळे, टवकारलेले कान किंवा झुपकेदार शेपटीचा झुपका यातलं काहीच तिच्या नजरेस पडत नव्हतं. तिला वाटलं, कदाचित् ती रस्त्यावर शोधत असेपर्यंत तो घरी परत गेला असेल. ती घाईघाईनी परत घरात गेली. पण तो नव्हताच.

''रॉकी कुठाय?'' तिनं आईला विचारलं.

तोत्तोचान रॉकीला शोधतेय हे आईच्या लक्षात आलं होतं. पण ती काहीच बोलली नाही.

''आई! रॉकी कुठाय?'' आईचा स्कर्ट पकडून तिनं पुन्हा विचारलं. आईला उत्तर देणं अवघड जात होतं.

''तो नाहीसा झालाय! आई म्हणाली. तोत्तोचानचा विश्वासच बसेना. ''नाहीसा कसा होईल? कधी?'' तिनं आईकडे बघत विचारलं.

आईला शब्दच सापडत नव्हते.

''तू कामाकुराला गेलीस त्यानंतर लगेचच.'' ती उदासपणे म्हणाली. घाईघाईनं तिनं पुढं सांगितलं, ''आम्ही त्याचा खूप शोध घेतला, सगळ्यांना विचारलं, पण सापडला नाही. आणि तुला कसं कळवायचं तेच समजत नव्हतं.''

अचानक तोत्तोचानच्या डोक्यात प्रकाश पडला. रॉकी मेला असणार. आई मला वाईट वाटू नये म्हणून सांगत नाहीये, पण तो नक्कीच मेला असणार.

तिला आता सगळं स्पष्ट समजलं. आजपर्यंत ती कधीही, कुठेही गेली, तरी रॉकी घर सोडून गेला नव्हता. ती परत येणार हे त्याला माहिती असायचं.

''रॉकी असा न सांगता कधीच जाणार नाही.'' ती स्वतःशीच म्हणाली.

पण ती आईला काहीच म्हणाली नाही. आईला खूप वाईट वाटलं असणार हे तिला माहीत होतं.

''कुठं गेला कुणास ठाऊक.'' खाली पाहात ती एवढंच म्हणाली.

तेवढं बोलून ती तिच्या खोलीकडे धावली. रॉकीशिवाय घर घरच वाटत नव्हतं. तिच्या खोलीत पोचल्यावर तिनं न रडण्याचा खूप प्रयत्न केला. पुन्हा या गोष्टीचा विचार न करण्याचाही प्रयत्न केला. पण तिला समजेना, की तिची तर काही चूक झाली नसेल ना? रॉकी तिला न सांगता घर सोडून का गेला असेल?

''मुक्या प्राण्यांना छळू नका.'' कोबायाशी नेहमी सांगायचे.

''ते तुमच्याशी प्रामाणिकपणे वागत असताना त्यांचा विश्वासघात करू नका. कुत्र्याला अन्नाची लालूच दाखवून नंतर खायला न देणं हा दुष्टपणा आहे. असं केलंत तर कुत्रंसुद्धा तुमच्यावर विश्वास ठेवणार नाही.''

तोत्तोचाननं नेहमीच हे नियम पाळले होते. तिनं रॉकीला कधीच फसवलं नव्हतं. तिनं काहीच चूक केल्याचं तिला आठवेना.



तेवढ्यात तिला तिच्या खेळातल्या अस्वलाच्या पायाजवळ काहीतरी दिसलं. तोवर तिनं रडू आवरलं होतं. पण ते बघितल्यावर मात्र तिच्या अश्रूंचा बांध फुटला. तो रॉकीच्या तपकिरी केसांचा पुंजका होता. ती कामाकुराला जाण्याआधी ते दोघं जमिनीवर लोळले तेव्हा ते केस त्या खेळण्यात अडकले असणार.
ते केस मुठीत धरून ती रड रड रडली. त्या दिवशी तिचे अश्रू आणि हुंदके थांबायलाच तयार नव्हते.

आधी यासुकीचान आणि आता रॉकी–तोत्तोचाननं आपला आणखी एक मित्र गमावला होता.

## चहापान

'तोमोई' च्या मुलांच्या आवडत्या चौकीदाराला रयोचानलासुद्धा अखेर युद्धावर जाण्याचा सरकारी आदेश झाला. तो मोठा होता; पण मुलं त्याला त्याच्या बालपणीच्या टोपण नावानंच हाका मारत असत. रयोचान म्हणजे जणू प्रत्येक वेळी मुलांच्या मदतीला धावून येणारा संरक्षक देवदूतच होता आणि तो काहीही करू शकायचा. जास्त न बोलता तो सारी कामं करायचा. तोत्तोचान नाल्यात पडली तेव्हा रयोचाननेच ताबडतोब तिला उचललं होतं आणि न कुरकुरता त्यानं तिला धुतलंही होतं.

''आपण रयोचानच्या निरोपसमारंभासाठी चहापानाचा कार्यक्रम करू या का?'' मुख्याध्यापकांनी विचारलं.

''चहापान?''

चहापानाचा कार्यक्रम तोमोईमध्ये यापूर्वी कधीच झाला नव्हता. पण मुलांना ती कल्पना फारच आवडली. कधीच न केलेल्या गोष्टी करायला मुलांना नेहमी आवडायच्या. मुलांना माहीत नव्हतं. पण 'सावाकाई' (चहापान) हा मुख्याध्यापकांनी नवीन शोधून काढलेला शब्द होता. तसं करताना, 'सोबेत्सुकाई' (निरोप समारंभ) हा शब्द त्यांनी मुद्दामच टाळला होता. कारण त्या शब्दाला उदासीनतेची झाक आहे. आणि जरा मोठ्या विद्यार्थ्यांना माहीत होतं की रयोचान जर युद्धात मारला गेला तर हा खऱ्या अर्थाने निरोप समारंभ ठरण्याची शक्यता नाकारता येत नव्हती म्हणून रयोचान युद्धासाठी जात असताना, त्याकरिता हा शब्द वापरणं उचित नव्हतं. चहापान ही मात्र एक वेगळीच गोष्ट होती. आणि आजवर कुणीही अशा समारंभाला गेले नसल्यानं ते सारेच आज खूप खुषीत होते.

शाळा सुटल्यावर कोबायाशींनी सभागृहातील बाकं गोलाकार मांडून जेवणाच्या सुट्टीतल्यासारखीच रचना केली. सगळे गोलात बसल्यावर त्यांनी प्रत्येकाला

हिरव्या चहाबरोबर (जपानी चहा हिरव्या रंगाचा असतो व दूध किंवा साखर न घालता तो प्यायला जातो.) सुक्या 'स्क्वीड' माशाची भाजलेली एक एक चकती दिली. युद्धाच्या त्या काळात ती सुद्धा मोठी मेजवानीच होती. नंतर ते रयोचानपाशी गेले. त्याच्यासमोर त्यांनी थोडी 'साके' (जपानी मदिरा) असलेला एक ग्लास ठेवला. फक्त युद्धावर जाणाऱ्यांनाच तेव्हा 'साके' रेशनवर अगदी मर्यादित प्रमाणात विकली जात होती.

''तोमोई मधला हा चहापानाचा पहिलाच कार्यक्रम आहे.'' मुख्याध्यापक म्हणाले, तुम्हाला कोणाला रयोचान~ला काही सांगायचं असेल तर जरूर सांगा. इतरांनाही काही सांगायचं असेल तर एकेकानं गोलाच्या मध्यभागी उभं राहून सांगायला हरकत नाही.

तोमोईमध्ये 'स्क्वीड' खाण्याचीच फक्त ती पहिली वेळ नव्हती, तर रयोचान बरोबर बसण्याची पण ती पहिलीच वेळ होती.

एकामागून एक मुलं उभी रहात होती. आणि रयोचानशी बोलत होती. पहिल्या मुलानं रयोचानला फक्त आजारी पडू नये म्हणून काळजी घ्यायला सांगितलं.

नंतर तोत्तोचानच्या वर्गातला मिगीता उभा राहिला. त्यानं सांगितलं, ''पुढच्या वेळी मी गावी गेलो, की तुमच्या सगळयांसाठी श्राद्धाचे लाडू घेऊन येईन.''

सगळे हसले. जवळजवळ वर्षापूर्वी मिगीतानं गावी श्राद्धाचे लाडू खाल्ले होते आणि त्याची चव इतकी आवडली होती, की त्यानं सगळ्या मुलांसाठी ते एकदातरी आणण्याचं वचन अक्षरशः हजारो वेळा दिलं होतं; पण आणले मात्र कधीच नव्हते.

मिगितानं श्राद्धाच्या लाडूचा उल्लेख केला तेव्हा मुख्याध्यापकांना क्षणभर धक्का बसला. अशा प्रसंगी त्या लाडूंचा उल्लेख एरवी अपशकुनीच; पण मिगीता इतक्या निष्पापपणे सांगत होता, की त्यांनाही हसू आलं. रयोचानलासुद्धा हसू आवरता आलं नाही. कारण मिगितानं त्याला कित्येक युगां~पासून ते देण्याचं कबूल केलं होतं.

नंतर ओईनं उभं राहून रयोचानला सांगितलं, की तो जपानमधला सगळ्यात चांगला बागवान होणार होता. ओई हा तोदोरोकीमधल्या प्रचंड रोपवाटिकेतील मालकाचा मुलगा होता.

नंतर काईको आओकी उभी राहिली. पण ती इतकी लाजत होती की काहीच न बोलता परत जागेवर जाऊन बसली. तेव्हा तोत्तोचान घाईघाईनं पुढं गेली आणि म्हणाली,

काईकोचान कडची कोंबडीची पिलं आता उडतात. मी परवाच बघितली.''

मग अमाडेरा उठला.

''तुला जर एखादं जखमी मांजर किंवा कुत्रं तिकडे सापडलं तर घेऊन

ये. मी त्याला बरं करीन,'' त्यानं सांगितलं.

ताकाहाशी इतका छोटा होता की, बाकाखालून सरपटत तो निमिषार्धात मध्यभागी पोहोचला.

उत्साहानं तो म्हणाला, ''धन्यवाद रयोचान, आमच्यासाठी खूप काय काय केल्याबद्दल.''

नंतर आईको साईशो उभी राहिली.

''रयोचान, मी पडले तेव्हा तू मला पट्टी बांधली होतीस हे मी कधी विसरणार नाही.''

आईकोचे काका रशियन युद्धातले जपानचे प्रसिद्ध सेनानी होते आणि तिची एक नातलग 'अत्सुको साईशो' मेईजी महाराजांच्या दरबारातली प्रसिद्ध कवियत्री होती. पण आईकोनं त्यांच्या नावावर फुशारकी कधीच मारली नाही.

मुख्याध्यापकांची मुलगी मियोचान रयोचानला सगळ्यात जास्त ओळखत होती. तिच्या डोळ्यात पाणी आलं होतं.

''रयोचान, स्वतःची नीट काळजी घे हंऽऽ आणि आम्हाला पत्र लिहिशील?''

तोत्तोचानला खरं म्हणजे खूप बोलायचं होतं; पण सुरवात कशी करावी हेच तिला समजेना.

शेवटी ती म्हणाली:

''रयोचान, तू गेलास नं तरी आम्ही रोज चहापानाचा कार्यक्रम करू.''

मुख्याध्यापक हसले आणि रयोचान सुद्धा. तोत्तोचान आणि इतर मुलांनासुद्धा हसूं आलं.

पण तोत्तोचानचे शब्द खरे झाले. दुसऱ्या दिवशीपासून वेळ मिळाला, की मुलं चहापान चहापान खेळायची. स्क्वीडच्या चकती ऐवजी झाडाच्या साली चघळायची आणि साके म्हणून पाणी प्यायची. मग कोणीतरी म्हणायचे,

''मी तुमच्यासाठी श्राद्धाचे लाडू आणीन.'' आणि सगळे हसायचे. मग ती आपसात एकमेकांशी गप्पा मारायची. आपापले विचार एकमेकांना सांगायची. खायला काहीही नसलं तरी चहापानाचे कार्यक्रम मजेत चालू होते.

'चहापान' ही रयोचानच्या निमीत्तानं मुलांना मिळालेली मौल्यवान भेट होती. आणि कुणाला कल्पना नसली, तरी वेगवेगळ्या वाटांनी जाण्यापूर्वी तोमोईमध्ये त्यांनी खेळलेला तो शेवटचा खेळ होता.

इथं टोकियोच्या गाडीतून रयोचान रवाना झाला आणि दुसऱ्या बाजूनं अमेरिकन विमानं टोकियोच्या आकाशात हजर राहून बॉंबचा वर्षाव करू लागली.

# "सायोनारा-सायोनारा!"

'तोमोई' जळून राख झाली. हा प्रसंग रात्री घडला. मियोचान, तिची बहीण मिसाचान आणि त्यांची आई, शाळेशेजारच्या त्यांच्या घरातून बाहेर पडून कुहोनबुत्सु मंदिराजवळच्या तोमोईच्या शेतात सुरक्षित पोहोचल्या म्हणून वाचल्या.

बी-29 या लढाऊ विमानामधून असंख्य बॉम्ब शाळेचे वर्ग म्हणून वापरात येणाऱ्या आगगाडीच्या डब्यावर फेकले गेले. मुख्याध्यापकांचं स्वप्न असलेली शाळा आगीच्या ज्वाळांनी वेढली गेली. आता तिथं मुलांच्या हसण्या-गाण्या खिदळण्याच्या-खेळण्या बागडण्याच्या आवाजाऐवजी विनाशकारी ज्वाळांनी वेढलेल्या विध्वंसाचं गान ऐकू येत होतं. आगीवर आता नियंत्रण मिळवणं अशक्य होतं. सर्वच जळून खाक झालं. सबंध जियुगाओकाच आगीच्या ज्वाळांनी वेढलं गेलं होतं.

अन् या साऱ्या विनाशाच्या तांडवात रस्त्यात उभं राहून मुख्याध्यापक ज्वाळांनी वेढलेल्या त्यांच्या लाडक्या शाळेकडे पाहात होते. त्यांनी त्यांचा नेहमीचाच जुनाट काळा सूट घातला होता. दोन्ही हात खिशात घालून ते उभे होते.

''पुढची शाळा कुठल्या प्रकारची बांधू या रे?'' त्यांनी शेजारी उभ्या असलेल्या महाविद्यालयात शिकणाऱ्या आपल्या मुलाला-तोमोईला विचारलं. तोमोई नि:शब्दपणे त्यांच्याकडे बघत उभा राहिला.

कोबायाशींचं मुलांबद्दलचं प्रेम आणि शिकविण्याची ओढ तोमोई शाळेला वेढलेल्या ज्वाळांहूनही अधिक अनावर होती. ते अजूनही खचले नव्हते.

तोत्तोचान निर्वासितांना घेऊन जाणाऱ्या गच्च भरलेल्या आगगाडीत खूप माणसांमध्ये चेमटून बसली होती. खिडकीतून दिसणाऱ्या अंधाराकडे बघताना तिला मुख्याध्यापकांचे अखेरचे शब्द आठवले.

''पुन्हा भेटू!'' आणि त्यांचं ते नेहमीचं वाक्य, ''तू फार चांगली मुलगी आहेस.'' तिला ते शब्द विसरायचे नव्हते. कोबायाशींना पुन्हा भेटण्याची स्वप्नं पाहातच तिला झोप लागली.

चिंतामग्न आणि दु:खी प्रवाशांचं ओझं घेऊन गाडी मात्र अंधार कापत पुढे निघाली होती.

# उपसंहार

***माझ्याबरोबर माझ्याच 'डब्यातून प्रवास' करणारे ते सगळे मित्र आता काय करताहेत? हे जाणून घ्यायचंय तुम्हाला?***

***आकिरा ताकाहाशी***

क्रीडादिनाला सगळी बक्षिसं पटकावणारा ताकाहाशी कधीच उंच झाला नाही. पण जपानमधील रग्बीच्या खेळासाठी प्रसिद्ध असलेल्या शाळेत त्याला सहज प्रवेश मिळाला. नंतर मेइजी विद्यापीठातून त्याने इलेक्ट्रॉनिक्स इंजिनियरची पदवी घेतली. आता तो मध्यजपानमधील 'हमाना तलावा' जवळच्या एका मोठ्या इलेक्ट्रॉनिक्स कंपनीमध्ये मॅनेजर आहे. कारखान्याच्या कामातील सुसंघटितपणा टिकविण्याची, कामगारांचे प्रश्न सोडविण्याची आणि तक्रारी ऐकून घेण्याची जबाबदारी त्याच्यावर आहे. स्वतःला खूप सोसावं लागलं असल्यानं त्याला इतरांचे प्रश्नही लवकर समजतात. शिवाय त्याचं प्रसन्न व्यक्तिमत्त्वही कामात फार उपयोगी पडतं.

तंत्रज्ञान –विशेषज्ञ म्हणूनही तो नवीन आलेल्या हाताखालच्या लोकांना प्रशिक्षण देतो.

मी हामामात्सुला जाऊन ताकाहाशी आणि त्याच्या पत्नीला भेटले. फार मायाळू आणि समजूतदार बाई! तिनं तोमोईविषयी ताकाहाशीकडून इतकं ऐकलंय, की तिला वाटतं जणू ती स्वतःच तोमोईमधे गेलीय. ताकाहाशीला त्याच्या बुटकेपणामुळे कोणतेही न्यूनगंड नाहीत याची तिला खात्री आहे. जर तसे असते तर मात्र जीवन फार कष्टकारक झालं असतं.

तोमोईमधील पहिल्या दिवसाबद्दल बोलताना ताकाहाशी म्हणाला, ''त्या दिवशी तेथे इतरही अपंग विद्यार्थी बघितले तेव्हा मनाला एक प्रकारचा हलकेपणा आला.''

त्यानंतर त्याला स्वतःच्या शारीरिक कमतरतेविषयी कधीच लाज वाटली नाही. आणि तोमोईमधल्या प्रत्येक दिवशी त्यानं खराखुरा आनंद लुटला.

कोबायाशींनी त्याला किती उत्तेजन दिलं हे तो सांगत होता. 'व्हॉल्टिंग हॉर्स' वरून उडी मारताना ते प्रत्येक वेळी त्याला सांगायचे, तुला नक्की जमेल. उडी मारताना ते ताकाहाशीला बहुतेक किंचित् त्याचा हात धरून मदत करायचे असं आता त्याला वाटतं. पण तेव्हा मात्र ते जाणवत नसे. त्यानं स्वतंत्रपणे उडी मारली असंच ते त्याला जाणवून देत. त्याचा आत्मविश्वास जराही ढळतोय असं वाटलं, की ते पुढाकार घ्यायला लावायचे. जीवनाला सामोरे जाण्याचा आशावादी दृष्टिकोन त्यांनी ताकाहाशीला दिला. सगळीच्या सगळी बक्षिसं मिळविण्याचा तो आनंद त्याला अजून आठवतो.

कोबायाशींचा आम्हा विद्यार्थ्यांबद्दलचा दृष्टीकोन फार दूरदर्शी होता यात काहीच शंका नाही. 'तू फार चांगली मुलगी आहेस' असं तोत्तोचानला जसं ते म्हणायचे तसंच 'तुला नक्की जमेल' असं ताकाहाशीला म्हणायचे आणि ही त्यांची वाक्यं ताकाहाशी आणि तोत्तोचानचं जीवन घडवण्यात फारच महत्त्वाची ठरली होती.

**मियोचान (मियो कानेको)**

कोबायाशींची ही तिसरी मुलगी. मियोचाननं कुनिताची संगीत महाविद्यालयाच्या शिक्षण विभागातून पदवी घेतली आणि आता ती त्याच महाविद्यालयाशी संलग्न प्राथमिक शाळेत संगीत शिकवते. तिच्या वडिलांप्रमाणेच तिलाही लहान मुलांना शिकवायला फार आवडतं. ती तीन-साडेतीन वर्षांची असतानापासून कोबायाशींनी तिच्या हालचाली, संगीताच्या तालावर तिच्या प्रतिक्रिया, तिचं बोलायला शिकणं या गोष्टीचं बारकाईनं निरीक्षण केलं होतं. याचा त्यांना मुलांना शिकवायला आणि समजावून घ्यायला फारच उपयोग झाला.

**साक्को मात्सुयामा (आता सौ. साहतो)**

मोठ्यामोठ्या डोळ्यांची, मी तोमोईमध्ये पहिल्यांदा गेले त्या दिवशी सशाचं चित्र असलेला फ्रॉक घातलेली साक्को चान्! तोमोईनंतर तिनं, आज ज्या शाळेला 'मिता हायस्कूल' म्हणून ओळखतात त्या शाळेत प्रवेश घेतला. त्या काळात तिथं मुलींना प्रवेश मिळणं फार अवघड होतं. नंतर ती टोकियो ख्रिस्ती महिला विद्यापीठाच्या इंग्रजी विभागात गेली. आणि वाय. डब्ल्यू. सी. ए. त. इंग्रजीची प्राध्यापिका झाली. अजूनही ती तिथंच आहे. आपल्या ग्रीष्मकालीन शिबिरांमध्ये ती तोमोईच्या अनुभवांचा अप्रतिम उपयोग करते.

होताकाला गिर्यारोहणासाठी गेली असताना भेट झालेल्या एका माणसाबरोबर तिचं लग्न झालं. ते जिथे भेटले, त्या पर्वताची आठवण म्हणून त्यांनी त्यांच्या मुलाचं नाव यासुताका ठेवलंय.

## ताईजी यामानोऊची

'माझ्याशी लग्न करणार नाही!' असं सांगणारा ताईचान आज जपानमधील वैज्ञानिकांमधील प्रमुख आहे. पण आता तो अमेरिकेत राहातो. टोकियो विद्यापीठातून त्यानं विज्ञानाची पदवी घेतली. एम्. एस्. सी. झाल्यावर मोठी शिष्यवृत्ती मिळवून तो अमेरिकेत गेला आणि रोचेस्टर विद्यापीठातून पी. एच. डी. झाला. नंतर तो तिथेच विज्ञानात संशोधन करत राहिला. सध्या तो इलिनॉइसमधील फर्मी नॅशनल ॲक्सलरेटर लॅबोरेटरीमध्ये उपसंचालक आहे. जगातील सर्वात मोठ्या अशा या संशोधन प्रयोगशाळेत अमेरिकेतील त्रेपन्न विविध विद्यापीठातील निवडक बुद्धिमान लोक आहेत. एकूण 145 वैज्ञानिक आणि 1,400 तंत्रज्ञ असलेली ही प्रयोगशाळा म्हणजे एक आश्चर्य आहे. एकूण ताईचान बुद्धिमान आहे हे तुमच्या लक्षात आलंच असेल.

नुकतंच ताईचाननं कोलंबिया विद्यापीठातील एका प्राध्यापकाच्या सहकार्याने 'अपसिलॉन' (नावाचं काहीतरी) शोधून काढलंय्. माझी तर खात्री आहे, की एक ना एक दिवस ताईचानला नोबेल पारितोषिक नक्की मिळेल.

रोचेस्टर विद्यापीठातील गणितात पदवीधर झालेल्या एका अत्यंत हुशार मुलीशी ताईचानचा विवाह झाला.

इतकी बुद्धिमत्ता असलेला ताईचान कुठल्याही शाळेत गेला असता तरी तितकाच पुढे आला असता. पण मला वाटतं, मुलांना आवडेल त्या क्रमानं अभ्यास करू देण्याची तोमोईची पद्धत त्याला नक्कीच उपयोगी पडली असणार. मला तर त्यानं शाळेत परीक्षानळ्या, व अल्कोहोलचे दिवे घेऊन प्रयोग करणं आणि विज्ञानाची भयंकर जड जड पुस्तकं वाचणं या व्यतिरिक्त इतर काहीच केलेलं बघितल्याचं आठवत नाही.

## कुनियो ओई

ओई, ज्याने माझ्या वेण्या ओढल्या होत्या, आज अतिपूर्वेकडील ऑर्किडस्‌बाबत जपानमधील एक अग्रणी तज्ज्ञ आहे. या अतिविशिष्ट क्षेत्रात घ्याव्या लागणाऱ्या विशेष दक्षतेमुळे ओईला सगळीकडून सारखी बोलावणी येत असतात आणि तो जपानभर फिरतीवर असतो. या त्याच्या यात्रांच्या दरम्यान, मोठ्या कष्टाने त्याच्याशी माझ्या फोनवर गप्पा झाल्या. आमचा संक्षिप्त वार्तालाप असा काहीसा होता :

''तोमोईनंतर तू कुठल्या शाळेत गेलास ?''

''कुठल्याच नाही.''

''दुसऱ्या कुठल्याच शाळेत नाही गेलास ? तोमोई हीच एवढी तुझी शाळा होती ?''

''अगदी बरोबर.''

''अरे देवा, तू कुठल्या माध्यमिक शाळेत कधीच गेला नाहीस ?''

''अरे हो, आम्ही जेव्हा क्यूशेनहून पळालो होतो तेव्हा काही महिन्यांसाठी ओईता माध्यमिक शाळेत गेलो होतो.''

''पण माध्यमिक शाळेतलं शिक्षण पुरं करावं लागतं नां ?''

''बरोबर सांगते आहेस. पण मी नाही केलं.''

'वाह ! केवढा निवांत प्राणी आहे हा !' माझ्या मनात आलं. युद्ध सुरु व्हायच्या आधी ओईच्या वडिलांची एक विशाल रोपवाटिका होती. दक्षिण पश्चिम तोक्योचा तोदोरोकी म्हणविला जाणारा विभाग या विस्तीर्ण बागेचाच एक भाग होता. बॉम्ब स्फोटांनी ती बाग नष्ट झाली होती. आमच्या इतर झालेल्या गप्पातून ओईचा सौम्य स्वभाव अधिकच जाणवतो.

''तुला सर्वात सुगंधित फूल कोणतं ठाऊकाय ? माझ्या मते ते चीनी वसंत ऑर्किड आहे. आख्ख्या दुनियेतला कुठलाही सुगंध त्याच्यापुढे उणा पडेल.''

''ती फुलं खूप महाग असतात कां ?''

''काही असतात अन् काही नाही पण.''

''कशी दिसतात ती फुलं ?''

''त्यांच्यात फार लक्ष वेधून घेणारं असं काही भडक-तडक नसतं. जराशी साधीसुधीच असतात ती आपली. पण हेच तर त्यांच्या आकर्षणामागील रहस्य आहे.

तोमोईच्या दिवसांपास्नं ओई अजिबात बदललेला नव्हता. त्यांचा शांत आवाज ऐकून मी विचार केला, शालेय शिक्षण पूर्ण न करण्याचा याला काही पश्चात्ताप झालेला नाही. तो आपल्या मनातील प्रेरणेनुसार वागत आलेला आहे. अन् त्याचा स्वतःवर पक्का विश्वास आहे. या गोष्टीने मी प्रभावित झाले.

## कामुओ आमाडेरा

आमाडेराला जनावरे फार आवडत. मोठा झाल्यावर त्याचा पशुचिकित्सक व्हायचं होतं. दुर्भाग्याने त्याच्या वडिलांना अचानक मृत्यू आला अन् त्याच्या जीवनाची दिशा बदलून गेली. निदान विश्वविद्यालयाचा पशुचिकित्सा आणि पशुपालन विभाग सोडून त्याला किओ हॉस्पिटलमध्ये नौकरी करावी लागली. सध्या तो संरक्षण

बलाच्या केंद्रिय दवाखान्यातील तपासणी विभागात एका जबाबदार पदावर काम करतो आहे.

**आईको साईशो (आता श्रीमती तानाका)**

आईको साईशो ॲडमिरल तोजो यांची नात होती. ती आओयामा गाकुइनच्या अखत्यारीतील प्राथमिक शाळेतून बदलून तोमोईला आली होती. ती एक बँडवाली महिला असावी असे मला तेव्हा वाटे. मला असे वाटण्याचे कारण काय असावे ? तिला वडील नव्हते. ते पूर्वी थर्ड गार्ड रेजिमेंटमध्ये मेजर होते आणि मांचुरियन घटनेनंतर त्यांचा मृत्यू झाला होता.

कामाकुरा बालिका हायस्कूलमधून शिक्षण पूर्ण केल्यानंतर तिचा विवाह एका वास्तुशास्त्रज्ञाशी झाला. तिची दोन्ही मुले आज मोठमोठया व्यवसायात आहेत. आपल्या अधिकांश मोकळ्या वेळांत ती कविता लिहिते.

''म्हणजे सम्राटांच्या दरबारातील आपल्या प्रसिद्ध मावशीची परंपरा तू निभावते आहेस,'' मी तिला म्हटलं.

''नाही गं,'' काहीशी संकोचून ती म्हणाली.

''तू तोमोईमध्ये होतीस तेवढीच विनयी आहेस अजून,'' मी म्हटलं, ''आणि सुसभ्य पण.''

यावर तिचं उत्तर होतं, ''तुला ठाऊकाय माझा आकार अजून तेवढाच आहे जेवढा 'बेनकेई' खेळतेवेळी होता.''

तिचा स्नेह भरला आवाज ऐकून मला वाटले तिचे घर-परिवार अतिशय आनंदमय असेल.

**केइको आओकी (आता सौ. कुवाबारा)**

उडणारी कोंबडीची पिल्लं घरी असलेल्या केईको चानचं केईओ विद्यापीठाच्या प्राथमिक शाळेत शिकविणाऱ्या एका शिक्षकाबरोबर लग्न झालं. आता तिला लग्न झालेली एक मुलगी आहे.

**योईची मिगिता**

श्राद्धाचे लाडू आणण्याचं वचन देणारा मिगिता फलोद्यानशास्त्राचा पदवीधर झाला. पण त्याला मुळात चित्रकलेची आवड होती. म्हणून त्यानं पुन्हा एकदा मुसाशिनो कलामहाविद्यालयातून चित्रकलेची पदवी घेतली. आता तो स्वतःचा ग्राफिक डिझाइनचा व्यवसाय करतो.

**रयोचान**

रयोचान हा युद्धावर गेलेला तोमोईचा चौकीदार सुरक्षित परतून आला. दर तीन नोव्हेंबरला होणाऱ्या तोमोईच्या संमेलनात सामील व्हायला तो कधीच विसरत नाही.

Printed at Shivam Offset Press, A-12/1 Naraina Indl. Area, Phase-I, New Delhi-110 028